


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

अंक क्र. ३४५, सप्टेंबर २०१३
(शताब्दीपूर्ती)

संपादक
**डॉ. सु. प्र. कुलकर्णी**



प्रकाशक
**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह




**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११०३०
दूरभाष ०२०-२४४७५९६३
(कार्यालयाची वेळ : सकाळी ९.३० ते ११.३० दुपारी ४.३० ते ७.३०)

अनुक्रमणिका



## अनुक्रमणिका




मुद्रक-प्रकाशक
**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.

अक्षरजुळणी
**स्मिता टाईपसेटर्स**
११२०, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०

मुद्रणस्थळ
**स्मिता प्रिंटर्स**
१०१९, सदाशिव पेठ,
पुणे ४११ ०३०

कव्हर डिझाईन : **श्री. हेमंत सरदेसाई**
भ्रमणभाष : ९३२६०७०९३४

**किंमत : १५/- रुपये**

प्रकाशन : सप्टेंबर, २०१३

(संपादकीय)

# प्रबोधनाच्या पाऊलखुणा

## (म.साहित्य पत्रिकेच्या १९१२ ते १९४३ मधील निवडक लेखांच्या आधारे)

डॉ. सु. प्र. कुलकर्णी

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेला आता शंभराहून अधिक वर्षे झाली आहेत. याकरिता हा अंक शताब्दीपूर्ती अंक म्हणून प्रसिद्ध व्हावा; अशी संपादक मंडळाने इच्छा व्यक्त केली. गेल्या १०० वर्षातील संपूर्ण अंकांवरून नजर फिरविल्यावर असे दिसते की, महाराष्ट्र साहित्य पत्रिकेची स्थापना ही, मराठी भाषेतील ग्रंथांची दखल घेणे आणि कसलेल्या विद्वानांकडून ग्रंथपरीक्षण करून घेणे, ह्या प्रमुख उद्देशाने झाली आहे. मराठी भाषा, मराठी संस्कृती, मराठी वाङ्मय आणि इतिहास यावर संशोधन आणि समीक्षा करणे हाही उद्देश होताच. थोडक्यात, स्वभाषेबाबत जेवढे म्हणून लिहिता येईल तेवढे लिहून, मराठीभाषेचे वैभव प्रकाशात आणणे; त्याबरोबर हिंदुस्थानभर पसरलेल्या मराठी भाषिकांचे ऐक्य घडवून आणणे; हा हेतूही होता. इंग्रजी शिक्षणाने देशभर भाषाजागृतीची लाटच आली होती. प्रांतिक भाषेत, आपापल्या परीने स्वभाषासेवेचे ध्येय हाती घेऊन कार्य करणारे कार्यकर्ते निर्माण झाले. केवळ ज्ञानसंपादन, ज्ञानप्रसार आणि भाषिक चळवळीला वाहिलेल्या भाषिक संस्था निर्माण झाल्या. त्यात

महाराष्ट्र साहित्य पत्रिका

वा. गो. आपटे

विशेषत: काशीची नागरी प्रचारिणी सभा (स्थापना १८९३) कलकत्त्याची बंगीय साहित्य परिषद, गुजरातची – गुजरात व्हर्नाक्युलर सोसायटी (स्थापना १८४८), आंध्रमधील गीर्वाण भाषा-जागृति, सिंध प्रांतातील सिंधी साहित्य संमेलन परिषद (१९३५), अशा अनेक भाषा संस्था स्थापन झाल्या. ग्रंथनिर्मिती करणे, ग्रंथालय स्थापन करणे, साहित्य संमेलने भरविणे, उत्कृष्ट ग्रंथनिर्मितीचा गौरव करणे, भाषा-संस्कृती-इतिहासविषयक साधने गोळा करून त्यांची संगतवार जुळणी करणे. धार्मिक ग्रंथांचे समाजधारणेसाठी नव्याने अर्थ लावणे. स्वभाषेतील लोकवाङ्मय– विविध जातीजमातींची गाणी, म्हणी-वाक्प्रचार एकत्रित करून, ह्यातून लोकसंस्कृतीचे दर्शन घडविणे. अशा बहुविध उद्देशाने प्रेरित होऊन मराठी








साहित्यसेवकांच्या पिढ्या निर्माण झाल्या. ज्ञानसंपादन करण्यात आणि ज्ञानाचा प्रसार करण्यातच ह्या पिढीचे आयुष्य गेले. नव्याने ज्ञानसंपादन करताना स्वसमाजातील अनिष्ट रूढी, प्रथा-समजुती, ज्या समाजस्वास्थ्याविरोधी होत्या; त्यावर नुसती टीका करण्यापेक्षा सुधारणा घडवून आणण्यासाठी ही पिढी पुढे आली. स्वसमाजाचे दोष दाखविताना त्यांना स्वसमाजाकडून निंदाही सहन करावी लागली. 'इंग्रजधार्जिणे' म्हणून त्यांच्यावर शिक्का बसला. इंग्रज सरकारचीही त्यांच्यावर नजर होतीच. 'इकडे आड तिकडे विहीर' अशा उभयापत्तीत ही सुशिक्षितांची पहिली पिढी कार्यरत होती. त्यांनी राजकीय चळवळीत सक्रीय भाग घेतला नाही. इंग्रजी सत्तेचा उपयोग स्वसमाजाच्या उन्नतीसाठी होता होईल तो करावा, म्हणून ते सरकारशी समांतर राहिले. परंतु 'मवाळ' म्हणून त्यांचा उपहास झाला. त्या वेळी टिळकांचा 'राष्ट्रीय पक्ष', जहाल पक्ष म्हणून लोकप्रिय होता. 'जहाल' ह्या विशेषणाने ते ओळखले जात, क्रांतीकारकांचा रक्तरंजित-मार्ग 'ज्वलज्जहाल' म्हणून ओळखला जाई. ह्या मार्गावर जाण्याची 'हिंमत नव्हती' असे म्हणण्यापेक्षा तथाकथित मवाळ पक्षाचे ते 'धोरण नव्हते', असे म्हणणे योग्य होईल. सामान्य समाज दोन्हींच्या ओढाताणीत त्रिशंकू अवस्थेतला होता. देशाभिमानाने त्यांचे बाहू



स्फुरत आणि ज्ञानरंजनाने प्रबोधित होत. जहाल राष्ट्रीय पक्षाचे नेतेही ज्ञानमार्गीच होते. परंतु त्यांचे 'ज्ञानी' व्यक्तिमत्त्व, सर्वसामान्यांपर्यंत जे पोहोचले, ते प्रखर राष्ट्राभिमानी म्हणून! इंग्रज सरकारविरुद्ध असंतोषाची पिढी त्यांनी निर्माण केली. एक राष्ट्राभिमानाचा तेजस्वी झंझावात त्यांनी निर्माण केला. तो इतका प्रेरणादायी होता की, त्यात शिरीषकुमार, वसंत दाते, बाबू गेनू इ. सारख्या शाळकरी कोवळ्या मुलांचेही प्राणार्पण झाले. 'जशास-तसे' ह्या न्यायाने क्रांतिकारकांनी जुलमी इंग्रज अधिकाऱ्यांचा वध करून, स्वत: वधस्तंभाकडे राष्ट्रकार्य म्हणूनच चालत गेले. महात्मा गांधीजींच्या सत्य आणि अहिंसेच्या मार्गावरही अनेकांना प्राण गमवावे लागले; अथवा जन्मभर अपंग रहावे लागले. आजही त्या खुणा शरीरावर अभिमानाने मिरवणारे स्वातंत्र्यसैनिक गावोगावी आहेत.




राष्ट्रीय असंतोषाच्या झंझावाताशी समांतर अशी ज्ञानमार्गी प्रबोधनाची झुळूक, आपल्या परीने आपली भाषा, संस्कृती आणि ज्ञानाची विविधांगी क्षेत्रे उमलवीत होती. सुशिक्षितांची पहिली पिढी, भारताची वैचारिक बैठक खंबीर करीत होती. नव्या मराठी ग्रंथाचे जनक स. का. छत्रे, 'दर्पण'चे बाळशास्त्री जांभेकर, 'विविध ज्ञानविस्तार'चे रावसाहेब मोरमकर, 'आनंद'कर्ते वा. गो. आपटे, 'निर्णयसागर' छापखान्याचे पहिले मालक जावजी चौधरी, 'सत्यशोधक' म. फुले, 'सुधारक'चे आगरकर, 'ज्ञानप्रकाश'चे लोकहितवादी इ.मध्ये गोविंद नारायण माडगावकर ह्यांनी प्रसिद्धीपासून दूर राहून अध्यापनकार्य केले. 'ज्ञानप्रसारक'चे काम केले. पहिल्या पिढीचे ज्ञानमार्गी कसे होते, याचे चित्रण ह्या लेखात आहे.

**देवकल्पना**

समाजाच्या उन्नतीसाठी, विशेषत: धार्मिक रूढींनी ग्रस्त झालेल्या समाजात बहुविध प्रश्नांवर चर्चा होई. देवकल्पना, धर्मकल्पना, स्त्रीयांचे प्रश्न आणि राजकीय व सामाजिक समाजजीवनातील प्रश्नांची चर्चा.. इत्यादींना आपल्या कादंबऱ्यांमध्ये स्थान देणारे तात्त्विक कादंबरीकार कै. वामन मल्हार जोशी ह्यांच्या दोन कादंबऱ्यांचे परीक्षण हा त्या अंकातील मोठा भाग आहे. देव कसा आहे आणि कसकसा विकसित झाला याचे मनोवेधक चित्रण 'सुशीलेच्या देव'च्या परीक्षणाच्या निमित्ताने कळते. 'देवकल्पना' अखिल मानवजातीच्या कुतूहलाचा विषय आहे. देव दगडात नाही. देव माणसात आहे. परंतु देवमाणसे झाली तरी मातीचीच! अपूर्णतेचा शाप भोगणारीच आहेत. मग देवत्व म्हणजे पूर्णत्व! सर्व चांगल्या गोष्टींचे आनंदनिधान म्हणजे देव. एक परिपूर्ण चैतन्य! असे पूर्णत्व मिळविण्याच्या ध्येयाने वाटचाल करणे, म्हणजे देवत्व! ध्येय हाच देव! परंतु 'ध्येयाचे पूर्णत्व' ही संकल्पनाही अधुरीच आहे. कारण प्रत्येकाचे ध्येय भिन्न असते. दरोडेखोरांचाही ध्येय-देव असतोच. मग माझाच देव कसा श्रेष्ठ, हे समजावून सांगण्यासाठी वेगवेगळे धर्म आणि संप्रदाय निर्माण झाले. सुशिलेने तर बालपणी, देवांची कुस्ती लावली तर कोण जिंकेल? असा भाबडा प्रश्न विचारला. 'आकाशात हरभरे दळणारा देव' पासून ते विश्वात्मक चैतन्याचा, सर्वांचेच कल्याण करणारा ईश्वर आणि त्याचे पूर्णत्व कोणत्यातरी प्रतिमेत बसवून

महाराष्ट्र साहित्य पत्रिका






त्याची पूजा करायला सुरुवात झाली, तरीही प्रतिमांची बहुविध रूपे माणसाला गोंधळविणारी! शेवटी जसे लोक तशी त्यांची ध्येये आणि जसे लोक तसे देव! चौसष्ठ कोटी देव म्हणूनच निर्माण झाले असावेत! अखेर 'देवत्व' ही संकल्पना मानवी देहबुद्धीत सामावली जाऊ शकत नाही. माणसाच्या शरीर आणि बुद्धीला मर्यादा आहेत. म्हणूनच की काय, त्यांना संमिश्र प्रतिमांचा आधार घ्यावा लागला. दशावतारांबरोबरच, गजमुख, तीन-चार मुखे, चारभुजा, दशभुजा, नरसिंह, अर्धनारीनटेश्वर इत्यादी प्रकारे मानवी देहाकाराच्या बाहेर जाऊनही देवत्व अपुरेच! मग मानवी देहकल्पना सोडली! निसर्गात 'त्याचे' परिपूर्ण रूप दिसले! पंचमहाभूतात सामावलेले त्याचे रूप परिपूर्ण आहे. माणसाला आपले अपूर्णत्व निसर्गाच्या उत्कट-भव्य रूपात दिसते. मानवी जीवनाला समृद्ध करणारा निसर्गच आहे. लक्ष्मीची स्तुती करताना श्रीसूक्तात स्पष्ट म्हटले आहे–






*ॐ गंधद्वाराम्, दुराधर्षाम्, नित्यपुष्टाम् करीषिणीम् । ईश्वरीम् सर्वभूतानाम्, ताम् इह: उपव्हये श्रियम् ॥*

(जिचे अस्तित्व मातीच्या आणि पिकांच्या सुगंधाने लक्षात येते. जी अतिशय परिश्रमाने प्राप्त होते. धनधान्याने सर्वदा पूर्ण करणारी, गाई, अश्वादी पशूंची समृद्धी देणारी... सर्वांच्या अंतर्यामी परमेश्वरी असलेल्या विश्वात्मक लक्ष्मीला मी माझ्या घरी सन्मानाने बोलावतो.) अशा विश्वात्मक देवाची प्रचीती अखेर वाक्-यज्ञानेच होते. म्हणूनच शब्दब्रह्म श्रेष्ठ! कै. वामन मल्हार जोशींनी देवकल्पनेची जी चर्चा केली आहे ती सदाहरित आहे. शं. दा. पेंडसेंसारख्यांच्या विद्वान लेखणीतून ती उद्बोदक झाली आहे.

**विवाहसंस्था, स्त्री-पुरुष मैत्री इ.**

पहिल्या पिढीच्या सुशिक्षितांना घरोघरी होत असलेली स्त्री-जीवनाची विटंबना जाणवली असल्यास नवल नाही. ह. ना. आपटे, वा. म. जोशी, श्री. व्यं. केतकर ह्यांनी ह्या सामाजिक चळवळीला शब्दरूप दिले. 'सुशिलेचा देव' आणि 'इंदू काळे, सरला भोळे' ह्या कादंबऱ्यांच्या परीक्षणात प्रेमविवाह, मिश्रविवाह, 'लिव्ह-इन-रिलेशन्सशिप' इ. सर्व बाजूंची चर्चा आहे. ह्या सर्वांचे एकच प्रमुख प्रश्न सूत्र आहे की, विवाह म्हणजे 'पतिनिष्ठा की व्यक्तिविकास?' 'इंदू काळे, सरला भोळे' ह्या कादंबरीत हा विषय चर्चिला आहे. सरला पतिपरायण तर इंदू बेदरकार वृत्तीची! मनासारखा विवाह झाला नाही तर घटस्फोटाचा सरळ साधा मार्ग स्वीकारणारी! वैवाहिक जीवन विरुद्ध व्यक्तिविकास आणि ध्येयनिष्ठा हा आजही ताजा असलेला विषय प्रो. दे. द. वाडेकरांनी स्पष्ट केला आहे. स्त्री-पुरुष मैत्रीच्या मर्यादा– 'एकान्तात स्त्री-पुरुषांनी भेटू नये' असा निष्कर्ष आज कितपत स्वीकारार्ह आहे?







आद्य इंग्रजीतील कादंबरीकार रिचर्डसन ह्याच्या 'पत्ररूप कादंबरी'च्या प्रकाराची चर्चा प्रो. वाडेकरांनी सविस्तर केली आहे. पत्रे म्हणजे लेखी संवाद! १९१४ ते १९३४ च्या कालखंडातील विवाह-संस्थेची चर्चा आजही अपूर्ण आहे. विवाहसंस्थेला झुगारून देणारी स्त्री किंवा पुरुष अखेर असमाधानीच राहतात. मग ती वा. म. जोशींची इंदू असो की कादंबरीकार केतकरांची ब्राह्मणकन्या असो!

**इतिहास जागृती**

इतिहास-जागृतीच्या पाऊलखुणा दर्शविणारे 'पर्णालपर्वत-ग्रहणाख्यान' आणि 'इतिहास परिषद' ह्याविषयी अनुक्रमे भारताचार्य चिं. वि. वैद्य आणि रियासतकार गो. स. सरदेसाईंचे परीक्षण लेख ह्या अंकात समाविष्ट केले आहेत. महाराष्ट्राचा इतिहास – विशेषत: छ. शिवाजी महाराजांच्या अष्टपैलू व्यक्तिमत्त्वाचा इतिहास, हिंदी व इंग्रजी भाषेत लिहिला गेला नाही, म्हणून जागतिक पातळीवर तो मागे

राहिला. ही सरदेसाईची खंत आहे. जयराम कवीने तो इतिहास संस्कृतात काव्यबद्ध केला. त्याचे महत्त्व तो समकालीन कवी होता म्हणून आहे. इतिहासाची साधने केवळ गुणगानात आणि प्रासयुक्त रचनेत नसतात, तर ती किती इतिहासशुद्ध आहेत, ह्यात असतात. समकालीन लेखनांतर्गत पुरावे हेच इतिहासाचे अग्रसाधन आहे. रियासतकार सरदेसाईंनी इतिहासलेखनाचे मर्म सांगताना परकीय राजकारणी, इतिहासाला आपल्या पद्धतीने वळवितात आणि तसे लेखन होते. 'बुद्धीला काय खाद्य पुरवायचे ते इंग्रजांनी ठरवायचे' असे राज्यकर्त्यांचेच जिथे धोरण होते, तिथे खरा इतिहास कसा लिहिला जाईल? असा प्रश्न उपस्थित केला आहे. आजही इतिहासाला आपल्या पद्धतीने सांगणाऱ्या जातीय संघटना आणि राजकीय पक्ष आहेतच. ह्या शब्दारण्यातून खरे इतिहासलेखन कसे होणार? मराठ्यांच्या उच्च नीतीमत्तेचा राजकीय इतिहास, इंग्रजांच्या थापेबाजीमुळे, विकृत पद्धतीने लिहिला गेला. वासुदेवशास्त्री खरे आणि वि. का. राजवाडे यांनी जन्मभर दरिद्री राहून इतिहासाची साधने गोळा केली. 'भारत इतिहास संशोधन मंडळा'ची रीतसर स्थापना करून तेथे त्याचे जतन केले आहे.




**स्त्रियांचे लेखन**

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेत, ज्येष्ठ विदुषी (कु.) दुर्गा भागवत ह्यांनी कर्त्या सुधारकांचे अग्रणी कै. राजारामशास्त्री भागवत ह्यांनी प्रगतीशील धर्मचर्चेवर केलेली प्रवचने संपादित करून प्रदीर्घ लेख लिहिला आहे. मात्र ह्या अंकात तो घेणे म्हणजे अनेक वादाला तोंड फोडण्याचे निमित्त झाले असते आणि दुर्गाबाईंसारख्या विदुषीचा लेख संपादित करण्याचे धारिष्ट्य करणे नको म्हणून सदर एप्रिल १९४० च्या अंकातील लेख वाचण्यासाठी, पुढील अंकात देणार आहोत.




महाराष्ट्राच्या पहिल्या पिढीतील स्त्री-लेखकांचे कार्य बहुविध आहे. लक्ष्मीबाई टिळक (१८७० ते १९३६) – स्मृतिचित्रे, यशोदाबाई भट यांचे ऐतिहासिक स्त्री-रत्ने, आर्य स्त्री-रत्ने, राजमाता जिजाबाई इ. लेखन प्रसिद्ध आहे. यशोदाबाईंनी विधिज्ञ माधवराव भट यांच्याशी विवाह केल्यानंतर शिक्षण घेतले. असहकाराच्या चळवळीत भाग घेतला. वि. वा. भिडे यांच्या कन्या शांताबाई नाशिककर ह्यांनी पुनर्विवाह केला. माझी कोरीव लेणी (कादंबरी), लग्नाचा बाजार, हाच का धर्म?, साम्राज्यासाठी, चिखलातले कमळ इ. लेखन प्रसिद्ध आहे. ह्याबरोबरच इंदिराबाई सहस्रबुद्धे (केवळ ध्येयासाठी), आनंदीबाई जयवंत (यांची जगाशी बंडखोरी) गीता साने, पार्वतीबाई आठवले इ. अनेक लेखिकांमध्ये काशीबाई कानेटकर कादंबरीकार-कथाकार






अनुक्रमणिका




म्हणून प्रसिद्ध होत्या. ह्या अंकात त्यांनी लिहिलेले 'हरिभाऊ आपटे यांचे त्रोटक चरित्र', घेतले आहे. त्या हरिभाऊंच्या मानलेल्या भगिनी होत्या. ह. ना. आपटेंच्या मार्गदर्शनाने त्यांनी लेखनकार्यात प्रवेश केला. लक्ष्मीबाई टिळकांच्या 'स्मृतिचित्रे'ची लेखनशैली ह्यात पुरेपूर दिसते. हरिभाऊ आपटेंच्या अनेक अज्ञात गुणांचा त्यांनी परिचय करून दिला. विशुद्ध स्त्री-पुरुष मैत्रीचे दर्शन ह्यात घडते.

चित्रपट आणि भाषाभगिनींचे संदर्भ कळावेत म्हणूनही त्यांबाबतच्या लेखांची निवड केली आहे. तसेच जुन्या-नव्या सुपरिचित काव्यचर्चेवरील लेख टाळून 'चित्रकाव्य' ह्या विस्मृत काव्यप्रकारावर इंदूरच्या रा. बळवंतराव कमळापूरकर यांचा लेख ह्या अंकात समाविष्ट केला आहे.

महाराष्ट्राच्या सांस्कृतिक, सामाजिक आणि राजकीय विचारांचे विहंगमावलोकन घडावे, हा ह्या अंकाचा हेतू निवडक दहा लेखांमधून घडतो किंवा नाही, ते वाचकांनीच ठरवावे. हे संपादकीय त्या दृष्टीने अपूर्ण आहे. प्रत्येक लेखाला छोटे संपादकीय लिहून पूर्तता करण्याचा प्रयत्न केला आहे. ह्यासाठी पत्रिकेच्या पहिल्या तीस वर्षांचा १९१३ ते १९४३ हा कालखंड निवडला आहे. मागील अंकांमधून पत्रिकेच्या जन्मकथेविषयी लिहिलेले आहेच. पुनरावृत्तीचा दोष टाळण्यासाठी तो भाग येथे घेतला नाही.




## आभार

हा अंक तयार करताना म.सा.प.च्या कै. वा. गो. आपटे संदर्भ-संशोधन ग्रंथालयातील कर्मचाऱ्यांचे मोलाचे सहकार्य झाले. विशेषत: तरुण कार्यवाह, ग्रंथालय समिती व संगणकतज्ज्ञ श्री. महेन्द्र मुंजाळ यांनी मी निवडलेले लेख संगणकाद्वारे नकलून दिले; म्हणून जीर्ण झालेल्या पत्रिकेच्या अंकाच्या पानांची जपणूक झाली.

म.सा.प.च्या कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य, प्रमुख कार्यवाह श्री. प्रकाश पायगुडे, कोषाध्यक्ष श्री. सुनील महाजन ह्यांचेही आभार! संपादक मंडळातील डॉ. कल्याणी दिवेकर, नंदा सुर्वे, डॉ. किसन पाटील, श्री. महेन्द्र मुंजाळ, श्री. श्याम जोशी आणि प्रकाशक प्रकाश पायगुडे ह्यांनीही वेळोवेळी केलेल्या मार्गदर्शनाबद्दल आभार मानून हे संपादकीय श्री ज्ञानदेवांच्या शब्दांनी पूर्ण करतो–

*'सारस्वताचे गोड । तुम्हींचि लाविले झाड ।*
*तरी अवधानामृताचे वाड । सिंपौनी की जो ॥*

सु. कुलकर्णी

संपादक

महाराष्ट्र साहित्य-पत्रिका, पुणे ३०, फोन- ९७६७६९९३१९
संपर्क : ७ 'सूर', गायकवाड वसाहत, सावेडी मार्ग,
अहमदनगर ४१४ ००३. दूरभाष : ०२४१-२४२९७५५
भ्रमणभाष : ९७६७६९९३१९

# ह्या अंकातील शुद्धलेखनाबाबत

डॉ. लीला गोविलकर

*[पत्रिकेच्या या वर्षीच्या शताब्दीपूर्ती अंकामध्ये आपल्या पत्रिकेच्या १९१२ ते १९४३ या कालखंडातील निवडक लेखन, आजच्या संमत असलेल्या शुद्धलेखनानुसार (म्हणजे मूळच्या लेखातील तत्कालीन शुद्धलेखनाला सुधारित करून) करावे की, तत्कालीन शुद्धलेखनाच्या स्वरूपात (म्हणजे जसेच्या तसेच) ठेवावे; या संदर्भात व्याकरणतज्ज्ञ डॉ. लीला गोविलकर यांचा सल्ला विचारात घेऊन, ते लेखन 'जसेच्या तसेच' उद्‌धृत केले आहे. यासंबंधी त्यांनी दिलेले टिपण.*

*–संपादक]*

मराठी साहित्य महामंडळाने १९६२ मध्ये तयार केलेले व १९७२ मध्ये वाढविलेले, महाराष्ट्र राज्य शासनाने स्वीकारलेले शुद्धलेखन-नियमच आपण सध्या अनुसरत आहोत. त्यापेक्षा १९४२ च्या नियमांमध्ये काही प्रमाणात वेगळेपणा/बदल असणे स्वाभाविक आहे.

हा बदल किंवा वेगळेपणा मुख्यत्वे अनुच्चारित अनुस्वारांच्या संदर्भातील आहे. तेव्हाच्या कालखंडामध्ये (अ) मूळ नामांच्या रूपात (गावं, नावं इत्यादी), (आ) नपुंसकलिंगी नामाच्या अन्त्याक्षरी (तळें, गळूं, जाळें, इत्यादी), (इ) अनेकवचन दर्शक (घरें, कमळें, उपवनें – प्रथमारूपे, मुलांकडून, पुस्तकांमधून – विभक्तिप्रत्ययान्त अनेकवचने इ.), (ई) विभक्ती-प्रत्ययामधील (पुण्यांत, नगरीं, गावोगावीं, तिनें, त्यानें इत्यादी), (उ) वाक्यरचनेतही 'तिनें पुस्तक वाचलें' असे क्रियापदाच्या रूपामधील, (ऊ) 'मी (तिनें) कागद फाडला' अशा वाक्यांत 'मी' सर्वनामाची तृतीया विभक्ती लक्षात येण्यासाठी अशा अनुच्चारित अनुस्वारांवर भर असे.

तसेच 'करावयाचे, सांगावयाला, जावयाला' अशा धातुसाधितांवर लेखनात भर आहे. आज त्यांच्याऐवजी 'करायला, सांगायला, जायला' ही रूपे संमत आहेत. तेव्हांच्या 'करीत, वाचित' यांसारख्या रूपांऐवजी आज 'करत, वाचत' असे लेखन होऊ लागले आहे.

**इ-ई. उ-ऊकारान्त** तत्सम व तद्‌भव नामे दीर्घान्त लिहावीत, हा नियमही पूर्णपणे पाळला जात नसे. 'म्हणिजे, म्हणावे' इत्यादी शब्दांमधील 'म्ह'चे लेखनही संस्कृतानुसारी म्हणजे 'ब्रह्म' मधील लेखनासारखे करण्याकडे कल होता.

**अनुच्चारित अनुस्वार**

* एकारान्त नपु. नामांची एकवचने – नातें, जातें
* एकारान्त नपु. सर्वनामांची एकवचने – तें, जें, हें
* एकारान्त नपु. नामांची अनेकवचने – रत्नें, कूटें, नातीं, मतें
* एकारान्त नपु. सर्वनामांची अनेकवचने – तीं, हीं, जीं
* नपु. नामांची विशेषणे – त्याचें मन, माझें मत, तुमचीं मतें,



अनुक्रमणिका

* कोणत्याही नामांच्या अनेकवचनाला विभक्तिप्रत्ययान्त / शब्दयोगी अव्ययान्त जोडण्यापूर्वीची अनुनासिके – लोकांस, वृद्धांस, अंगांपैकी, सर्वांस, पर्वतांवर, आम्हांस, तुम्हांस – सर्वनामे

('ला' या द्वितीया – चतुर्थीप्रत्ययाऐवजी 'स' योजण्याकडे कल)

* सप्तमी, तृतीया – ईं – कामीं, मध्यभागीं, कोणीं, आरंभीं ज्याअर्थी, त्याअर्थी, समयीं (समयचे सप्तमीचे रूप) काळांत,

तृतीयेच्या 'नें' ऐवजी क्वचित् णें'

शब्दयोगी अव्यये – ऐवजीं, मध्यें, वांचून, पावेतों, प्रमाण, करितां, आंत, पेक्षां, मुळें. सामान्यपणे अनेक क्रियाविशेषणअव्ययेही अनुस्वार स्वीकारतात. पुढें, कांहीं, एकाएकीं, कधीं, जेथें, तेथें, तेव्हां, आतां, कीं, कां

* क्रियापदे वा धातुसाधिते यांच्या रूपातही अनुस्वार देण्याची प्रथा करूं, नाहीं, नाहींत, (असें) नसतें, लक्षांत असतां.

* प्रथमान्त कर्ता असल्यास वर्तमानकाळी क्रियापदाच्या रूपावर अनुस्वार – मी करितों, करित्यें

* क्रियापदाच्या रूपात मध्ये 'इ' – ठेवितात, करितात.

* इ-उ (ऱ्हस्व इ व ऱ्हस्व उ) संस्कृतप्रमाणे लिहिण्याकडे प्रवृत्ती. वायु, रिपु, शत्रु, मारुति, पति, प्रवृति इ.

शुद्धलेखनाचे व व्याकरणाचे मूळ रूप कायम ठेवून 'जसेच्या-तसे' उद्धृत करण्याने तत्कालीन लेखनाचा – भाषिक दस्तऐवजच वाचकांकरिता भविष्यकाळासाठी जतन केला जाईल, ही भाषाशास्त्रीय दृष्टीही लक्षात घेतली आहे.

डॉ. लीला गोविलकर
प्राध्यापक वसाहत, चैतन्यनगर,
अहमदनगर ४१४००३







# महाराष्ट्र साहित्य परिषदेचे पहिले कार्यकारी मंडळ

(९ मार्च १९१३)

**अध्यक्ष**

विष्णु मोरेश्वर महाजनी, एम्. ए., अकोले

**उपाध्यक्ष**

डॉ. सर भालचंद्र कृष्ण भाटवडेकर, एल्.एम्., मुंबई

डॉ. सर मोरेश्वर गोपाळ देशमुख, एम्.डी., बी.एस्सी.

दामोदर गणेश पाध्ये, एम्.ए.

हरि नारायण आपटे, पुणे

रघुनाथ पांडुरंग करंदीकर, सातारा

**चिटणीस**

वासुदेव गोविंद आपटे, बी.ए., पुणे

रामकृष्ण ऊर्फ रावसाहेब रघुनाथ मोरमकर

**खजिनदार**

भास्कर महादेव पंडित, बी.ए., मुंबई

**सभासद**

१) नारायण गणेश परांजपे, सांगली

२) दामोदर सावळाराम यंदे, मुंबई

३) तुकाराम जावजी चौधरी, जेपी, मुंबई

४) रामचंद्र बाळकृष्ण कीर्तीकर, मुंबई

५) रा.रा. मोरो विश्वनाथ जोशी, एल्.एल्.बी., अमरावती

६) रा.रा. अच्युत सीताराम साठे, एम्.बी.बी.एस्., अमरावती

७) रा.रा. रामचंद्र विष्णु महाजनी, एल्.एल्.बी., अकोले

८) रा.सा. केशव गोविंद दामले, एल्.एल्.बी., अकोले

९) श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, एल्.एल्.बी., खामगाव

१०) न. चि. केळकर, एल्.एल्.बी., पुणे

११) लक्ष्मण गणेशशास्त्री लेले, एल्.एल्.बी., पुणे

१२) प्रो. चिंतामणी गंगाधर भानु, बी.ए., पुणे

१३) दत्तात्रेय बळवंत पारसनीस, सातारा

१४) विष्णु रघुनाथ लेले, सोलापूर

१५) नीळकंठ पांडुरंग पाटणकर, एल्.एल्.बी., नासिक

१६) गणेश कृष्ण चितळे, एल्.एल्.बी., अ.नगर

१७) गोविंद रामचंद्र ओक, बेळगाव

१८) रामचंद्र नरसिंह रणसिंग, धुळे

१९) पांडुरंग वामन काणे, एम्.ए., एल्.एल्.बी., मुंबई

२०) आर. व्ही. खेडकर (MDIKCS) स्टेट सर्जन, कोल्हापूर

विविधज्ञान विस्तार कचेरी,<br>
फणसवाडी, मुंबई नं. २<br>
दि. ९ मार्च २०१३

*



अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ३०
# विश्वस्त, अध्यक्ष, उपाध्यक्ष, कार्यकारी मंडळ
# (२०११ ते २०१६)

| | |
|---|---|
| १) ॲड. भास्करराव आव्हाड | विश्वस्त मंडळ अध्यक्ष |
| २) प्रा. डॉ. शिवाजीराव कदम | कार्यकारी विश्वस्त |
| ३) आ. उल्हासदादा पवार | विश्वस्त सदस्य |
| ४) प्रा. द. मा. मिरासदार | अध्यक्ष म.सा.प. (फेब्रुवारी २०१२ पर्यंत) |
| ४) डॉ. प्र. चिं. शेजवलकर | अध्यक्ष (मार्च २०१२ पासून) |
| ५) डॉ. रावसाहेब कसबे | उपाध्यक्ष |
| ६) डॉ. द. ता. भोसले | उपाध्यक्ष |
| ७) श्री. चंद्रकांत शेवाळे | उपाध्यक्ष |
| ८) डॉ. माधवी दिलीप वैद्य | कार्याध्यक्ष |
| ९) प्रा. मिलिंद जोशी | प्रमुख कार्यवाह (१९ मार्च २०१३प.) |
| १०) श्री. प्रकाश बाळकृष्ण पायगुडे | प्रमुख कार्यवाह (नियुक्ती १९ मे २०१३ पासून) |
| ११) श्री. सुनील प्रभाकर महाजन | कोषाध्यक्ष |
| १२) डॉ. सु. प्र. कुलकर्णी | संपादक, महाराष्ट्र साहित्य पत्रिका |
| १३) श्री. दीपक कृष्णाजी करंदीकर | स्थानिक कार्यवाह क्र.१ (व्याख्याने व स्मृतिदिन) |
| १४) डॉ. कल्याणी दिवेकर | स्थानिक कार्यवाह क्र.२ (विशेष पारितोषिके) |
| १५) श्रीमती नंदा सुर्वे | स्थानिक कार्यवाह क्र.३ (वार्षिक ग्रंथपारितोषिके) |
| १६) सौ. सुनीताराजे किसन पवार | स्थानिक कार्यवाह क्र.४ (परीक्षा विभाग) |
| १७) श्री. महेंद्र मुंजाळ | स्थानिक कार्यवाह क्र.५ (ग्रंथालय विभाग) |
| १८) ॲड. प्रमोद ज्ञानेश्वर आडकर | स्थानिक कार्यवाह क्र.६ (वास्तु, अतिथीनिवास देखभाल) ९ मार्च २०१३पर्यंत. नंतर महामंडळाचे निवडणूक अधिकारी म्हणून नियुक्ती |

| | |
|---|---|
| १९) डॉ. रुपाली शिंदे | पुणे शहर प्रतिनिधी नियुक्ती १९ मे २०१३ |
| २०) डॉ. अरविंद संगमनेरकर | पुणे शहर प्रतिनिधी |
| २१) डॉ. सतीश देसाई | पुणे शहर प्रतिनिधी |
| २२) डॉ. सु. प्र. कुलकर्णी | अहमदनगर जिल्हा प्रतिनिधी |
| २३) प्रा. मेधा यशवंत काळे | अहमदनगर जिल्हा प्रतिनिधी |
| २४) डॉ. पुरुषोत्तम दत्तात्रेय काळे | पुणे जिल्हा प्रतिनिधी |
| २५) श्री. राजन बाबुराव लाखे | पुणे जिल्हा प्रतिनिधी |
| २६) श्री. पद्माकर मा. कुलकर्णी | सोलापूर जिल्हा प्रतिनिधी/कार्यवाह, विभागीय संमेलने |
| २७) ॲड. जयंत जगन्नाथ कुलकर्णी | सोलापूर जिल्हा प्रतिनिधी आणि पुण्याबाहेरचे कार्यवाह |
| २८) डॉ. किसन पाटील | जळगाव जिल्हा प्रतिनिधी |
| २९) श्री. रविंद्र बेडकिहाळ | सातारा जिल्हा प्रतिनिधी |
| ३०) श्री. पांडुरंग केशव दातार | ठाणे जिल्हा प्रतिनिधी |
| ३१) श्री. प्रभाकर अनंत संत | ठाणे जिल्हा प्रतिनिधी |
| ३२) श्री. पद्माकर शिरवाडकर | ठाणे जिल्हा प्रतिनिधी |
| ३३) श्रीमती प्रतिभा पु. लिमये | रत्नागिरी, रायगड जिल्हा प्रतिनिधी |
| ३४) श्री. राजन मुठाणे | कोल्हापूर जिल्हा प्रतिनिधी आणि पुण्याबाहेरचे कार्यवाह |
| ३५) श्री. प्रकाश केदूजी होळकर | नाशिक जिल्हा प्रतिनिधी |
| ३६) डॉ. शशिकला पवार | धुळे, नंदुरबार जिल्हा प्रतिनिधी |
| ३७) वृषाली विलास आफळे | सांगली जिल्हा प्रतिनिधी |
| ३८) श्री. श्याम जोशी | स्वीकृत सदस्य |
| ३९) श्री. उद्धव कानडे | स्वीकृत सदस्य |

◆◆◆



अनुक्रमणिका






# महाराष्ट्र साहित्य पत्रिका व तिचे संपादक

**('महाराष्ट्र साहित्य पत्रिकेला' लाभलेले कालानुक्रमे संपादक)**

*[ऑगस्ट १९१३ ते मे १९२५ पर्यंत महाराष्ट्र साहित्य पत्रिका 'विविधज्ञान विस्ताराला' जोडून 'रॉयल ऑक्टेव्हो' आकारात केवळ १२ पानांच्या मर्यादेत अनियमित प्रसिद्ध होत होती. ह्या पुरवणीचे संपादक म्हणून विशिष्ट नावाचा उल्लेख नव्हता : असे असले तरी, श्री. वि. मो. महाजनी, हेच काम पहात होते. वा. गो. आपटे, न. चिं. केळकर, बा. अ. भिडे, ना. गो. चापेकर, रावसाहेब मोरमकर इ. संघटितपणे संपादनाचे कार्य करीत होते. पुढे फेब्रुवारी १९२८ पर्यंत पत्रिका बंद पडली होती. ती स्वतःच्या पायावर त्रैमासिक स्वरूपात स्वतंत्रपणे प्रकाशित होऊ लागली. त्यानंतर म्हणजे मार्च १९२८ पासून पत्रिका, त्रैमासिक स्वरूपात नियमितपणे प्रसिद्ध होऊ लागली. ती पुढीलप्रमाणे —*

*—संपादक, म.सा.पत्रिका]*

| | | | |
|---|---|---|---|
| ना. गो. चापेकर | मार्च १९२८-मार्च १९३३. | के. नारायण काळे | जुलै १९६५ - मार्च १९७०. |
| द. वा. पोतदार | जुलै १९३३-मार्च १९३६. | स. गं. मालशे | एप्रिल १९७०-मार्च १९७३. |
| मा. त्र्यं. पटवर्धन | एप्रिल १९३६-एप्रिल १९३७. | भालचंद्र फडके | एप्रिल १९७३ - मार्च १९७६. |
| मो. ज्ञा. शहाणे | जुलै १९३७-ऑक्टो. १९३९. | हे. वि. इनामदार | एप्रिल १९७६-मार्च १९७९. |
| के. नारायण काळे | जाने. १९४०-ऑक्टो. १९४२. | आनंद यादव | एप्रिल १९७९-मार्च १९८२. |
| रा. श्री. जोग | जाने. १९४३-मार्च १९४६. | भीमराव कुलकर्णी | एप्रिल १९८२-मार्च १९८५. |
| के. नारायण काळे | एप्रिल १९४६-ऑगस्ट १९४६. | वसंत स. जोशी | एप्रिल १९८५-एप्रिल १९८८. |
| श्री. म. माटे | मार्च १९४७ (८१-८१ जोडअंक) | शंकर सारडा | जुलै १९८८-मार्च१९९२. |
| | | वि. स. वाळिंबे | एप्रिल १९९२-मार्च १९९५. |
| य. दि. पेंढरकर | एप्रिल १९४७ - जून १९५०. | शंकर सारडा | एप्रिल १९९५-मार्च १९९७. |
| रा. शं. वाळिंबे | जुलै १९५० - मार्च १९५१. | ह. ल. निपुणगे | एप्रिल १९९७-मार्च २००१. |
| रा. श्री. जोग | एप्रिल १९५१ - मार्च १९५२. | अरविंद वामन कुलकर्णी | एप्रिल २००१-जुलै २००३. |
| वि. भि. कोलते | एप्रिल १९५२-मार्च १९५५. | गं. ना. जोगळेकर | ऑक्टो. २००३-एप्रिल २००४. |
| वा. रा. ढवळे | एप्रिल १९६३-डिसें. १९६३. | सु. प्र. कुलकर्णी | जुलै २००४ पासून आजपावेतो. |
| श्री. के. क्षीरसागर | जाने. १९६४ - एप्रिल १९६५. | | |

*



अनुक्रमणिका



# श्रद्धांजली!

## कै. (डॉ.) म. वि. गोखले
## (निधन-२८ ऑगस्ट २०१३)

कै. (डॉ.) म. वि. गोखले हे १९९२ ते १९९५ असे म. सा. प.चे कार्याध्यक्ष होते. त्यापूर्वी सहा वर्षे त्यांनी कार्यवाह म्हणून काम केले. मिष्कील स्वभावाचे डॉ. गोखले यांनी 'मराठीतील आरत्या' ह्या विषयावर पीएच्. डी.साठी प्रबंधलेखन केले. नेस वाडिया कॉलेजमध्ये ते मराठी विभागप्रमुख होते. मराठी नाट्यशास्त्राचा त्यांचा विशेष अभ्यास होता. शालेय विद्यार्थ्यांसाठी त्यांनी अनेक विषयांवर पुस्तके लिहिली. कै. मामासाहेब दांडेकर ह्यांच्या स्मृतिप्रित्यर्थ त्यांनी संतवाङ्मयावरील ग्रंथास पारितोषिक ठेविले आहे.

कै. गोखले यांच्या दिवंगतह आत्म्यास चिरशांती लाभो!

महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे त्यांना भावपूर्ण श्रद्धांजली!

---



## कै. रत्नाकर कुलकर्णी
## (निधन-१६ सप्टेंबर २०१३)

कै. रत्नाकर अनंतराव कुलकर्णी, सुविख्यात कॉन्टिनेन्टल प्रकाशनाचे एक भागीदार, महाराष्ट्र साहित्य परिषदेचे आठ वर्षे कोषाध्यक्ष आणि तीन वर्षे कार्यवाह म्हणून त्यांनी मोलाचे कार्य केले. अखिल भारतीय साहित्य महामंडळावरही त्यांनी काम केले. कोषाध्यक्ष म्हणून त्यांचा सखोल अभ्यास होता. सर्वसाधारण सभेत एक सदस्य म्हणून ते नेमके व मार्मिक मार्गदर्शन करीत. महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे ते एक मार्गदर्शकही होते. साहित्य परिषदेवर त्यांचे अतोनात प्रेम होते. त्यांच्या लाघवी आणि मनमिळावू स्वभावाने त्यांनी मोठा मित्रपरिवार जमा केला होता.

देखणे हस्ताक्षर, नेमके इतिवृत्तलेखन, बिनचूक हिशोबलेखन ही त्यांची वैशिष्ट्ये होती. अत्यंत वक्तशीर म्हणून ते ओळखले जात. त्यांनी लिहिलेली हिशोबाची इतिवृत्ते म्हणजे एक वस्तुपाठच आहे. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या घटना-दुरुस्ती समितीचे ते निमंत्रक होते. त्यांनी सुमारे ८-१० सभा घेऊन नियोजित घटना-दुरुस्तीचे प्रारूपही तयार करून ठेवले



अनुक्रमणिका

आहे. नव्या कार्यकारी मंडळाने ते काम आता हाती घेतले आहे. नव्या समितीला त्यांनी करून ठेवलेल्या घटना-दुरुस्ती प्रारूपाचा मोठा आधार वाटतो आहे. पुढील सभांमध्ये त्यांना बोलावून त्यांच्या मार्गदर्शनाने योग्य त्या दुरुस्त्यांसह अंतिम प्रारूप तयार करावयाचे होते. त्याच्या आतच त्यांना, वयाच्या ६५ व्या वर्षीच, आपल्यातून जावे लागले, ही ईश्वरेच्छा!

ईश्वर त्यांच्या दिवंगत आत्म्यास चिरशांती देओ!

महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे त्यांना भावपूर्ण श्रद्धांजली!

– महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

(टीप : कै. रत्नाकर कुलकर्णी यांचे, लेखाच्या अग्रभागी छापलेले 'स्केच' 'मसाप'चे माजी कोषाध्यक्ष, चित्रकार श्री. नानासाहेब जोशी यांनी रेखाटले आहे.)





अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेने संपादित केलेला

# मराठी वाङ्मयाचा इतिहास

*

**खंड १ ला :** रु. ५००/-
**खंड २ रा :** भाग १ : रु. ७००/- व भाग २ : रु. ७००/-
**खंड ३ रा :** रु. ३५०/-
**खंड ४ था :** रु. ४००/-
**खंड ५ वा :** भाग १ : रु. ३५०/- व भाग २ : रु. ३५०/-
**खंड ६ वा :** भाग १ : रु. ३५०/- व भाग २ : रु. ३००/-
**खंड ७ वा :** भाग १ : रु. ७००/-, भाग २ : रु. ८००/-, भाग ३ : रु. ७००/- व भाग ४ : रु. ७००/-

**एकूण रु. ७०००/- (रु. सात हजार मात्र)**

**शाळा, महाविद्यालये आणि व्यक्तिगत ग्राहकांनाही रु. ५२५०/- (रु. पाच हजार दोनशे पन्नास मात्र)**

**डिमांड ड्राफ्टने आगाऊ पाठविल्यास संपूर्ण संच आमच्या खर्चाने रेल्वे अगर एस.टी. पार्सलने पाठवू.**
**(वरील संचातील सुटे भाग हवे असल्यास ग्रंथविक्रेत्यांना २५ टक्के सूट.**
**व्यक्तिगत ग्राहकांना व संस्थांना १५ टक्के सूट. टपाल खर्च वेगळा.)**




: मागणीसाठी संपर्क :

**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे – ४११ ०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३

# चित्रकाव्य

**लेखक : कै. रा. रा. बळवंतराव कमळाकर, इंदूर**

*[वर्णांच्या वैशिष्ट्यपूर्ण रचनेने शब्द आकाराला येतो; आणि तो एक कूटचित्र, प्रहेलिका, एक गतिचित्र, स्वरचित्र, बंधचित्र आकाराला येतात. बुद्धीला चकित करतात. कवीचे बुद्धिचातुर्य हाच ह्या काव्याचा आधार आहे. शब्दांच्या चकित करावयाला लावणाऱ्या रचनाबंधातून शब्द आणि अर्थाचा लंपडाव हा काव्यबंध, चित्रकाव्याचे आद्य कवी विठ्ठल ह्यांनी सुरू केला. –संपादक]*

चित्रकाव्य ह्या शब्दाचे, प्रधानतेनें चित्रांनी युक्त जें काव्य तें, किंवा चित्र ह्मणजे चमत्कार यांनीं युक्त जें काव्य तें, किंवा चित्रविचित्र जें काव्य तें, अशा रीतीनें अनेक अर्थ संभवतात. तथापि अलंकारशास्त्रांत चित्रकाव्याचें लक्षण "ध्वनिरहित जें काव्य तें चित्रकाव्य[१]" असें केलेलें आहे. ह्या योगानें शब्दालंकार आणि अर्थालंकार हे सर्व चित्रकाव्यांतच येतात. परंतु मला ह्या निबंधांत त्या सर्वांविषयीं विचार करावयाचा नसून शब्दालंकारांत जो एक 'चित्र' नामक अलंकार आहे, त्याच्या विस्ताराविषयीं विचार करावयाचा आहे. चित्रालंकाराचें लक्षण काव्यप्रकाशांत "तच्चित्रं यत्र वर्णानां खड्गाद्याकृति हेतुता–" ह्मणजे जेथें वर्णरचनेच्या योगानें खड्गादिक पदार्थांच्या आकृति साधल्या असतात तेथें चित्र नामक अलंकार होतो, असें केलें आहे. त्यांत जरी आकृति साधण्याचा उल्लेख आहे. तरी अलंकारशास्त्राच्या कित्येक ग्रंथांत ह्या अलंकाराचे जे पोटभेद केले आहेत, त्यांत, स्वरचित्र, गतिचित्र, कूटें, अंतर्लापिका, बहिर्लापिका, प्रहेलिका, इत्यादिक अनेक प्रकारच्या शब्दप्रधान काव्यांचा समावेश केलेला दिसतो. त्यामुळें ह्या अलंकाराचा इतका मोठा विस्तार झाला आहे कीं, त्यास 'चित्रकाव्य' ही एक स्वतंत्र संज्ञा प्राप्त होऊन तो एक स्वतंत्र ग्रंथाचा विषय झाला, आणि संस्कृत भाषेंत चित्रकाव्यावर अनेक स्वतंत्र ग्रंथही लिहिले गेले. त्याप्रमाणें मराठी भाषेंत अद्याप झालेलें नाही. ह्मणून मी या निबंधांत त्या काव्याचें थोडेंसें दिग्दर्शन करण्याचा विचार केला आहे.

२. चित्रकाव्य हें मोठें मनोरंजक काव्य आहे. विशाल सृष्टीच्या उंच उंच पर्वतशृंगांवर आरोहण करून तिच्या भव्य देखाव्यानें, किंवा घनारण्यांत संचार करून त्याच्या नैसर्गिक सौंदर्यानें, मनास संतोषविणारे प्रगल्भ विचाराचे लोक जगांत फारच थोडे आहेत. पण आपल्या घरासमोरच निर्मिलेल्या लहानशा कृत्रिमोपवनांतच विहार करून मनास तोषविणारे लोक अनेक आहेत, हें कोणीही समंजस मनुष्य कबूल केल्यावांचून राहणार नाहीं. त्याप्रमाणेंच काव्यरसास्वादनाचा प्रकार आहे. केवळ कल्पनामय सृष्टीच्या चमत्काराचा भव्य देखावा पाहून संतुष्ट होणाऱ्या लोकांपेक्षां, ज्यांत विशेष विचार न करितां केवळ दर्शमात्रानेंच किंवा श्रवणमात्रें करूनच तात्कालिक आनंद उत्पन्न होतो, अशाच काव्यावर लुब्ध होणारे लोक विशेष आहेत. तेव्हां चित्रकाव्य हें पहिल्या प्रकारच्या लोकांस जरी आवडणार नाहीं तरी दुसऱ्या प्रकारचे लोक त्याजवर लुब्ध झाल्यावांचून खचित राहाणार नाहींत. असें नसतें तर आजपावेतों त्याचा



अनुक्रमणिका

इतका प्रसार आणि विस्तारही झाला नसता. ज्याअर्थी तो झाला आहे त्याअर्थी तें लोकांस रुचलें ही गोष्ट सिद्धच आहे.

३. आतां चित्रकाव्याचा उगम आणि प्रसार कसा झाला, ह्याविषयीं ऐतिहासिक दृष्टीनें थोडा विचार करूं. ज्या समयीं काव्यरचनेची कल्पना लोकांत उत्पन्न झाली असेल त्या समयीं मनोरंजनाच्या मार्गाचा शोध करितांना कवितेंत स्वाभाविक रीतीनें येणारें जें वर्णसाम्य तें आलेलें पाहून त्यांस आनंद वाटला असेल; व हें एक तात्कालिक मनोरंजनाचें साधन आहे असें समजून त्यांनीं शब्दालंकाराचे नियम ठरविले, व जसजसे त्यांचे विचार प्रगल्भ होत चालले तसतसें अर्थचमत्काराकडे त्यांचें मन लागून अर्थालंकार, रस, ध्वनि, इत्यादिकांचे नियम ठरविण्यांत आले. ह्यावरून अर्थालंकारादिक अर्थचमत्कृतिप्रधान रसध्वन्यादिकांपेक्षां शब्दालंकाराची उत्पत्ति फार प्राचीन आहे असें दिसतें. ह्या गोष्टीस, संस्कृतांतील अलंकारशास्त्रांचे लक्षणग्रंथांत चांगला पुरावा मिळतो. त्यांत जितके प्राचीन ग्रंथ पाहावे तितक्यांत शब्दचमत्कारांचें वर्णन विशेष आढळतें; आणि त्यामागून झालेल्या ग्रंथांत अर्थचमत्काराचें वर्णन विशेष असतें. तात्पर्य, शब्दालंकार हे ऐकल्याबरोबर तात्काल कर्णमधुर लागतात. ह्यामुळें त्यांकडे लोकांचें मन प्रथम वेधलें जातें. ह्मणून त्यांची उत्पत्ति पूर्वी होणे स्वाभाविकच आहे; व शब्दचमत्कार हा आबालवृद्धांस व अल्प विचाराच्या लोकांसदेखील आनंद देणारा असल्यामुळें रसिकांचें त्याकडे विशेष लक्ष वेधलें गेलें. आरंभी अनुप्रास, यमक इत्यादि अलंकार उत्पन्न झाले. नंतर पद्यांत कांहीं नांवें किंवा मंत्र साधण्याची युक्ति निघाली; व त्यापुढें काव्यांत जसजसें कलेचें मिश्रण अधिकाधिक होत चाललें तसतशीं, एक वर्णाचीं, दोन वर्णाचीं, तीन वर्णाचीं पद्यें, उलटींसुलटीं सारखी वाचलीं जाणारीं पद्यें,–करण्याचा प्रघात पडला. व नंतर पद्यांत पदार्थांच्या आकृति साधण्याची कल्पना निघून ह्या प्रकारच्या चित्रकाव्याचा विस्तार झाला.

४. आतां चित्रकाव्याची प्रवृत्ति कधीपासून झाली ह्याविषयीं विचार पाहातां असें दिसते कीं, संस्कृत भाषेंतील आद्यकवि जे वाल्मीकि त्यांणीं रामायण नामक महाकाव्यांत कांहीं नियमित अध्यायांच्या आरंभींच्या अक्षरांत गायत्रिमंत्राचा बंध साधला आहे. नंतर व्यासांनी अग्निपुराणांत चित्रकाव्याचें चांगलें विस्तारपूर्वक वर्णन केलें आहे. श्रीमद्भागवतांतील गोपीगीतांत एक गुणबंध साधला आहे. बौद्धकालांत वाग्भट ह्यांनीं आपल्या वाग्भटालंकार नामक ग्रंथांत चित्रकाव्याची लक्षणें दिलीं आहेत. त्याचप्रमाणें दंडीच्या काव्यादर्शांत व भोजकृत सरस्वतीकंठाभरणांतही अनेक प्रकारें चित्रकाव्याचें वर्णन केलें आहे. दंडीनें दशकुमारचरितांत ७ वा उच्छ्‌वास निरोष्ठ साधला आहे. भारवीच्या किरातार्जुनीय काव्यांत, तसेंच माघाच्या शिशुपालवध नामक काव्यांत, कालीदासाच्या रघुवंश नामक काव्यांत, वेंकटाध्वरीच्या लक्ष्मीसहस्र नामक काव्यांत, त्या त्या कवींनीं चित्रकाव्याचे कित्येक प्रकार घातले आहेत व त्यानंतरच्या कवींनीं तर रामकृष्णविलोभकाव्य, राघवपांडवीयकाव्य इत्यादिक चित्रकाव्याचे स्वतंत्रच ग्रंथ केले आहेत. ह्यावरून चित्रकाव्याची प्रवृत्ति फार प्राचीन कालापासून पडली असून चांगल्या चांगल्या नावाजलेल्या कविजनांनीं तिचा अंगीकार केला आहे हें सिद्ध आहे.

५. मराठी भाषेंत ह्या काव्याची प्रवृत्ति कधींपासून झाली ह्याचा जर विचार केला तर तिच्यांतही ती फार प्राचीन कालापासून आहे असें दिसतें. मराठी भाषेंत चित्रकाव्याचा प्रवेश करविणारा आद्यकवित म्हटला ह्मणजे विठ्ठलकवि हा होय. हा कधीं झाला हें आम्हांस माहीत नाहीं; तथापि तो बराच जुना आहे असें दिसतें. त्यांनीं 'रुक्मिणीस्वयंवर' नामक काव्यांत अनेक बंध साधले असून शिवाय "षण्मासिचा वायदा" ह्या नांवाचीं त्याचीं अनेक कूटें व प्रहेलिका ह्या प्रसिद्धच आहेत. त्यानंतर महाराष्ट्रभाषाकविकुलगुरू मोरोपंत ह्यांनीं तर मंत्ररामायण, नामगर्भरामायण, सीतारामायण, परंतु रामायण, निरोष्ठरामायण इत्यादिक चित्रकाव्याचे अनेक ग्रंथ लिहिले आहेत. अलीकडच्या काळांत पाळंदे, गोडबोले, इत्यादि कवींनीं चित्रकाव्याचे कांहीं प्रकार आपल्या कवितेंत आणिले असून, बजाबा

बाळाजी नेने ह्यांनीं तर आपल्या 'सैरंध्री' नाटकांत चित्रकाव्याचे बहुतेक सर्व प्रकार साधले आहेत. हल्लीं मात्र चित्रकाव्याचे मराठींत कांहीं ग्रन्थ प्रसिद्ध झाल्याचें पाहण्यांत आलें नाहीं. ह्याप्रमाणें संस्कृत आणि मराठी भाषेंत चित्रकाव्याचा प्रघात कधीं पडला ह्याविषयीं मला जें दिसलें; ते सांगितलें. आतां मराठी भाषेंत तें असावें किंवा नाहीं ह्याविषयीं विचार करूं.

६. कित्येकांचें ह्मणणें असें आहे कीं, संस्कृतात देखील चित्रकाव्य हें उत्तम काव्यांत मानलें जात नसून, काव्यांत रसध्वन्यादि साधण्यांत जी प्रतिष्ठा आहे ती चित्रकाव्य साधण्यांत नाहीं, व खऱ्या रसिकास तें आवडतही नाहीं; ह्याकरितां मराठी भाषेंत तें असण्याची कांहीं जरूर नाहीं. त्यास आमचें उत्तर असें आहे कीं, संस्कृतांत जरी चित्रकाव्य उत्तम काव्यांत गणिलें नाहीं, तथापि संस्कृत भाषेंतील चांगल्या चांगल्या कवींनीं आपल्या काव्यांत तें पुष्कळ ठिकाणीं सन्निविष्ट केलें आहे. ह्याचें कारण रसध्वन्यादि काव्यापेक्षां ह्या काव्याचे भोक्ते फार हें आम्ही वर दर्शविलेंच आहे. काव्याचें प्रधान फल मनोरंजन हें आहे. तेव्हां तें ज्या कोणत्या रीतीनें साधलें जाईल त्या रीतीची योजना त्यांत करणें अवश्य आहे. संस्कृतांत उत्तम गणिलेलें जें ध्वनि नामक काव्य तें तरी सर्वांसच आवडतें असें नाहीं. मग चित्रकाव्याविषयींच इतका निराळा दर तो कां? त्याचप्रमाणें कालिदास, माघ, भारवि इत्यादि मान्य व सहृदय कविजनांनीं त्याचा ज्या अर्थी आदर केला आहे त्या अर्थी खऱ्या रसिकास तें आवडत नाहीं असें तरी कसें ह्मणतां येईल? कालिदास, माघ, भारवि हे रसिक नव्हते कीं काय? तस्मात् 'चित्रकाव्य' हें यद्यपि क्लिष्ट असल्यामुळें संस्कृत अलंकारशास्त्रकारांनीं कनिष्ठ मानिलेलें आहे तथापि तें मनोरंजक आहे; आणि संस्कृतांत चांगल्या चांगल्या मान्य व सहृदय कवींनीं ज्याअर्थी त्याचा अंगीकार केला आहे त्या अर्थीं तें मराठी भाषेंतही घेण्यास बिलकुल हरकत नाहीं. किंबहुना तसें तें न घेतलें तर काव्याच्या अनेक मनोरंजक अंगांपैकी हें एक अंग ह्या भाषेच्या काव्यांत न्यून राहील. आतां इतकें मात्र खरें आहे कीं, ह्या चित्रालंकाराची योजना करणें ती काव्यांतील प्रसंगाचा विचार पाहून साजेल तेथेंच केली पाहिजे. ही गोष्ट कवीच्या चातुर्यावर अवलंबून आहे.

७. ज्या अर्थीं चित्रकाव्य मराठी भाषेंत असणें अवश्य आहे असे सिद्ध झालें त्या अर्थी त्याच्या प्रकारांचाही विचार करणें अवश्य आहे. आतां मराठी भाषेंतील काव्याला मूळ आधार संस्कृत ग्रन्थाचाच घ्यावा लागतो, त्याप्रमाणें ह्या विषयीही संस्कृत ग्रंथांचाच आधार घेतला पाहिजे. संस्कृतांत चित्रकाव्याचा फारच विस्तार केला आहे, त्यांतून कांही कांहीं गोष्टींचें मात्र मी येथें दिग्दर्शन करितों.

चित्रकाव्याचे शब्दचित्र आणि अर्थचित्र असे दोन भेद आहेत. कोणी उभयचित्र असा आणखी एक तिसराही भेद मानितात. ह्या तिहींपैकीं पूर्वीं शब्दचित्राचे प्रकार सांगून नंतर इतरांचा विचार करूं.

८. शब्दचित्र ह्मणजे ज्यांत वर्ण, मात्रा, स्थान, गति इत्यादिकांच्या संबंधानें कोणत्या तरी रीतीनें कांहीं रसिक जनांस आल्हाद देणारा असा चमत्कार केला असतो, अशी जी काव्यरचना तें शब्दचित्र होय. ह्याचे साधारण ६ भेद आहेत ते असे :

१ स्वरचित्र, २ वर्णचित्र, ३ स्थानचित्र, ४ आकारचित्र, ५ गतिचित्र आणि ६ बंधचित्र. ह्यांची अनुक्रमें उदाहरणें :

**स्वरचित्र**

*श्रीरामीं पुष्पांच्या वृष्टी । झाल्या तेणें कोंदे सृष्टी*
*श्रीशें त्रैलोक्याचा पूर्ण । भ्रात्यांनीं ही केली तूर्ण ॥*

*किंवा*

*'रामे मदनशतसमे पूर्णकल्याण कामे'*
*('ए' स्वरयुक्त रचना)*

ह्या पद्याची सर्व रचना दीर्घ स्वरयुक्त आहे. ह्यांत लघु अक्षर एकही नाहीं. मोरोपंतांचें एक रामायण असेंच आहे. दुसरें एक त्याच्या उलट, ह्मणजे लघुस्वरयुक्त आहे. त्यांतील एक आर्या पहा.

*'दशमुखवधमति विधि सुर-*
*नुतपद जगदधिप अजित वरद हरी ।*
*परम करुण ह्मणउनि दश-*
*रथनरवरतनुज मनुजपणहि धरी ॥*

**वर्णचित्र**

दे नन्द[२]नन्दनानन्दे नानानंदद नन्दिनी[३]
नंदी[४]ननंदिनी दान नाना दीना दिनीं दिनीं

ह्या पद्यांत न आणि द हे दोनच वर्ण आले आहेत. अशा प्रकारें एकाक्षर, द्व्यक्षर, त्र्यक्षर वर्णचित्र संस्कृतांत फार आहे.

**स्थानचित्र**

वर्णांचीं जीं कंठ तालू इत्यादि स्थानें तत्स्थानीय वर्णांत किंवा तत्स्थानविरहित अन्य वर्णांत जेथें पद्यरचना केली असते तें स्थानचित्र होय. उदाहरणें :

**१ निष्कंठ्य :** ह्या पद्यांत अ, आ, कवर्ग, आणि ह हे कंठ्य वर्ण मुळींच नाहींत.

*नमो श्रीराम—पादाब्जा, नाशिती जे भवार्णवा*
*नमो तद्भक्तवर्गातें, दीनोद्धारण तत्परा ॥*

ह्याचप्रमाणें पुढील ओवी निष्तालव्य आहे. ह्यांत इ ई चवर्ग आणि य श हे तालव्य वर्ण मुळींच नाहींत.

*परदारा परधन । समजे तृणासमान ।*
*तो एक साधू जाण । खूण तूज सांगतों.*

मोरोपंताचें प्रसिद्ध निरोष्ठरामायणही स्थानचित्राचेंच उदाहरण आहे. जशीं हीं एकेकस्थानरहित वर्णांचीं उदाहरणें आहेत, तशीं एकेका स्थानांतील वर्णांतच पद्यरचना केल्याचीं उदाहरणें मराठींत नाहींत.

**आकारचित्र**

जेथें एखाद्या वस्तूच्या आकृतीप्रमाणें आकृति लिहितां येईल अशी पद्यरचना केली असते, तें आकृतिचित्र होय. वर कलम ८ मध्यें शब्दचित्राचे जे ६ भेद केले आहेत त्यांत बंधचित्र ह्मणून जो एक भेद सांगितला आहे त्यांत व ह्या आकारचित्रांत फारसें अंतर नाहीं. दोन्ही सारखेच आहेत. विशेष इतकाच कीं आकारचित्रांत ज्या पदार्थाची आकृति साधावयाची असते त्या पदार्थाच्या रचनेचा किंवा उत्पत्तीचा जो मूळचा क्रम असतो त्याच क्रमानें वर्णविन्यास करितात; आणि बंधचित्रांत वर्णविन्यास करण्याचा क्रम ऐच्छिक असतो, असें सांगितलें आहे. परंतु कविजनांनीं हा नियम फारसा पाळलेला दिसत नाहीं, ह्मणून मीं ह्या निबंधांत आकारचित्र आणि बंधचित्र ह्यांचीं उदाहरणें पृथक् न देतां बंधचित्रांतच दिलीं आहेत.

**गतिचित्र**

जेथें पशुपक्षादिकांच्या गतीप्रमाणें अक्षररचना केली असते, किंवा उलटे सुलटे वाचले असतां एकचसारखे किंवा भिन्नार्थाचे किंवा इतर प्रकारचे चरण उत्पन्न होतात, किंवा

**प्रश्नोत्तर चित्र**

जेथें एखादा प्रश्न असतो, आणि जीं प्रश्नाचीं अक्षरें तीच उत्तराचीही अक्षरें असतात, तेथें त्यास प्रश्नोत्तरचित्र ह्मणतात. जसें–

काय असे प्रिय सर्वां (?)
मारिती वाजीस सारथि कशानें (?)॥
यांतचि उत्तर असतां शोधिति अन्यत्र अज्ञ मोहानें.[१]

अर्थ : सर्वांना काय प्रिय असते (?) (अर्थात् काया = शरीर)

वाजीस (घोड्याला) सारथि कशाने मारतो (?) कशा = चाबकाने

ह्या आर्येतील पूर्वार्धांत जे दोन प्रश्न आहेत त्यांतच "काय" आणि "कशानें" हे शब्द त्यांचीं उत्तरें आहेत.

**एकानेकोत्तर चित्र**

जेथें एकाच उत्तरांत अनेक प्रश्नांची उत्तरें असतात तेथें एकानेकोत्तर नामक चित्र होतें. जसें :

सिंधू विधू भारत हे । प्रिय कां लागती स्वयें
एक्या पादांत सांगावें । प्रतिपर्वरसोदयें.[१]

ह्यांत तीन प्रश्नांचें "प्रतिपर्व रसोदयें" हें एकच उत्तर आहे. सिंधुपक्षीं पर्व शब्दाचा अर्थ अमावस्या पौर्णिमा इत्यादिक पर्वणि; रस शब्दाचा अर्थ जल असा घ्यावा. विधूपक्षीं पर्व शब्दाचा अर्थ पंध्रवडा, आणि रस शब्दाचा अर्थ श्रृंगारादिक रस किंवा अमृत असा घ्यावा. आणि भारतपक्षीं पर्व शब्दाचा अर्थ 'पर्व' नामक ग्रंथविभाग असा घ्यावा.

### गूढचित्र

जेथें सरळ अर्थ वांकड्या रीतीनें वर्णिला असतो तेथें गूढ नामक चित्र होतें. जसें–

*सुरारी–रिपु–भृत्याचा । तात तद्वाहनाचिया*
*अंत्याक्षरविहीनाची । कांता त्वद्भवनीं वसो.१*

ह्यांत "लक्ष्मी तुझ्या घरीं वसो" असें कवीस सांगावयाचें असतां तें किती वांकड्या रीतीनें सांगितलें आहे तें पहा. सुरारि ह्मणजे रावण, त्याचा रिपु (शत्रु) राम, त्याचा भृत्य (सेवक) मारुति, त्याचा तात वायु, त्याचें वाहन हरिण, त्याचें अंत्याक्षर ण, तेणेंकरून विहीन शब्द हरि, त्याची कांता लक्ष्मी, ती तुझ्या घरीं वसो! असा ह्या श्लोकाचा पदार्थ आहे.

### कूटचित्र

जेथें कवीनें आपला आशय असा गुढ ठेविला असतो कीं तो प्रत्यक्ष त्याणेंच सांगितल्यावाचून किंवा पुष्कळ विचार केल्यावाचून एकाएकी लक्षांत येत नाहीं, तेथें त्यास कूटचित्र ह्मणतात, जसें–

*जयाला न आदी, जयाला न अंत*
*जयाला असे मध्य, तोय प्रशस्त ॥*
*असे वस्तु ती हो तुह्माला मलाही*
*जरी जाणलीसे वदा काय हो ही.[१]*

ह्यांत, ज्याला आदी 'न' हा वर्ण आहे, व अंतींही 'न' हा वर्ण आहे, आणि मध्यभागीं 'य' हा वर्ण आहे,–असा "नयन" शब्द कवीनें गूढ ठेविला आहे; तो एकाएकीं लक्षांत येत नाहीं.

### प्रहेलिका

वास्तविक अर्थ गुप्त राहून अर्थांतर स्पष्ट दिसावें– असें संशय पडण्याजोगें जें बोलणें त्यास प्रहेलिका असें ह्मणतात. जसें–

*मुख नसतांही वक्ता नाहीं, पंडित तथापि साक्षर जो ।*
*पद नसुनि दूर जातो, जाणे बुध तोचि पंडित असे जो. १*

ह्यात "लखोटा" हा शब्द गुप्त आहे. (म्हणजेच मुख नसताना बोलणारे, पाय नसून दूर जाणारे असे 'टपाल' होय.)

### अंतर्लापिका

जेथें एखाद्या पद्यांत कांहीं प्रश्न केले असतात व त्यांचीं उत्तरेंही त्याच पद्यांत कवीनें कोणत्या तरी रीतीनें काढतां येतील अशीं ठेविलीं असतात, तेथें त्यास अंतर्लापिका असें ह्मणतात. जसें–
**(राजाचें वर्णन)**

*संचरती कोण नभीं?*
*बल त्याचें काय? कोण गात्र भलें?*
*शोभविती कोण सरा?*
*कोण तुला नत? विपक्षशिरकमलें, १*

ह्या पद्यांतील सर्व (पाच) प्रश्नांचीं उत्तरें "विपक्ष शिरकमलें" ह्या चतुर्थचरणाच्या शेवटल्या अक्षरांत ठेविलीं आहेत, तीं अशीं : पहिल्या प्रश्नाचें उत्तर वि (पक्षी); दुसऱ्याचें पक्ष (पंख); तिसऱ्याचें शिर (मस्तक); चौथ्याचें कमलें; आणि पांचव्याचें वि'पक्षशिरकमलें हें सर्व वाक्य.

### बहिर्लापिका

अंतर्लापिकेप्रमाणेंच बहिर्लापिका असते. विशेष

इतकाच कीं अंतर्लापिकेंत प्रश्नांची उत्तरें त्या पद्यांतच ठेविलेलीं असतात. आणि बहिर्लापिकेंत तीं बाहेरून कल्पनेनें काढावीं लागतात, किंवा कवीनेंच ठरवून टाकलीं असतात. जसें–

*लोकांत काय बुध इच्छिति माननीय*
*इच्छीतसे कृपण नित्य मनांत काय ॥*
*जे वीतराग जन काय तयांस भावे*
*प्रश्नोत्तराद्यघटितास सदा भजावें.१*

ह्या पद्यांतील पहिल्या प्रश्नाचें उत्तर मान, दुसऱ्याचे धन, आणि तिसऱ्याचें वन. ह्या तीन्ही उत्तराची आद्याक्षरे घेतली असंतां "माधव" असा शब्द निघतो.

**अपन्हुति**

यद्यपि अपन्हुति हा अर्थालंकार पृथक् मानिला आहे, तथापि तोही चमत्कारिक असल्यानें ह्या ठिकाणी घेतला आहे. ह्याचें लक्षण असें आहे कीं, कोणी कांहीं वृत्तान्त सांगत असतां शेवटी एकच शब्द किंवा वाक्य असें आणावयाचें कीं त्या योगानें पूर्वी सांगितलेल्या सर्व वृत्तांताचें तात्पर्य दुसरीकडेस लागावें. ज़सें–

*आकृतिनें बहु सुंदर*
*गुणवान् कांतीहि सोज्वला आहे ।*
*वर्णे गौर; प्रिय कीं?*
*न परी मौक्तिक असे पहा गे हें.१*

कोणी एक स्त्री आपल्या विश्वासुक सखीजवळ प्रियाचें मोघम वर्णन करीत असतां सखी विचारते– 'कोण, पति काय?' तेव्हां तिनें लाजून 'नाहीं– मोतीं,' असें उत्तर दिलें. ह्यांत 'मोतीं' असें ह्मटल्यानें पूर्वी सांगितलेल्या सर्व वृत्तांताचा अर्थ पालटून तो अर्थ मोत्यांकडे लागू झाला.

**पदगुप्त**

जेथें पद्यांत कधीं क्रियापद, कधीं कर्ता, कधीं कर्म, कधीं विशेषण असें एखादें पद गुप्त ठेविलें असतें, तेथें पदगुप्त नांवाचें चित्र होतें. जसें–

**क्रियागुप्त** (ज्या रचनेत क्रियापद गुप्त आहे.)

नेली सीता रावणानें । कपि तीस वनांतरी ।
स्पष्ट येथें क्रिया आहे । शोधिती नेणुनी परी.१

ह्यांत दुसऱ्या अर्धांतील "शोधिती" हेंच क्रियापद पूर्वार्धांतील वाक्यास लागतें. रावणाने सीतेस नेले याविषयी वनांतरी (वनात राहणारे) कपि (वानर) कोणती क्रिया करतात. तिचा शोध घेतात 'शोधिती' हे क्रियापद येथे गुप्त आहे.

**कर्तृगुप्त** (ज्या रचनेत कर्ता गुप्त आहे)

दे आनंद वनीं या माझ्या नयनांसमोर हो भारी
येथें गुप्त असे जरि कर्ता जाणति तयास चतुर तरी.१

ह्यांत, पूर्वार्धांत 'मोर' हाच कर्ता आहे. (नयनांस 'मोर') ह्याचप्रमाणें कर्मादिगुप्ताचीं उदाहरणें जाणावीं.

**मात्राच्युतक**

जेथें एखाद्या पद्यांत एखादी मात्रा वाढवून दिली किंवा एखादी काढून घेतली असतां कांहीं अर्थचमत्कार उत्पन्न होतो तेथें त्यास मात्राच्युतकचित्र ह्मणतात. जसें–

*'तुषारशुभ्र जो तैसा । महामणि' धरोत्तम*
*नगराज बहू शोभे । पृथिवीधरणक्षम.१*

हें हिमालयपर्वताचें वर्णन आहे. ह्यांतील "नगराज" शब्दांत एक मात्रा (स्वर) आणखी वाढवून दिली तर "नागराज" असा शब्द होतो. नागराज शब्दाचा अर्थ "वासुकी" असा आहे. त्याच्या वर्णनासही हा श्लोक लागतो. हाच येथें चमत्कार आहे.

**अक्षरच्युतक**

मात्राच्युतकाप्रमाणेंच अक्षरच्युतक असतें. ह्यांत एखादा वर्णच काढावयाचा किंवा घालावयाचा असतो. जसें–

आहे महान् सुधीरहि बहुरत्नें युक्तही तरी त्याला ।
कुपरीवारा विरसा सेवितसे कोण हो नदीनाला?१

ह्यांत "नदीनाला" ह्या शब्दांतही नकार काढून

टाकला तर 'दीनाला' शब्द राहतो. त्यासही पद्यांतील विशेषणें लागतात. ह्याचप्रमाणें बिंदुच्युतक असतें. जसें–

*सुश्यामाचंदनवती । कांतातिलकभूषिता*
*ही सदा नगभू शोभे-*

**च्युतदत्ताक्षरा**

जेथें पद्यांतील एखादें अक्षर काढून घेऊन त्याच्या जागीं दुसरें घालून दिलें असतां अर्थ विच्छिन्न होत नाहीं, कांहीं विशेष अर्थ उत्पन्न होतो, तेथें च्युतदत्ताक्षरा नामक चित्र होतें. जसें–

*ही कामिनी विधुमुखी*
*रमणीया निर्मलांबरा दिसते ।*
*हर्ष न दे कोणाच्या*
*एकांतीं मदनविद्ध चित्तातें.१*

ह्या पद्यांतील "कामिनी" शब्दांतून "का" हें अक्षर काढून घेऊन त्याच्या जागीं "या" हें अक्षर घातलें असतां, "यामिनी" ह्मणजे रात्र असा अर्थ होऊन तिलाही पद्यांतील सर्व विशेषणें लागतात.

येथवर चित्रकाव्याचे जे जे प्रकार आमच्या दृष्टीस पडले त्यांतील मुख्य मुख्य भेद येथें दिले आहेत. ह्या वर दिलेल्या सर्व भेदांचे अनेक पोटभेद असून त्यांत अनेक प्रकारचे चमत्कार केलेले आहेत. कित्येक ठिकाणीं तर कवीच्या बुद्धिचातुर्याचें मोठें नवलच वाटतें, असे कठिण प्रकार साधले आहेत. परंतु त्या सर्वांचा विचार त्या विषयावर स्वतंत्र ग्रंथ लिहिल्यावांचून होणें नाहीं. शिवाय मराठी भाषेंत उदाहरणे देण्यास चित्रकाव्याचे लक्ष्य ग्रंथही कोठे दिसत नाहींत. स्वत: करून घालावीं तर माझें तितकें सामर्थ्य नाहीं. मला तर हा निबंध लिहून केवळ मराठी जाणणारांस ह्या विषयाचें दिग्दर्शन करून द्यावें, इतकेंच काम करावयाचें आहे. तें माझ्या ह्या अल्प निबंधानें होईल अशीं मला आशा आहे.

मिती श्रावण शुक्ल १४, संवत् १९४७
मुक्काम मुगावली, जिल्हा
इसागड, ग्वालियरचें राज्य

**बळवंतराव कमलाकर**

*(म.सा. पत्रिका - ऑगस्ट १९१३, पृष्ठे ५ ते ६ आणि मार्च १९१४, पृष्ठे १७ ते २०)*

---

१. व्यंग्यार्थाला ज्यांत प्राधान्य असते ते ध्वनी नामक उत्तम काव्य होय, असे अलंकार शास्त्राचे मत आहे
२. कृष्ण
३. गाई
४. लक्ष्मी
५. शरीर. (काय-काया)
६. चावकाने (कशान)
७. शत्रूंची शिरकमले
८. हिमाप्रमाणे शुभ्र
९. रत्ने, पक्षी फणेवरील मणि

*

# कलकत्त्याचे साहित्यसंमेलन

**वा. गो. आपटे**

*[महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कायमचे सचिव म्हणून ज्यांचा गौरवाने उल्लेख केला जात असे त्या वासुदेव गोविंद आपटे ह्यांनी परिषदेला संघटित केली. ते कलकत्ता विद्यापीठाचे स्नातक आणि बंगाली भाषेचे जाणकार होते. वंग साहित्य परिषदेचा आदर्श डोळ्यासमोर ठेवून त्यांनी मराठी साहित्य परिषदेची स्थापना करण्यासाठी अविश्रांत परिश्रम घेतले. वंग साहित्य परिषद १८९२ पासून कार्यरत होती. महाराष्ट्र साहित्य परिषदेची घटना अकोला साहित्यसंमेलनात (१९१२ साली) मांडली. त्यात साहित्य परिषद या विषयावर त्यांनी व्याख्यान दिले. वंगीय परिषदेचा आदर्श समोर ठेवून महाराष्ट्र साहित्य परिषदेची स्थापना झाली. कलकत्त्याच्या वंगीय साहित्यसंमेलनाचा आणि त्यातील नामवंत वक्त्यांच्या भाषणाचा सारांशरूपाने अहवाल, बहुविध विषयांना स्पर्श करणारा – बहुआयामी – आहे. त्यात वा. गो. आपटे यांच्या सुबोध मराठीचाही परिचय होतो. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे 'कै. वा. गो. आपटे संशोधन – संदर्भ ग्रंथालय' त्यांच्याच ट्रस्टने दिलेल्या रु. दहा हजार मात्र देणगीतून आकारास आले आहे.'*

*– संपादक]*

बंगीय साहित्यपरिषदेच्या मार्फतीने कलकत्त्यास नुकतेच एक साहित्यसंमेलन झाले. त्या संस्थेने भरविलेले हे सातवे संमेलन होय. आपल्या साहित्य-संमेलनाप्रमाणेच अशा प्रसंगी काव्य, नाटक, इतिहास, तत्त्वज्ञान इ. विषयांवर निबंध वाचणे किंवा भाषण करणे, साहित्याच्या अभिवृद्धीसाठी विशेष काही सुचवावयाचे असल्यास ते सुचविणे, लेखक व वाचक यांचा परस्परांशी प्रत्यक्ष परिचय घडणे व विचारविनिमय होणे इ. कामे होत असतात. पण यंदांच्या संमेलनात बंगीय साहित्य-परिषदेने एक पाऊल पुढे टाकिले. विलायतेतली ब्रिटिश असोसिएशन ज्याप्रमाणे साहित्याच्या प्रत्येक शाखेची एकेक स्वतंत्र परिषद त्या त्या विषयांत पूर्णपणे अभिज्ञ अशा गृहस्थाच्या अध्यक्षत्वाखाली सालोसाल भरवीत असते, त्याप्रमाणे यंदा बंगीय परिषदेने प्रयत्न करून पाहिला. यंदांच्या संमेलनाचे अध्यक्ष त्रिखंडकीर्ती डॉ. रवींद्रनाथ टागोर यांचे बंधू बाबू द्विजेंद्रनाथ टागोर हे होते. यांचे अध्यक्षाच्या आसनावरून झालेले भाषण पूर्ण झाल्यावर संमेलनाच्या साहित्य, इतिहास, तत्त्वज्ञान व भौतिक शास्त्रे, अशा चार शाखांची निरनिराळी संमेलने निरनिराळ्या गृहस्थांच्या अध्यक्षत्वाखाली करण्यात आली. हा प्रयोग यंदा कितीसा यशस्वी झाला किंवा पुढे होत राहील, याचा अंदाज आज करता येत नाही. पण हिंदुस्थानात या बाबतीत ब्रिटिश असोसिएशनचे अनुकरण करण्यात अग्रेसरत्व बंगीय परिषदेने प्रथम संपादले आहे, ही अभिनंदनीय गोष्ट आहे.

सर्वसामान्य संमेलनाचे अध्यक्ष बाबू द्विजेंद्रनाथ टागोर हे होते म्हणून वर सांगितलेच आहे. द्विजेंद्रनाथ

अनुक्रमणिका

हे स्वत: धार्मिक वृत्तीचे आणि तत्त्वज्ञानासारख्या गहन विषयांचा विचार करण्यात व त्यासारख्याच विषयावर लेख लिहिण्यात नेहमी निमग्न असतात. याचे व त्याचप्रमाणे निरनिराळ्या शाखांच्या अध्यक्षांची भाषणे सविस्तर देण्याइतका अवकाश नसल्यामुळे प्रत्येकातला महत्त्वाचा भाग तेवढा सारांशाच्या रूपाने देण्यापलीकडे काही करता येत नाही, ही खेदाची गोष्ट आहे. कारण, आमचे बंगाली बंधू साहित्यसेवेला अधिक वाहिलेले व साहित्याच्या प्रगतीच्या संबंधात हिंदुस्थानातल्या इतर सर्व प्रांतांना मार्गदर्शक होत. तेव्हां त्यांच्या विचारांशी महाराष्ट्र वाचकांचा परिचय घडला, तर तो सर्वतोपरी इष्टच आहे. तथापि पत्रिकेचे स्थळ मर्यादित असल्यामुळे निरुपायास्तव 'यावत्तैलं तावदाख्यानम्' या सुप्रसिद्ध उक्तीस सार्थकता आणावी लागत आहे.

**बाबू द्विजेंद्रनाथ टागोर यांचे भाषण**

या भाषणाचा बराचसा भाग भारतीय सुधारणा व पाश्चात्य सुधारणा यांच्या तुलनेनेच व्यापिला होता. साहित्य-विषयक शाखा स्वतंत्र काढल्यामुळे म्हणा किंवा वक्त्याच्या मनाचा स्वाभाविक कल तत्त्वज्ञान-विषयक विचाराकडे होता म्हणून म्हणा, पण त्यांनी आपल्या भाषणात साहित्य व त्याची अभिवृद्धी यासारख्या विषयाचे प्रतिपादन न करता परा विद्या, अपरा विद्या आणि अविद्या व त्याचप्रमाणे पारमार्थिक सत्य, व्यावहारिक सत्य व प्रातिभासिक (Phenomenal) सत्य यांचेच विवेचन केले. तथापि त्यांनी आपल्या भाषणाच्या अखेरीस एक मजेदार रूपक सांगितले. ते असे :

पूर्वी आपल्या देशात एक राजर्षि होऊन गेला. परा विद्या हे त्या राजाच्या राणीचे नाव होते. त्याला एकच पुत्र विज्ञान (भौतिक शास्त्रज्ञान) हा होता. राजाने वानप्रस्थाश्रमाचा स्वीकार करण्याचा व पुत्राच्या स्वाधीन राज्य करण्याच संकल्प केला होता. पण पुत्राचे वय अल्प– सात-आठ वर्षांचे तेव्हा राज्यकारभार वृद्ध मंत्री स्मृति-पुराण याच्यावर सोपवून आणि दुर्भिक्षाचे वेळी प्रजेला अक्षय राजभांडारांतून अमृतोपम खाद्य-पेय स्वल्प मूल्याने देण्याविषयी सांगून व पुत्राला हळूहळू सर्व विद्यांचे शिक्षण देण्यविषयीचे आज्ञापत्र स्वहस्ते लिहून राजाने मंत्र्याच्या स्वाधीन करून राजा तपोवनात जाऊन राहिला. राजा निघून गेल्यावर मंत्र्याने भांडारातल्या सर्व खाद्यद्रव्यांचे मूल्य मोठ्या कसोशीने ठरवून, अमक्या अमक्या किंमतीस हे द्रव्य मिळेल, लागेल त्याने घेऊन जावे; अशी दवंडी देवविली. पण कोणी घेण्यास येईना. मंत्र्याने ठरविलेली किंमत प्रजेला फार भारी वाटली. आपण उपाशी मरू, पण भांडारातले खाद्य घेणार नाही, असा सर्वांचा निश्चय ठरला. तो ऐकून मंत्री घाबरला. त्याला रक्षणनीति व लोकरंजना अशा दोन स्त्रिया होत्या. त्यांच्या कानी हा प्रकार गेलाच होता. त्यांनी आपापल्या मताप्रमाणे पतीला मसलत दिली. रक्षण-नीति कौसल्येसारखी व लोकरंजना ही कैकेयीसारखी होती. मंत्र्याने धाकट्या पत्नीची मसलत ऐकून भांडारांतले थोडे शुद्ध तत्त्वज्ञानरूपी खाद्य काढून घेऊन त्यात पुष्कळ क्रियाकर्मरूपी असार आणि खराब खाद्याची भेसळ केली व ते मिश्रण प्रजेच्या म्हणण्याप्रमाणे स्वल्प किंमतीला दिले. आपले म्हणणे मंत्र्याला पटले म्हणून प्रजेला आनंद होऊन त्या आनंदाच्या भरात तिने ते सपाटून खाल्ले. ते अर्थात् तिला बाधले. इकडे राजपुत्र विज्ञान हा अल्पवयी होता, तरी मंत्र्याचे हे कृत्य त्याला न आवडून त्याने मंत्र्याचा निषेध केला, पण मंत्र्याने तिकडे लक्ष दिले नाही. पुढे सात-आठ वर्षांनी त्या अन्नाचे दुष्परिणाम दिसू लागले; तेव्हा राजपुत्राला अतिशय दु:ख होऊन प्रजेची ती दुर्दशा त्याच्याने पाहवेना म्हणून तो त्या देशांतून चालता झाला; आणि पाश्चात्य नावाच्या एका देशात त्याने आपली नवी गादी स्थापिली व तेथे त्याने आपल्या नव्या प्रजेला सुखी केले. जुन्या प्रजेच्या नशिबी दुर्दशा भोगण्याचे होते. ती भोगीत ती प्रजा तशीच राहिली. राजपुत्राने आपल्या प्रजेचा, तिच्या विपन्नावस्थेत त्याग केला ही गोष्ट वाईट झाली. त्याने आपल्या पित्याकडे जाऊन त्याला सगळा वृत्तांत कळवावयाला पाहिजे होता,

व दुष्ट मंत्र्याला ताळ्यावर आणून आणि आपल्या पितृदत्त राजपदावर आरूढ होऊन पित्याची इच्छा पूर्ण करावयाची होती, म्हणजे सगळे चांगले झाले असते. या रूपकात आमच्या देशाची तत्त्वज्ञानविषयक सद्य:स्थिती फार मार्मिकपणाने प्रतिबिंबित केली आहे, हे सुज्ञ वाचकांच्या सहज लक्षात येईल.

**साहित्यशाखेच्या अध्यक्षाचे भाषण**

साहित्यशाखेचे अध्यक्ष श्रीयादवेश्वर तर्करत्न हे होते. यांनी आपल्या भाषणात सर्व शास्त्रे (वेद, तंत्र, गणित, ज्योतिष, व्याकरण, व्यवहारशास्त्र, इत्यादी) साहित्याच्या अंतर्भूत कशी होतात, व कालीदासासारख्या कवीच्या काव्याचे खरे मर्म कळण्यास वेदान्त, ज्योतिष, तत्त्वज्ञान, गणित, व्यवहार इ. शास्त्रांच्या ज्ञानाची कशी अपेक्षा असते, ते बरीचशी उदाहरणे घेऊन दाखविले. जाता जाता त्यांनी आपले सर्वमान्य विद्वान कैलासवासी बाळशास्त्री जांभेकर यांची गोष्ट सांगितली. एकदा अध्यक्ष व शास्त्रीबोवा यांची गाठ पडली असता, अध्यक्षांनी त्यांच्याशी संस्कृतात बोलण्यास सुरुवात केली. तेव्हा शास्त्रीबोवा म्हणाले, 'नको, नको; तुम्ही बंगालीतच बोला. त्या भाषेत इतके संस्कृत शब्द आहेत की, ती भाषा मला सहज समजेल.' ही आख्यायिका सांगण्याचा उद्देश हा होता की, बंगाली भाषा संस्कृतमय असल्यामुळे तिच्यात संस्कृत भाषेतली अर्थवाहकता, स्वल्पता, इ. गुण आहेत, व तिचा उपयोग हव्या त्या विषयावरील ग्रंथरचनेच्या कामी होण्यासारखा आहे, हे दाखवावयाचे.

काव्यासंबंधाने लोकांची सदभिरुची राहिली नाही व रस हा काव्याचा अंतरात्मा आहे ही गोष्ट कविता करणारे विसरतात, अशीही अध्यक्षांनी टीका केली. प्रेमविषयक गोष्टींना आलेल्या महापुरावर त्यांचा विशेष कटाक्ष होता. अशा गोष्टी बहुधा इंग्रजीचे भाषांतर केलेल्या असतात. त्यात कल्पना, विचार, किंवा सदभिरुची इकडे पाहतो कोण? धर पुस्तक की कर भाषांतर, हा धडाका सुरू आहे. भाषांतरेसुद्धा वाङ्मयाला अवश्य पाहिजेत. पण भाषांतराच्या पुस्तकाची निवड विचारपूर्वक झाली तर उपयोग. विशेषत: इमर्सन, कार्लाइल, हेगेल यांच्या ग्रंथांसारखे गंभीर लेख भाषांतररूपाने यावयास पहिजेत. नंतर प्रेमविषयक व अश्लील कवितांकडे ते वळले. सध्या पत्नीविषयक प्रेम हा एकच विषय कवींच्या पुढे असतो. पण प्रेमाचे हे एकच रूप जगात आहे काय? समाज, पितापुत्र, धर्म, यांच्याविषयीचे जे प्रेम, ते खरे किंवा उच्च प्रतीचे प्रेम नव्हे काय? पण अशा प्रेमाची गाणी कितीशी आहेत? अश्लीलता ही शब्दांत नव्हे, तर भावात शोधली पाहिजे. शब्द सभ्यपणाचे असून भाव मनाला दूषित करणारे असले, तर ते काव्य अश्लीलच म्हटले पाहिजे.

साहित्यक्षेत्राचे कित्येक भाग अद्याप अज्ञातच आहेत. वात्स्यायनसूत्रासारखे अनेक उत्कृष्ट ग्रंथ भाषांतररूपाने अवतीर्ण व्हावयास पाहिजेत. ब्राह्मी, खरोष्ट्री, पाली वगैरे लिपी व भाषा यांच्या ज्ञानाच्या मागे विद्वानांनी लागून इतिहासाचे संशोधन करावयास पाहिजे आहे. हिंदुस्थानात पूर्वी नाटककला ठाऊक नव्हती, ती ग्रीकांच्या अनुकरणाने आली असे युरोपियन पंडित म्हणतात. भास कवीचे "स्वप्नवासवदत्त" या नाटकाच्या प्रसिद्धीने ते मत त्यांना पालटावे लागेल. पूर्वीच्या सामाजिक चालीरीती व समाजस्थिती यांच्यात कसकसे फेरफार होत गेले व त्यावरून समाजाची रचना व वाढ यांविषयीचे काय नियम, शास्त्रीय पद्धतीने ठरविता येतील, याचे विवेचन करणाऱ्या ग्रंथाची आवश्यकता आहे. बंगाली भाषेत उडदू, इंग्रजी वगैरे भाषांतरासारखे विनयसूचक वाक्प्रचार नाहीत. कवित्वपूर्ण विनय पुष्कळ आहे, पण साधा सरळपणाचा नाही. सध्याची साहित्यप्रगती आदर्शशून्य व लक्षणशून्य आहे. असे वाङ्मय उपयोगाचे नाही, असे या भाषणाचे सार होते.

**इतिहासशाखेच्या अध्यक्षाचे भाषण**

इतिहास शाखेचे अध्यक्ष श्री. अक्षयकुमार मैत्रेय यांनी बंगाली वाङ्मयात इतिहासाला महत्त्वाचे स्थान मिळत आहे व खेडेगावापासून तो सबंध पृथ्वीपर्यंत

इतिहासाचे क्षेत्र पसरून तत्संबंधी ग्रंथ बंगाली वाङ्मयात निघत आहेत, याबद्दल प्रथम् समाधान प्रकट करून नंतर इतिहासरचनेची शास्त्रीय पद्धती कोणती आहे व तिचे स्वरूप कसे आहे, त्याचे विवेचन केले. ते करताना ते म्हणाले की, सशास्त्र पद्धतीने इतिहास रचिला गेला, तरच तो हवा आहे. नाहीपेक्षा तो इतिहास उपहासाला पात्र होईल. पूर्वीच्या इतिहासात केवळ शब्दांचे अवडंबर, शब्दलालित्य, स्वजातिगौरव किंवा एखाद्या वीराचे गुणवर्णन एवढे काय ते असे. सत्यनिर्णयापेक्षा कल्पनेची बहार आणि रसपरिपोष याकडे जास्त लक्ष असे. आता ते दिवस राहिले नाहीत. आता प्रमाणाला प्राधान्य मिळाले आहे. सध्याच्या इतिहासकाराला लेखणीपेक्षा कुदळी पावड्याशीच अधिक निकट संबंध येतो. भाषा-लालित्यापेक्षा प्रमाण-सिद्धीलाच त्याला अधिक जपावे लागते. इतिहासाचा पाया प्रमाण हा आहे. पण हे प्रमाण परोक्ष असते. भौतिक शास्त्राचा पाया प्रत्यक्ष प्रमाण हा आहे. प्रमाणांच्या स्वरूपात हा भेद आहे, तरी इतिहास हे शास्त्र आहे– किंबहुना भौतिक शास्त्रापेक्षाही इतिहासकारांना आपले सिद्धांत काढताना अधिक खबरदारी घ्यावी लागते. इतिहास-लेखकांना आजपर्यंत झालेल्या शोधांची माहिती पूर्ण पाहिजे. हे शोध पाश्चात्य भाषांतून विशेष झालेले आहेत. तेव्हा आपल्या देशाची माहिती मिळविणाऱ्यांनी या देशाच्या चतु:सीमांतच बद्ध राहून उपयोगी नाही. इतर भाषांतून काय लिहिले गेले आहे, तेही पाहिले पाहिजे. इतिहासाच्या बाबतीत पाश्चात्य लेखक व सरकार हे आमचे गुरू आहेत. इतिहासाची साधने कशी मिळवावी, त्या प्रत्येक साधनाची बारीक छाननी कशी करावी, या कामी अहोरात्र कसे झटावे, कवडीची अपेक्षा न धरता अंग मोडून व पदरचे द्रव्य खर्चून इतिहासाची साधने कशी कालानुक्रमाने लावावी. व त्यापासून तथ्यनिर्णय कसा करावा, हे पाश्चात्यांपासूनच शिकावे. इतिहासात लिपिप्रमाणापेक्षा वस्तुगत प्रमाणाची योग्यता अधिक आहे. कारण लिपिप्रमाणात लेखकाचे अज्ञान, त्याची लहर, त्याच्या मनाचा ओढा, सत्यापलाप वगैरे अनेक अंतराय घडण्याचा संभव असतो. त्यावेळचे शिक्के, नाणी, अलंकार, वगैरे वस्तूंच्या प्रमाणात असे अंतराय येण्याचा संभव नाही. शिल्पाचे महत्त्व इतिहासरचनेच्या कामी मोठे आहे. लिपिप्रमाणातही परकालप्रणीत आणि समसामायिक असे दोन प्रकार आहेत. यात पहिल्यापेक्षा दुसरे अधिक ग्राह्य मानले पाहिजे. जनश्रुती हे तिसरे प्रमाण कित्येक मानतात. पण त्याला किती किंमत द्यावयाची त्याबद्दलचा नियम घालून देता येत नाही. हे प्रमाण निखालस ग्राह्य किंवा निखालस त्याज्य म्हणता येत नाही. कित्येक लोक म्हणतात की, इतिहासाची सगळी साधने उपलब्ध होऊन ती कसोटीस उतरल्याशिवाय इतिहास लिहिण्यास लागू नये. पण सगळी साधने उपलब्ध झाली, अशी खात्री केव्हाही कोणाला देता यावयाची नाही. कालांतराने नवीन प्रमाणे उपलब्ध होऊन पूर्वसिद्धान्तांचे परिवर्तन होईल. झाले तरी हरकत नाही. पण उपलब्ध प्रमाणावरून इतिहास लिहिण्यास हरकत नाही. इतिहास म्हणजे नुसता राजघराण्यांचाच नव्हे, तर समाजाचा असला पाहिजे. सुधारणेचा विकास कसकसा होत गेला, ते त्यात मुख्यत: दाखविले पाहिजे. प्रमाणसिद्धता कायम राखून भाषालालित्य लेखकाला दाखविता आले तर खुशाल दाखवावे. ज्या देशाचा इतिहास त्या देशाच्या लोकांनीच पण प्रमाणसिद्धता कायम राखून लिहिलेला अधिक चांगला. इतिहासरचना करताना जात्याभिमान, स्वाभिमान वगैरेंचा उन्माद येण्याचा संभव असतो. तो टाळण्याचा शक्य तेवढा यत्न करणे अवश्य आहे.

**तत्त्वज्ञानशाखेच्या अध्यक्षाचे भाषण**

श्री. प्रसन्नकुमार राय यांनी आपल्या भाषणात सांगितले की, कोणत्याही राष्ट्राची खरी अविनाशी संपत्ती म्हणजे तेथील वाङ्मय ही होय आणि त्या वाङ्मयात चिंताशीलता हीच एकटी भाषागांभीर्याचा संचार करणारी शक्ती आहे. हे तत्त्वज्ञानविषयक साहित्य बंगाली भाषेत राजा राममोहन राय यांच्या वेळेपासून तो बंकिमचंद्राच्या वेळेपर्यंत पुष्ट होत गेले. हल्लीही ते वाढत आहे. हे साहित्य वाढण्याला

संस्कृत व इंग्रजी या दोन्ही वाङ्मयाशी परिचय असणे आवश्यक आहे. संस्कृत भाषा ही जरी बंगालीची जननी व धात्री असली, तरी इतर भाषांचे साह्य घेण्यास व त्याचे ऋण स्वीकारण्यास आपण उदार भावाने तयार असले पाहिजे. या साहित्याच्या उन्नतीचा दुसरा उपाय भावविनिमय हा आहे. त्यासाठी कलकत्ता फिलॉसॉफिकल सोसायटीसारख्या संस्था निर्माण झाल्या पाहिजेत. इंग्रजीत ग्रंथ लिहून अथवा बंगालीत इंग्रजीतून भाषांतर करून कोणत्याही उपायाने का होईना लोकांना गंभीरपणाने विचार करण्यास लाविले पाहिजे. आपला देश व ग्रीस देश यांच्या मध्ये अशाच उपायांनी पूर्वी विचारविनिमय होत असे. आपल्या देशात दु:खाची अत्यंत निवृत्ती, निर्वाण, किंवा ब्रह्मस्वरूपप्राप्ती, कोणत्याही नावाने का होईना पण जीवात्म्याचे मोक्षसाधन हाच परम पुरुषार्थ– हेच एक काम्य, हेच एक श्रेयस, हेच एक तत्त्वज्ञानाचे मूल सूत्र हे. ग्रीक तत्त्वज्ञानाप्रमाणे व्यक्तिगत भाव आणि समाजगत भाव यांच्या रूपाने जीवनाचे सौंदर्य व मंगल घडवून आणणे हे मोठे ध्येय होते. दोहोतही जीव आणि जगत् यांचे खरे ज्ञान करून घेण्याची इच्छा हीच मुख्य आहे. हिंदुस्थानात त्या ज्ञानाचा मोक्षप्राप्तीकडे ओघ वळला, ग्रीस देशात मानवी जीवनाचे सुख, सौंदर्य, व कल्याण आणि राष्ट्रहितसाधन यांकडे त्या ज्ञानाचा उपयोग होऊ लागला. तथापि आपला एकेक विशिष्ट आदर्श पुढे ठेवूनही त्यांनी दुसऱ्या आदर्शाची विस्मृती होऊ दिली नाही. महाभारतातही व मनुसंहितेत राष्ट्रहितसाधनाविषयीच्या सुंदर कल्पना आहेत, तसे प्लेटोच्या विचारातही आध्यात्मिक दृष्टी आहे. सध्याच्या काळीही पाश्चात्त्य राष्ट्रांतल्या तत्त्वज्ञानावर भारतीय अध्यात्मज्ञानाची छाया पडलेली दिसत आहे. आमच्या देशातही ब्रिटिश अमलाशी सहवास घडल्यामुळे पाश्चात्त्य आदर्शाशी प्राच्य आदर्शाचे संमीलन घडवून आणण्याचे प्रयत्न चालले आहेत. हे संमेलन ज्या मानाने जास्त घडेल, त्या मानाने तत्त्वज्ञानविषयक साहित्याच्या उन्नतीचे पाऊल पुढे पडेल; आणि त्या साहित्याचा खरा प्रभाव लोकांच्या अनुभवास येईल.

### भौतिकशास्त्रशाखेच्या अध्यक्षाचे भाषण

भौतिकशास्त्रशाखेचे अध्यक्ष प्रिन्सिपाल रामेंद्रसुंदर त्रिवेदी यांनी मागील कित्येक साहित्यसंमेलनांचे स्मरण देऊन हळूहळू भौतिकशास्त्रज्ञानाचा प्रभाव संमेलनावर कसकसा जास्त पडत गेला आहे ते दाखवून, बंगालचा भविष्यकाळ उज्ज्वल आहे; असे त्यावरून अनुमान काढले. इतके दिवस पाश्चात्त्य शास्त्रज्ञांच्या शोधांची माहिती करून घेण्यातच धन्यता मानून घेण्यात येत असे. आता डॉ. बोस व डॉ. राय यांच्यासारखे विद्वान स्वत: शोधक बनले आहेत. तथापि शास्त्रमंदिरात आमचा नुकता कोठे प्रवेश झाला आहे. शास्त्रीयसत्यरूपी देवीचे मुख हिरण्मय वस्त्राने आच्छादित आहे. तो तिच्या तोंडावरचा बुरखा काढून तिच्या प्रभावान् मुखाचे दर्शन करवून देणारे कोणत्याही देशात जन्मले असोत; ते ऋषीच होत. ते आम्हांस वंद्य आहेत. शास्त्रज्ञांचे कर्म हे खरे निष्काम कर्म आहे. कर्म करावे त्यांनी; आणि फल भोगावे सामान्य जनांनी! असा ईश्वरी संकेत आहे. शास्त्रज्ञांची भाषा गहन, ती सामान्य वाचकांना सहज कळण्यासारखी नसते. यामुळे त्यांच्या ग्रंथांचा किंवा लेखांचा लाभ सामान्य जनांना मिळावा तसा मिळू शकत नाही, ही गोष्ट खरी आहे. शास्त्र हे सामान्य वाचकांकरिता नाहीच व ते तसे नसावेही, असेही म्हणणारे पाश्चात्त्य देशात निघाले आहेत. हा वादग्रस्त मुद्दा आहे. तथापि पाश्चात्त्य शास्त्रज्ञातही टेट, हेलमोत्झ, क्लिफर्ड यांच्यासारखे शास्त्ररूपी सूर्याचा प्रकाश हाती घेऊन या पृथ्वीतलावर अज्ञानतिमिरनाशार्थ अवतरले होते, हे आपण लक्षात घेतले पाहिजे. दुसरे असे की, पाश्चात्त्य राष्ट्रांची स्थिती व आपल्या देशाची स्थिती यांच्यातले अंतर विसरून चालावयाचे नाही. आपल्या देशाच्या विशिष्ट गरजा पुरविण्याकडे आपले लक्ष पहिजे. शास्त्रीय ज्ञानाचा प्रसार करण्यास देशी भाषा कितीशा समर्थ





आहेत, हाही प्रश्न वारंवार उद्‌भवतो. आज बंगाली भाषेत तेवढे शब्दभांडार व अर्थवहनसामर्थ्य नाही, हे मी कबूल करतो. पण या बाबतीत दिवसेंदिवस तिची प्रगती होत आहे, तर ती शास्त्रज्ञान शब्दांनी व्यक्त करण्यास पूर्णपणे समर्थ होईल अशी आशा मनात ठेवून त्या दिशेने उद्योग करण्यास कोणती हरकत आहे? तसे सामर्थ्य येईपर्यंत खुशाल इंग्रजी परिभाषेचा अवश्य तेवढा उपयोग सढळ हाताने ठेवा, पण ते सामर्थ्य आपल्या मातृभाषेच्या अंगी आणणे; हे उद्देश्य दृष्टीआड करू नका म्हणजे झाले. बंगाली भाषेत पंचवीस तीस वर्षांपूर्वी जी शास्त्रीय पुस्तके होती, त्यांच्या तोडीची आता नाहीत, ही खेदाची गोष्ट आहे. पण याचे कारण आमचे ठायी श्रद्धेचा व ज्ञानप्रेमाचा अभाव, असे मी समजतो. जे शास्त्रज्ञान आपणास हवेसे वाटते, तेच आपल्या बंधुभगिनींना त्यांच्या भाषेत अल्पपरिमाणाने देण्याइतका उदारपणा सुशिक्षितांच्या ठायी दिसेल तर ही स्थिती दिसणार नाही. ज्ञान हे देशभेद किंवा जातिभेद न ओळखणारे आहे. ते अत्यंत पवित्र आहे. तथापि काही देशात विशिष्ट प्रकारचे शास्त्रीय शोध करण्यास अनुकूल अशा साधनांची विपुलता असते. आमच्या बंगाल प्रांतांत वातावर्तविद्या, अंतरीक्षविद्या, खनिजविद्या वगैरे कित्येक शास्त्रांसंबंधाने शोध करण्यास विशेष अनुकूलता आहे. मला आशा आहे की, हे शास्त्रज्ञांचे संमेलन असेच भरत गेले तर आपणांपैकी कित्येकांना तरी बंगालची माती, बंगालचे पाणी, बंगालचे मासे वगैरे अनेक गूढतत्त्वमय विषयांकडे वळण्याची बुद्धी होईल.

[**सूचना** – वरील भाषणात वक्त्यांच्या तोंडचे शब्द जसेचे तसे दिले नाहीत. वक्त्यांचा भाव मात्र अतिशय संक्षेपाने व्यक्त करण्याचा प्रयत्न केला आहे.]

*(म. सा. पत्रिका जुलै १९१४, पृ. ७३ ते ७९)*

*




*[१८२० ते १८६० ह्या कालखंडात इंग्रजी शिक्षणाच्या प्रभावाने दोन प्रकारचे शिक्षितवर्ग दिसून येतात. त्यापैकी बहुतांशी पाश्चात्य ज्ञानाच्या तेजाने केवळ दिपून गेलेली अपक्व, अप्रौढ, पोरकट, खुशालचेंडू – श्रीमंत पिढी आणि इंग्रजांचे अंधानुकरण करणारी सामान्यजनांची अर्धशिक्षित पिढी होती. त्यांच्या हातून कोणतेच भरीव काम झाले नाही. ह्या उलट नव्या शिक्षणपद्धतीत ज्ञानसंपादन करून त्या तुलनेत स्वसमाज, स्वधर्म आणि स्वसंस्कृती कुठे कमी पडत आहे, ह्याचे मनन-चिंतन करून लेखनाद्वारे ज्ञानप्रसार करणारी सुशिक्षितांची समाजहितैषी पिढी खऱ्या अर्थाने सुशिक्षितांची पिढी होती. त्यांनी इंग्रजी राज्याशी राजकीय संघर्ष उभा केला नाही. बलाढ्य सत्तेशी संघर्ष करून स्वातंत्र्य मिळविण्यापेक्षा त्यांनी स्वसमाजाची सुधारणा करून स्वातंत्र्यासाठी नवमतवादाची पिढी तयार करण्यासाठी प्रबोधनाची चळवळ सुरू केली. ह्या सुशिक्षितांच्या पहिल्या पिढीतील 'दर्पण'कार बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर, नव्या मराठी ग्रंथाचे जनक सदाशिव काशीनाथ छत्रे, मुद्रण व्यवसायातील अग्रगण्य हरि केशवजी आणि जावजी दादाजी, रा. गोंधळेकर, न्यायमूर्ती रानडे, लोकहितवादी ह्या नेमस्त सुशिक्षितांमध्ये गोविंद नारायण माडगावकर यांचे नाव सुपरिचित आहे. त्या पिढीच्या, गोविंद नारायणांच्या नेमस्त कार्याचा आढावा घेणारा हा लेख श्री. बा. ना. देव ह्यांनी म. सा. पत्रिकेच्या जून १९१८ च्या अंकासाठी लिहिला, तो मराठी साहित्याच्या सामाजिक सांस्कृतिक इतिहासाचा दस्तऐवज आहे.*

*–संपादक]*

"The State which has such citizens (Socrates) is truly blessed; they are the salt which preserves it from going to decay * * * For " Character' as Emerson says "teaches above the Will." - Cross.

"There is something more noteworthy in the speaker (Chatham) than in his speeches."

-Benjamin Franklin

"Knowledge unites and Ignorance divides." - J.C.Bose.

**विषयोपक्रम**

(१) 'सृष्टीपेक्षा स्रष्टा अनंत गुणांनीं श्रेष्ठ व वरिष्ठ होय' असें परमेश्वराविषयीं थोर महात्म्यांचे वचन आहे. त्याचप्रमाणें तदंशभूत लोकोपकारक थोर पुरुषांत चांगल्या ग्रंथकारांची गणना आहे. त्यांत काही लेखक त्यांच्या लेखांपेक्षां श्रेष्ठ असतात त्यांची कृति हंगामी पिकासारखी त्या मोसमापुरती कामास पडून लोकांचा योगक्षेम राखते, त्यांच्या जीवनयात्रेस मदत करते, आणि पुढील मजलेचा मार्ग सुगम करते. याप्रकारानें असे लेखक पुढील मार्गदर्शक पाट्या होऊन शेवटच्या विश्रामस्थळास पोचवितात. त्यावांचून वाटसरू रस्ता चुकून फसेल. फार थोड्या कलमबहादरांचा कार्यभाग सतत उपयुक्त व टिकाऊ असतो. बाकी बहुतेकांची कृति नियतकालोपयुक्त होते. ती प्रगतीच्या प्रत्येक पायरीप्रमाणें महत्त्वाची असते.

या पायऱ्यांवरून जपून पाय टाकावा लागतो. एकादा चुकून पाय पडला कीं चालणारास ठेंच लागते, नाहीं तर तो तोंडघशीं पडतो.

**अर्वाचीन मराठी गद्य वाङ्मयाचा उगम व प्रथमावस्था.**

(२) सदाशिव काशीनाथ छत्रे यांस नव्या मराठी ग्रंथांचे जनक म्हणून सर्व जनता मानते. त्यांनी सरस्वतीमंदिराच्या या भागाचा पाया भरून प्रथम शिला घडविली व बसविली. तिला आणीक तिघां जणांनी नीटनेटकी, सुरेख व डौलदार करण्यास मदत दिली. त्यांची नावें बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर, हरी केशवजी सोमवंशी क्षत्रिय, व गोविंद नारायण माडगांवकर, ही होत. त्यांपैकी शेवटच्या थोर गृहस्थाच्या जीवनकार्याचें यथामति व यथाशक्ति दिग्दर्शन करण्याचा आज विचार आहे.

**कुलवृत्त व जन्म**

(३) प्रस्तुत विषयनायकाची जन्मभूमि गोंवें प्रांतांत माडगांवनजीकचा पेरी गांव ही होय. हा प्रांत गेली चार पाचशें वर्षे पोर्तुगीज सरकारच्या ताब्यांत आहे. लोकशिक्षण, सुस्थिति वगैरे सर्व बाबतींत मुंबई इलाख्याच्या मानानें तो बराचा मागासलेला आहे. त्या संबंधांत गोविंदजींच्या ग्रंथात बरेच उल्लेख आढळतात, त्यातून पुढील विचित्र व मजेदार दंतकथा या जागी दिल्यावाचून राहवत नाही.

"ज्या वेळी प्रथमच (स.१५१०) फिरंगी लोक पोर्तुगालांतून तिर्कटी तारवावर लष्कर घेऊन गोव्याच्या बंदरास आले--- तेव्हा ते कांही दिवसपर्यंत बंदराच्या बाहेर नांगर टाकून गोमांतकाची स्थिति कशी काय आहे, ती पाहात होते. त्यांचे लष्कर जहाजावर होतें, ते गोव्याच्या किल्ल्यावरून सर्व लोकांस दिसे. ते बिस्कुटे कडाकड चावीत व दारू पीत. बिस्कुटें कठीण व पांढरी होती, ते ती खात; आणि दारू पीत, तिचा रंग तांबडा असे. हा त्यांचा आहार पाहून गोमांतकांतील भोळ्या लोकांनी अशी अवाई उठविली कीं, हे जहाजांतून आलेले विलक्षण लोक चमत्कारिक पोषाख करतात इतकेंच नाही, तर ते हाडें खातात व रक्त पितात. ते कोणी द्वीपांतरांतील राक्षस असावेत. अशी कल्पना काढून ते अगदी घाबरून गेले. त्यांपुढे आपला निभाव लागणार नाही असें मनांत आणून, गर्भगळीत होऊन ते एकसारखे पळत सुटले. मग काय विचारतां? ही बातमी राजाच्या कानावर जाताच लष्कर घेऊन तोही शहर सोडून चालता झाला. मग दुसऱ्या दिवशी जेव्हां फिरंगी लोकांनी पाहिजें की शहरांत जिकडे तिकडे सामसुम आहे, तेव्हां जहाजावरून ते तीरास आले आणि त्यांनी किल्ला सर केला. नंतर राजवाडा व दुसरे दिवशी लष्करी सामान आपल्या स्वाधीन करून घेतले." ही दंतकथा अक्षरशः सत्य नसली तरी त्या काळच्या लोकमताचें प्रतिबिंब तिच्यांत पडलेलं दिसते. गोवेकराविषयी असे उल्लेख गोविंदजींच्या लेखात अनेक आहेत, त्यांवरून तेथील वस्तुस्थितीबद्दल त्यांचा मोठासा पूज्यभाव होता, असें वाटत नाही. असो.

माडगांवकर घराण्यांत मराठी भाषेविषयीं प्रेम ठेवून तिची सेवा निष्ठावंत भावाने करणारे अनेक झाले, त्यांत गोविंदजी हे पहिले होत. त्यांचा जन्म वर लिहिल्याप्रमाणे मडगांवनजीकच्या पेरी गांवी स. १८१५ साली झाला. तेथें त्यांचे वडील नारायणराव पोर्तुगाली तपकीर व कांही बारीक सारीक औषधें विकून त्यावर आपल्या कुटुंबाचा चरितार्थ मोठ्या कष्टानें व काटकसरीनें चालवीत असत. पण या वाढत्या कुटुंबाचा निर्वाह होणें त्या ठिकाणी कठीण झाले. तेव्हा स.१८२४ च्या सुमारास गोविंदजींच्या नवव्या वर्षी ते मुंबईस आले. तेथेही ते आपला धंदा चालवून आपल्या संसाराचा योगक्षेम चालवीत असत. गोविंदजींची शरीरप्रकृति अशक्त व नाजुक असल्यामुळें त्यांचा विद्याभ्यास लहानपणी नीट झाला नाही. याहून त्यांच्या बालपणची जास्त माहिती मिळण्यास मार्ग नाही. मुंबईत त्यांचे वडील मोठ्या सचोटीने चोख व्यवहार करीत. त्यामुळें व्यापारी गिऱ्हाईक व इतर लोक यांच्यांत त्यांची पत चांगली जमली. मुंबईत त्या वेळच्या पद्धतीने गोविंदजींचे बहुतेक मराठी व इंग्रजी शिक्षण झाले. त्यांचा इंग्रजी अभ्यास ४/५

वर्षे चालून सध्यांच्या प्रवेशपरीक्षेपर्यंत आला असावा असे दिसते. इतक्यांत स.१८३३ च्या सुमारास त्यांच्या वडिलांचा अंत झाला व कुटुंबपोषणाचा सर्व भार व जबाबदारी अल्पवयांतच त्यांच्या अंगावर पडली. त्यांचा शाळेतला अभ्यासक्रम सुटला. उदरनिर्वाहाच्या मार्गास लागणे त्यांस भाग पडले.

### निर्वाहाचा मार्ग

(४) त्यांचे इंग्रजी शिक्षण मिशनरी शाळेंत झाले असावें असें दिसतें. सुप्रसिद्ध डॉ. विल्सनच्या शाळेत प्रथम त्यांस लहानशी शिक्षकाची जागा मिळाली. क्रमाक्रमानें तेथेंच त्यांस बढती मिळत गेली. या एकाच शाळेत तीस वर्षे एकसारखे शेवटपर्यंत ते कामावर होते. मरणापूर्वी एक वर्ष मात्र, प्रकृति क्षीण होऊं लागल्यामुळें, स.१८६३ अखेर त्यांनी हे काम सोडलें. तेव्हां सर्वास फार वाईट वाटले. त्यांचे विद्यार्थी व इतर मित्रमंडळी यांनी या समयी मोठ्या आदरपूर्वक भक्तिभावानें ता. २८ जानेवारी स.१८६४ रोजीं त्यांस एक मानपत्र दिलें, आणि सुमारें रु. २००० वर्गणीनें जमा करून त्यांस नजर केले. ही गुरुदक्षिणा त्यांच्या अंतेवासी वर्गाच्या निर्भेळ व निर्मळ प्रेमाचे फळ होय. जाहीर सभेचे रेव्ह. डॉ. विल्सन हे अध्यक्ष होते.

अध्यक्ष या नात्यानें ते आपल्या भाषणांत म्हणाले : -

"Dr. Wilson mentioned that he had called the meeting on the requisition of a large number of the friends of Mr. Govindji Narayan, anaxious to present him with a testimonial, on the occasion of his withdrawing from active duty in the Free General Assembly's Institution, of which he was one of the earliest pupils, and a monitor and teacher for thirty years. He dwelt with much interest on his promise as a larner and his ability, fidelity, judiciousness, kindness, and perseverance as a teacher and Superintendent of some of the classes of the Institution on his accuracy and order in keeping the lists and accounts which were under his care on his constant endeavours, by essays and addresses, to promote the great cause of native reform and advancement; on the success which, in the view of all readers of Marathi and Gujarati, he had obtained in the seventeen popular original works, great and small, with which he had enriched the vernaoular literature of the West of India; and on the amiability and respectability of his character, observed and admired by all his friends and acquirntanees."

या सभेंत दोन ठराव पास झाले. पहिल्या ठरावानें, गोविंदजींनी फ्री जनरल असेंब्लीच्या शाळेंत ३० वर्षे अव्याहत केलेल्या दीर्घकालिक नोकरीबद्दल, त्यांनी आपल्या लोकांच्या उन्नत्यर्थ केलेल्या कळकळीच्या प्रयत्नांबद्दल आणि देशी वाङ्मय उत्पन्न करण्याच्या बाबतींतील त्यांच्या महत्त्वाच्या कामगिरीबद्दल, सभेने आपली पसंती व्यक्त केली; आणि दुसऱ्या ठरावाने, त्यांस कृतज्ञतादर्शक एक थैली अर्पण करण्यासाठीं वर्गणी गोळा करण्याचें काम एका कमिटीकडे सोंपविलें. या कमिटींत डॉ.भाऊ दाजी, विश्वनाथ नारायण मंडलिक, विठ्ठल नारायण फाटक, रा.ब. त्रिमलराव व्यंकटेश इनामदार, राव नाना मोरोबा, दादोबा पांडुरंग, रे. नारायण शेषाद्री, बाबा पदमनजी, व्हिसेंत द कुन्हा, जोसेफ इझिकेल, जॉन क्रिस्प, शापुरजी एदलजी, दिना मोरोबा, गुलाम मोहिदीन देहलवी, मोरोबा विनोबा, शांताराम नारायण, डॉ. अनंत चंद्रोबा, नारायण विश्राम, डॉ. आत्माराम पांडुरंग, इत्यादि नांवे आढळतात.

यावरून गोविंदजींबद्दल बहुमान, सद्भाव व आदर हीं नुसत्या शिष्यमंडळांतच होतीं असे नाही, तीं सार्वत्रिक होती, हें उघड दिसतें.

### उदात्त जीवनक्रम

(५) याप्रमाणें त्यांचा सारा जन्म "शिकणें व

शिकवणें'' या परमपवित्र कामास जसा काही वाहिल्यासारखा होता. त्यांत ते पूर्ण निष्णात झाले होते. त्यांचे सर्व विद्वत्ता स्वकष्टार्जितच दिसते. त्यांचे शाळेतलें शिक्षण तुटपुंजेंच, मुष्किलीनेंच प्रवेशपरीक्षेपर्यंत झाले होतें; पण स्वसंपादित पात्रतेनें लवकरच ते त्या मिशन हायस्कुलांत अध्यापक झाले. पुढें मरेपर्यंत त्यांजकडे शाळेच्या देखरेखीचें (सुपरिंटेंडेंट) काम होतें. उत्तम शिक्षक म्हणून त्यांचा चांगला नांवलौकिक होता. त्यांचे शिष्य त्यांस फार पूज्य व वंद्य मानीत. त्यांचा छात्रगण फार मोठा होता. त्यांत बरेचजण त्या वेळच्या अनेक शाखांत वरिष्ठ शिक्षणसंपन्न होऊन त्यांत पदवीधर झाले आणि नंतर आपल्या जीवनक्रमास लागले. जे राजसेवेंत गेले ते चांगले हुद्देदार झाले; स्वतंत्र धंद्यात शिरले ते संपन्न व लौकिकवान् बनले; लोककार्यात भाग घेणारे लोककल्याणकर्ते म्हणून गाजले. त्यांच्या शिष्यांत कांही तर उत्तम डॉक्टर, वनस्पतिशास्त्रसंशोधक, प्राक्कालीन इतिहाससंशोधक, उत्तम वकील, उत्तम वक्ते, उत्तम व्यापारी, ठेकेदार, अश्वविद्यापरीक्षक, राजमंत्री इत्यादि कामांत कालगतीनें नांवारूपास आलें. त्यांत सर्व जातींचे लोक दिसतात. हिंदु, मुसलमान, पारशी, यहुदी, देशी ख्रिस्ती वगैरे अनेक जातींचा भरणा त्यांत दिसतो. त्या सर्वांना आपले गुरु सारखेच पूज्य, प्रिय व मान्य वाटत शेवटपर्यंत ते सर्व त्यांस चाहत असत. नुसतें शाळेंतलें काम करूनच गोविंदजी स्वस्थ राहत होते असें नाही. त्यांचे खासगी शिक्षणाचे वर्ग होते. त्यांत अनेक गरीब, अस्थेवाईक मुलें मराठी व इंग्रजी शिकत. त्यांत डॉ.भाऊ दाजी, डॉ.नारायण दाजी, ना.नारायण वासुदेव दाभोळकर यांसारखे थोडे नामांकित झाले. गोविंदजी शेवटपर्यंत विद्यादान मुक्तहस्तानें सतत करीत होते. तेव्हां त्यांच्या उत्साहाप्रमाणें त्याचा कार्यभागही चांगला फलद्रूप झाला, यांत नवल नाही. त्यांचा स्वत:चा जीवनक्रम नमुन्यालायक, सद्भावप्रेरक, सद्बोधप्रद होता, त्यांचा स्वभाव मोठा मनमिळाऊ, प्रेमळ व गोड होता. त्यामुळे ते सर्वास तेव्हांच प्रिय होते व हवेसे वाटत. त्यांची शिकवण्याची अजब हातोटी, करामत व कुशलता ही त्यांचा दीर्घ अनुभव, अंतर्भेदक दृष्टि व मनुष्यस्वभावांचे मार्मिक ज्ञान यांचेच फल म्हणावें लागतें. या कामात निरभिमान, निर्लोभ, निरपेक्षता यांचे पाठबळही त्यांस कमी नव्हतें. नाही तर विद्यार्थ्यांची एवढी भींड त्यांजकडे जमली नसती. एकंदरीत त्यांचे हे काम सर्व लहानमोठ्यांना पसंत पडून सर्वमान्य ठरलें, ही गोष्ट मोठी आहे.

**अध्ययनाध्यापनप्रेम.**

(६) गोविंदजींच्या जीवनांत एक महत्त्वाचा विशेष मोठा विचारणीय, चिंतनीय व बोधप्रद वाटतो. त्यांची संस्कृति मूळांत जरी अल्प असली तरी पुढें ती बरीच विस्तृत, व्यापक व खोल होती, असें त्यांच्या अनेकविध लेखांवरून सहज समजतें. प्रवेशपरीक्षेच्या वर्गास ते चांगले शिकवूं शकत असत. त्यांच्या हयातींत ते चांगल्या विद्वानांत मोडत होते. त्यांच्या वेळीं इंग्रजी जाणणारे आता प्रमाणें पैशापासरी विकत नसत. त्यांचा भाव बराच तेजींत होता. शिवाय गोविंदजींची ओळखदेख, स्नेहसंबंध विद्वान व बड्या साहेब लोकांत फार चांगला होता, असे त्यांच्या खासगी इंग्रजी पत्रव्यवहारावरून दिसून येते. त्यांच्या मित्रमंडळांत नुसते मिशनरीसाहेबच होते असे नाही. त्यांत काही पोलिटिकल एजंटसारखे बडे इंग्रजी अधिकारीही होते. त्यांची गोविंदजींस आलेली बरोबरीच्या नात्याचीं, प्रेमळपणानें भरलेली, त्यांतील अनेकप्रकारच्या विद्याविषयक वादविवादानें मनोरम वाटणारी, खुलासेवार-वेळेनुसार खासगी, घरगुती मजकुराची पत्रें पाहून मोठें नवल वाटतें. या पत्रांत काळा गोरा, जितजेता, श्रेष्ठकनिष्ठ इत्यादि भेदभावाचा गंध दिसत नाही. उलट त्यांतील कुलानता, घरंदाजपणा, सभ्यपणा, देशी लोकांवर प्रेम व त्यांशी बंधुभाव, यांचा सुवास आनंद देतो. त्यांपैकी एका खासगी गोष्टीचा छोटासा उतारा पुढे देतों :- ''एका बड्या संस्थानिकानें मला भेट दिली. भाषणांत साखर इतकी कांही पेरली की, मला त्यांची अगदी शिसारी आली. शेवटी मला सध्या मिळत आहे व पुढें मिळेल त्याहून पुष्कळ अधिक वेतन देण्याचे कबूल करून 'मी त्यांच्या पदरीं राहून त्यांची सेवा करावी' म्हणून मला फारच

गळ घातली. पण 'अध्यवस्थितचित्तानां प्रसादोऽपि भयंकर:' या न्यायानें कोणत्याही मोहास वश न होतां मी या राजश्रीपाशी साफ नन्नाचा पाढा वाचला. यांत मी चांगले केले असे तुम्हांस वाटेल अशी मी आशा करतो'' अशा स्थितीत गोविंदजींचा राजसेवेंत शिरकाव होऊन इतरांप्रमाणें त्यांचा चांगला उत्कर्ष होणे अशक्य नव्हते; पण तो झाला नाही. अखेरपर्यंत ते नेमस्त वेतनावर - ६०रु. मिशनरी शिक्षणसंस्थेंतच कामावर होते, हे निर्विवाद आहे. यावरून त्यांस व्यक्तिविषयक महत्त्वाकांक्षा नव्हती आणि; त्यांचे ध्येय खऱ्या ब्राह्मणाच्या व्यवसायास विहित असेंच होतें, व त्यास अनुरूप असा स्वार्थत्याग करण्याची त्यांच्यात शक्ति होती; किंवा कदाचित' अशक्त शरीरप्रकृतीमुळें राजसेवेची यातायात त्यांस नकोशी वाटली असावी, असेंही असेल, तसेंच वरील पत्रव्यवहारावरून गोविंदजींच्या विद्वत्तेविषयीं विद्वान् साहेब लोकांमध्येही मोठा आदर होता, म्हणून ते त्यांच्याशीं विचारविनिमय करीत, त्यांस आपल्या ग्रंथाबद्दल सल्लामसलत विचारित, त्यांशी वादविवाद करीत; यावरून वरिष्ठ वाङ्मयात्मक प्रांतात गोविंदजींचा संचार चांगला होता, असें दिसतें. एकंदरींत त्यांचे जिवन उदात्त, जुन्या ऋषींप्रमाणें होते, म्हणूनच त्यांस सर्व मान देत. त्यांचा अधिकार आत्मिक प्रांतात होता, भौतिक प्रदेशातील नव्हता.

### ग्रंथकर्तृत्व

(७) गोविंदजींचे जीवनकार्य नुसत्या अध्ययनाध्यापन-कर्मात, त्यांच्या शिष्यसमूहाचेंच हित साधण्यांत संपायचे नव्हते. संपूर्ण साक्षर जनतेस त्यांच्या मंत्रोपदेशाचा लाभ, तिच्या ग्राहकशक्तीप्रमाणें, त्यांच्या ग्रंथलेखनाच्या द्वारें व्हावयाचा होता. त्यामुळें त्यांनी हा नवा राजमार्ग धरला आणि त्यायोगानें सर्व लोकांना ज्ञानामृत पाजण्यास शेवटपर्यंत अश्रांतपणे ते झटत होते. त्यांच्या वेळी ते नांमाकित व प्रमुख ग्रंथकारांत मोडत होते. त्यांच्या अध्ययनाध्यापनाप्रमाणेंच त्यांचा लेखन व्यवसायही सतत तीस वर्षे चालू होता. या दीर्घ अवधींत त्यांनी अनेक लेख लिहिले. त्यांपैकी बरेच त्या वेळच्या नियतकालीन पत्रांत प्रसिद्ध होत असत. त्यांत मराठी 'ज्ञानप्रसारक' नांवाच्या मासिकांत त्यांचे पुढील लेख छापले होते, याचा दाखला मिळतो.

१ अचाट खाणें मसणांत जाणे. २ अति सर्वत्र वर्जयेत ३ अन्न. ४ उद्भिजन्य पदार्थ. ५ कापूस. ६ कावळयाचा घरटा व मधाचें पोळे. ७ द्रव्येण सर्वे वशा:. ८ बळी तो कान पिळी. ९ भरतखंडांतील कारागीर. १० मुंबईचे वर्णन (दोन नकाशांसह). ११ रेशमी रुमाल.

हे सर्व लेख पुढें पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाले होते.

### स्वतंत्र पुस्तकरूपानें छापलेल्या ग्रंथांची यादी

१ऋणनिषेधक बोध. (दक्षिण भाषेंत भाषांतर करणाऱ्या मंडळीनें पसंत केले.) २ कुटुंबसुधारणा. ३ दारूपासून अनर्थ. ४ नीतिसंवाद. ५ पत्रावळी व द्रोण. ६ भोजनबंधु पानतंबाखु - (संवाद). ७ यत्नेन किं दुर्लभम् ८ लोखंडी सडकांचे चमत्कार. ९ वृक्षवर्णन (दक्षिणाप्राईस कमिटीनें बक्षीस दिले). १० व्यवहारोपयोगी नाटक. ११ शुचिर्भूतपणा. १२ सत्यनिरूपण.[१] १३ सुलेखनविद्या. १४ सृष्टींतील चमत्कार - (दक्षिण भाषेंत भाषांतर करणाऱ्या मंडळीने पसंत केलें.) १५ हिंदु लोकांच्या रीति सुधारण्याविषयीं बोध.

याशिवाय वासुदेव कृष्ण म्हालेकृत 'रोम शहराचा संक्षिप्त इतिहास' त्यांनी तपासून शुद्ध केला.

वरील ग्रंथापैकी उद्भिज्जन्य पदार्थ व सत्यनिरूपण या दोहोंचे गुजराथी भाषेंत भाषांतर करून त्यांनी प्रसिद्ध केले.

### ग्रंथकर्तृत्वाची संदिग्ध रूपरेखा व सामान्यस्वरूप

(८) आतां या रूपरेखेचें दिग्दर्शन करून त्याचा ठसा जो माझ्या मनावर उमटला आहे, तो पुढें देतो. पण तसे करण्यापूर्वी इतके सांगितले पाहिजे कीं, तो कितपत यथारूप व यथातथ्य आहे, याबद्दल माझी मलाच शंका आहे; कारण प्रयत्न करून देखील गोविंदजींचे सर्व लेख मला वाचण्यास मिळाले नाहीत;

इतकेंच नाही, तर जे मिळाले तेही फारच थोडे आहेत. त्यावरून त्यांचया संपूर्ण लेखाचें सामान्य स्वरूप देणें बरेंच कठीण व धोक्याचें होय. "शितावरून भाताची परीक्षा" हा न्याय विविध विषयांवरील लेखांत अंशत: मात्र लागू होईल. अशा स्थितींत पुढील विवेचन बरेचसं अनुमानपद्धतीवरच करणें भाग आहे, हे ध्यानांत ठेवून पुढील विवरण वाचावें, अशी वाचकांस प्रार्थना आहे.

**धार्मिक, नैतिक व सामाजिक अंगे.**

(९) गोविंदजींच्या सर्व लेखांचे वर्गीकरण वर दिलेंच आहे. त्यात पहिले तीन विभाग ( सामाजिक, धार्मिक व नैतिक) यांचा एकमेकांशी इतका निकट संबंध आहे की, त्यांची पूर्ण ताटातूट केंव्हाच करता येत नाही. तेव्हां त्यांचे वर्णन एकत्र देणें सोइस्कर आहे. अर्थात् ते (लेख) त्या काळच्या सुशिक्षित समाजाच्या मताचे द्योतक आहेत.

इंग्रजी शिक्षणप्रसार या इलाख्यांत सुरू झाल्यावर पहिल्या पिढींत जे आपल्या कलमबाहद्दरीमुळे विद्वान् म्हणून गाजले, त्यांतच गोविंदजी हे एक होते. त्या सर्वांची मतें व विचार ही परम उदार, व्यापक, प्रगतिपर व व्यावहारिक होती. तीं त्या वेळच्या लेखांतून प्रसिद्ध होत असत. त्यामुळे नव्या तरुण जनांचे मानसक्षेत्र विशाल, सुपीक, सत्त्वसंपन्न व सत्कार्यक्षम होत असे. परंपरागत दुराग्रह, देवभोळेपणा, वेडगळ समजुती, अज्ञानजन्य गैरसमज, सदोष आचारविचार, इत्यादि काटेरी रानें व विषारी वनस्पति हीं नाहींशी करण्याचा त्यांचा प्रयत्न होता. त्यांत या नव्या सुधारणादेवींचे प्रथम स्वरूप व्यक्त होतें; ईश्वराचें पितृत्व व मनुष्यमात्राचं बंधुत्व हीं दोन तत्त्वें पायासारखी होती. त्यांच्या अनुरोधानें चालू लोकप्रचार व व्यवहार यांत इष्ट व शक्य ते फेरफार करण्याचे धोरण होते. परंपरासंरक्षक व विवेकप्रवर्तक असें वळण त्यांत असे. रूढिजन्य पण सत्शास्त्रनिशिद्ध भेदाभेदास जनविरोध अत्यल्प असलेल्या दिशेने मागें सारण्याचा उपदेश त्यांत असे. निरर्गळ बरळाबरळ, अप्रस्तुत प्रलाप, जुन्याची अकारण व निरर्थक नालस्ती, कुचेष्टा किंवा नव्याची अवास्तव प्रशंसा, स्वकीय सद्गुणांविषयीं अनादर, परकीय दोषांवद्दल आदर व पक्षपात, स्वधर्मविरोध व परधर्मदास्यत्व, परवशताप्रेम याचा विटाळही त्यांत दिसत नसे. परमतासहिष्णुत्व व स्वमताभिमानातिरेक हींही त्यांत नसत. या सर्व गोष्टींमुळें त्यांचे वजन विचारी समाजांत चांगले पडलें. त्यांचा बराच जयजयकार होत असे. हे लेख पोक्त, प्रौढ व भारदस्त विचारांचे समजत. त्यामुळे त्यांचा इष्ट परिणाम होत असे. त्यांत भटपांड्यांविषयीं बखेडा व वल्गना; पुरंदरचें बंड; भिक्षुक, शास्त्री, पंडित, पुराणिक वगैरेंच्या कुचाळ्या; वेदशास्त्रसंपन्न मंडळीच्या दक्षिणेची थट्टा; वेदशास्त्रांचा उपहास; पुराणें हीं शिमगा; जुनें तें सर्व थोतांड, नवें तें सर्व सोने; असा वेडगळ प्रकार या लेखांत दिसत नाही. जुने विशिष्ट दोष दाखवून त्यांचा निषेध केला आहे. नवे शिष्ट गुण सांगून त्यांचा गौरव केला आहे.

**गोविंद नारायण व 'लोकहितवादी.'**

(१०) या दृष्टीनें वरील बाबतींत गोविंदजी व 'लोकहितवादी' हे लेखक तुलनात्मक पद्धतीनें फार विचारणीय वाटतात. त्यांत त्या काळच्या लोकमतांची दोन प्रधान अंगे स्पष्ट दिसतात. दोन्ही लेख तसेंच त्यांचे कर्ते बरेचसे समकालीन होते. पहिल्यामध्यें त्या काळच्या पोक्त, प्रौढ, विवेकवादी पण परंपरापोषक, सारासारविचारसंपन्न नेमस्त सुशिक्षित लोकमतांचे स्वरूप मनोहर दिसते; आणि दुसऱ्यांत तत्कालीन ज्ञानलवदुर्विदग्ध, अर्धशिक्षित, पाश्चात्य ज्ञानाच्या तेजांतील आभासनें दिपून गेलेले, अपक्व, अप्रौढ, अंध, सन्मार्गभ्रष्ट, सारासारविचार शून्य, मूढ, नूतनवयस्क, व पोरकट अशा मानसिक उताच्या पोकळ शुभ्र फेंसाचा प्रसार दिसतो. हा प्रभाव पाश्चात्यविद्येच्या प्रथमावस्थेच्या वारुणी मदाचा होता, हें ऐतिहासिक दृष्टीस सहज कळण्यासारखें आहे. कारण, त्या वेळचें विकासदृश विचारांचे वातावरण, मराठेशाहीची शेवटील सैतानी व इंग्रजी अंमलाचे रामराज्य; पहिल्यांतील अत्यंत हिडिस, विजोड, अमंगल भेदाभेद,राक्षसी, सौजन्यविघातक अत्याचार, अनाचार,

आणि दुसऱ्याचें अत्यंत सौम्य, सदाचारसंपन्न, न्यायी वाटणारें, शांतता देणारे, मनमिळाऊ धोरण, या द्रव्यांच्या घटकावयवांनी बनले होते. अशा स्थितीत त्या वेळच्या मूढ बाजारबुणग्या लोकसमूहाच्या मानसोदधीस जोराची अनावर भरती उसळून पोकळ विकृत भावनांचा फेंस सर्वत्र पसरण्यास अवसर मिळाला. त्याचे रज:कण सर्वत्र हवेत भरले. ती अत्यंत कुंद झाली. ती स.१८२० ते ६० पर्यंत थोडीफार तशीच राहिली. याची साक्ष त्या वेळचीं वृत्तपत्रें, नियतकालिकें, व्याख्यानें, वादविवाद यांच्याद्वारें हवी तेवढी मिळते. पण यांत अस्वाभाविक कांहीच वाटत नाही. पण हा प्रकार साधारण लोकांस मात्र लागू होता. त्यावरून त्या वेळी संपूर्ण जनतेमधून सुविचार, विवेक, सारासार विचार, भेदाभेदज्ञान, ही सारी लुप्त झाली होती असे मात्र नाही. प्राय: कोणतीही प्राचीन पुराणसिद्ध टिकाऊ समाजस्थिति सर्वस्वीं निर्जीव, नि:सत्व, अचेतन असत नाही. कोठेही सर्वसाधारण लोक स्वयंप्रकाश नसतात; परप्रकाशच असतात. मोठा समाज चांगला असूनही थोडाफार तरी मेषवृत्ति असणारच. त्यांच्यातली विचारशक्ती निद्रिस्त असते. पोटार्थीपणा व इंद्रियाराम हा त्यांचा जातिस्वभाव होय; म्हणून तत्त्ववेत्ते

'The great army of the indolent good leading excellent lives and never using their reason'

अशी त्यांच्या जातिस्वभावाची व्याख्या देतात, अर्थात् या स्वभावापासून त्याच्या मानसिक क्षेत्रांत घातप्रत्याघातांचे प्राबल्य माजून वेळेनुसार भयंकर क्षोभ उपजतो. 'दुनिया झुलती है झुलानेवाला चाहिये' या म्हणींत हाच अर्थ भरला आहे. पण यावरून तो जड पदार्थ आहे. त्यांत चलनवलन नाही, असें होत नाही. ते केवळ त्याचें अंग असून त्याचा दुसरा अंशच कालगतीनें सत्कार्यास प्रेरक, पोषक, उत्तेजक व वर्धक होतो. आणि या कोटीत गोविंदजींची कृति येते - म्हणून त्यांची गणना त्या वेळच्या प्रमुख ग्रंथकारांत झाली. तसेच आतां त्यांचे ग्रंथ जरी मागें पडले तरी त्यांचे नाव मराठी वाङ्मयाच्या इतिहासांतून नाहीसे होणार नाही.

**इतर लोककार्ये**

(११) गोविंदजी त्या वेळच्या मराठी "ज्ञान-प्रसारक मंडळी"च्या चालकापैकी एक प्रमुख सभासद होते. तिचें पुनरुज्जीवन त्यांनी एकदा केले होते. ती त्यांनी बरींच वर्षे जागृत ठेवली. त्यांच्यामागें ती थोड्याच वर्षांनी बंद पडली. तिच्या मासिकांत ('ज्ञानप्रसारक') त्यांनी बरचे लेख लिहिले असतील, पण त्यांतील अकरा लेखांचाच दाखला मिळाला. त्यांची नावे वर दिलींच आहेत. याशिवाय स. १८५७ चें बंड मोडून चोहोकडे शांतता झाल्यावर ता.२८ जुलई स. १८५९ रोजी त्यांनी केलेली परमेश्वराची प्रार्थना ज्ञानप्रसारकाच्या आगष्ट १८५९च्या अंकात छापली आहे. ती प्रार्थनासमाजांत होणाऱ्या उपासनेसारखी दिसते. इंग्रजी शिक्षण प्रसार सुरू झाला तेव्हां मिशनरी शाळेंत शिकलेले कांही तरुण विद्यार्थी ख्रिस्ती झाले. त्यांपैकी एकानें (बाबा पमदनजी) आपल्या एका लेखांत ('अरुणोदय') गोविंदजी हे अंतर्यामीं ख्रिस्ती मताचे होते, पण बाहेरून मात्र त्यांनी बाप्तिस्मा घेतला नव्हता, असे ध्वनित केले आहे. पण तें निराधार दिसते. कारण त्यांच्या कोणत्याही लेखांत ख्रिस्ती धर्ममताचा पक्षपातदर्शक गौरव अगर स्वधर्ममताचा अनादर कोठेही केलेला दिसत नाही. त्याच प्रमाणे तत्कालीन लोकमतांत ही गोष्ट प्रसिद्ध नाही. सदरप्रमाणेंच स्वज्ञातीबद्दल पक्षपात अथवा अनादर हींही त्यांच्या कृतींत व्यक्त अगर लेखात दिसत नाहीत. उलट तिच्यांतील दोष त्यांनी तिऱ्हाइताप्रमाणें स्पष्ट दिले आहेत. जातिमत्सरास त्यांनी आपल्या लेखांत वाव दिला नाही.

**राजकीय अंगाचा अभाव**

(१२) त्या वेळच्या बहुतेक लेखकांप्रमाणे गोविंदजींच्या कृतींत राजकीय भागावर कांही लिहिलेले दिसत नाही. प्रसंगोपात्त एखाद्या जागी राजकारणाचा संबंध आला तर त्याच्या ओझरता उल्लेख आहे, तो बहुधा अनुकूळ व स्तुतिपरच आहे. आणि याचें कारणही उघड आहे. त्या वेळी सर्व लहानथोराला प्रचलित राज्यपद्धति उत्तम भासत होती. तिचे दोष

पाहण्याकडे लोकमताचा कल नसे. परंतु त्यावरून ती सर्वांना निर्दोष अगर सर्वगुण संपन्न वाटत असे, हे अनुमान मात्र बरोबर नाहीं. कांही विशेष व खास बाबतींत चालू अंमलावर टीका मुळींच होत नव्हती असें नाही. खुद्द मराठी ज्ञानप्रसारकांत देखील कधीं कधीं ती येत असे. पण ती बरीच सौम्य असे. उलटपक्षी प्रचलित धार्मिक, नैतिक व सामाजिक दोषांचा निषेध मात्र बराच कडक आहे. हाच प्रकार गोविंदजींच्या लेखांतही असे. या दृष्टीनें हे सर्व लेख त्या काळांतील वस्तुस्थितिदर्शक होत. ऐतिहासिक दृष्टीनें ते अजूनही वाचनीय आहेत. आणि चांगल्या पुस्तकालयांत त्यांचा संग्रह असणें अगत्यांचे आहे. शिवाय या लेखांत जागोजाग प्रसंगविशेषीं ज्या जुन्या दंतकथा दिल्या आहेत त्या फार चांगल्या आहेत. उदाहरणार्थ त्यांनी दिलेली "हेमाडपंती मोडी लिपी" खालील दंतकथा तिच्या प्रस्तुतच्या स्वरूपांतही पुष्कळांना नव्यासारखी मजेदार वाटेल :-

"हेमाडपंत रामेश्वराचे मोठे भक्त होते. एके दिवशी ते रामेश्वराची पूजा करीत असतां सुमारे दोन प्रहरीं त्या देवालयांत रावणाचा बंधु बिभीषण रामेश्वराची पूजा करावयास नेमाप्रमाणें आला. तेव्हां त्याचें दिव्य स्वरूप पाहून हेमाडपंत घाबरून गेले. त्या समयीं त्यांनी सूक्ष्म रूप धारण केले; आणि त्या देवालयाच्या कोनांत निर्माल्य पडलें होतें त्यात लपून राहिले. बिभीषण पूजा आटोपून वहिवाटीप्रमाणे कोनांतून निर्माल्या काढून शेंडींत घालून लंकेस चालता झाला. त्या निर्माल्यांत बिभीषणाच्या शेंडीत चिकटून हेमांडपंत लंकेत गेला. मग बिभीषणाचें भोजन झाल्यावर जेव्हां त्यानें शेंडी झाडली तेंव्हा तो जमिनीवर पडला. त्या वेळी आपलें रूप प्रगट करणें हेमाडपंतास प्राप्त झाले. बिभीषणानें त्याला पाहताच लंकेस येण्याचें कारण विचारलें असता त्यानें झालेला वृत्तांत त्यास सांगितला. मग बिभिषणानें त्यास परत स्वदेशास जाण्याची सोय करून दिली. हेमाडपंतांनीं तेथून येतेवेळी मोडी अक्षर, गुंजा, बाजरी आणि बावनकशी सोनें, हे पदार्थ या देशांत आणले, - असा विलक्षण वृत्तांत सांपडतो."

तसेंच लहान लहान गोष्टी देऊन वस्तुस्थितीचें हुवेहुब वर्णन करण्याची अनुकरणीय शैली पुढील उताऱ्यांत पहा :-

**लक्ष्मीपुत्राच्या विद्याभ्यासाची तऱ्हा.**

"या राजश्रीच्या दिवसाचे मान दुसऱ्या साधारण लोकांच्या मानाप्रमाणें नव्हतें. त्यांचा एक दिवस तो चार महिने, आणि १०/२० मिनिटे तीं २/३ तास! या मानाने महिन्या दोन महिन्यानें मर्जीस येईल तेव्हां गुरुजीस आपली भेट घेण्यास तो बोलावणें पाठवी. मग ५/४ हुजरे मंडळी जवळ घेऊन बूक उघडून वाचावयास प्रारंभ करी. हुजऱ्यांमध्यें कोणी भोजनबंधु, कोणी छानछोकी, कोणी खुषामती, कोणी अलमटप्पू कोणी खुशालचेंडू असे असत. मग बूक उघडून 'जी डबल् ओ डी गुड्' हा शुब्द अडखळत अडखळत तो वाची; इतक्यात एक खुशामती उडून 'जीते रहो महाराज, जीते रहो' असे म्हणून दोन्ही हातीं मुजरा करी. दुसरा 'वाहवा! वाहवा! महाराजांनी तर मोठी बहार उडविली. महाराजांना इंग्रजी चांगले समजतें, भले गाजी !' असें म्हणून दोन्ही हातांनी मुजरा करून खाली बसे. मग तिसरा त्याच्या इंग्रजी अक्षराची स्तुति करूं लागे. चवथा म्हणजे, 'मालकाची इंग्रजी लिहिण्याची खुबी उत्कृष्ट आहे. यांसारखा इंग्रजी अक्षर काढणारा आपल्या येथें एकही सांपडणार नाही.' पांचवा म्हणे, 'यांचें मोडी अक्षर तर मोत्यांचा दाणा-आपले मुख्य मुनीमजी यांचे अक्षर पाहून मान डोलवितात-जीते रहो मालक!' असें म्हणून दुसरा एक मोठा मुजरा करून खालीं बसे. ही स्तुति ऐकून हे राजश्री तल्लीन होऊन त्यांजकडे पाहत बसत. मग एक उठून म्हणे, 'मालकांस फार श्रम झाले, आता पुरे करावें,' असें म्हणून जमिनीस कपाळ टेकून दोन्ही हातांनी मुजरा करी-इतक्यांत हे राजश्री उठून अंत:पुरांत चालते होत. आमच्या कित्येक बडे लोकांची विद्याभ्यास करण्याची बहुधा अशीच वहिवाट आहे."

अशीं गोविंदजीच्या ग्रंथातून अनेक उदाहरणें देता येतील; पण विस्तारभयास्तव तसें करता येत

नाही. तसेंच गोविंदजींच्या लेखांत अनेक नव्या म्हणी वाचण्यांत येतात, त्या सध्यांच्या 'म्हणींच्या संग्रहां' देखील सांपडत नाहींत.

### वनस्पतिशास्त्रविषयक लेख

(१३) या विषयावरील गोविंदजींचे ग्रंथ त्यांच्या वेळी चांगले वाटले, आणि त्यांपैकी एकास (वृक्षवर्णन) 'दक्षणा प्राईझ कमिटी'ने बक्षीसही दिले होते. पण आतां ते अपुरे व जुनाट वाटल्यास नवल नाही.

### ऐतिहासिक वर्णनपर ग्रंथ

(१४) त्यांचे 'मुंबईचें वर्णन' हा ग्रंथ चांगला वाचनीय आहे. त्याची चारशेंहून जास्त पानें आहेत. त्यांत या राजधानीचे स.१८६२ तील स्वरूप चांगले मनोहर व यथातथ उतरलें आहे. तिची मूळपीठिका, क्रमिक वाढ, ती होतांना तिजवर आलेलीं गंडांतरें, साडेसात्या, अनर्थ, अपघात, त्यांतून तिची सुटका, पुढील स्थित्यंतरें, रूपांतरें, उत्कर्षापकर्ष, तिचें व्यापारी व राजकीय महत्त्व, अलीकडील भरभराट; तसेच तेथील नाना प्रकारच्या राजकीय संस्था, लोकसंस्था, शिक्षणसंस्था, चळवळी, घडामोडी, उलाढाल्या, विविध चित्रविचित्र लोकसमूहांचे देखावे, नानातऱ्हेचे रीतरिवाज, पोषाख, नाच, रंग, तमाशे, मौजा; शहराचे निरनिराळे भाग, त्यांतील विशेष, स्थानिक विद्वज्जनांचीं वर्णनें, इत्यादि असंख्य देखावे दृष्टीपुऐं तरंगून मन थक्क व दंग होते, देहभान विसरतें. यावरून ग्रंथकर्त्याची कलमवहाद्दरी, शोधकता, जिज्ञासा, भाषाप्रभुत्व, वर्णनशैली, विवेचनपद्धती, मार्मिकता, व्यापक व अंतर्भेछक अवलोकनशक्ति, इत्यादि अनेक गुण पाहून पुस्तक हातांतून खालीं ठेववत नाही. जेथे वाचावें तेथें मन रमतें. पुनर्वाचनाचा कंटाळा येत नाही. हा ग्रंथ भाषांतर नाही, स्वतंत्र आहे. त्यांतील पुष्कळशी माहिती कर्त्यांने स्वत: मोठ्या कष्टानें गोळा केली, आणि चांगलया चिकित्सकपणाने तपासून साधार सादर केली आहे. ती पूर्ण विश्वासपात्र वाटते. एकंदरीत हा ग्रंथ मी पाहिलेल्या सर्व लेखांत फार मनोरम वाटला. तो मला फार आवडला. गिबनच्या इतिहासानंतर त्याहूनही अनेक वरिष्ठ प्रतीचे इतिहास झाले, तरी मूळ ग्रंथ वाचनीयच राहिला आहे व राहील', असे मॉरिसननें म्हटलें आहे. हें विधान या ग्रंथास लागू पडेल. आतां याहूनही वरिष्ठ ग्रंथ शहरवर्णनावर असले तरी हे पुस्तक सदा मनोरमच वाटेल.

### किरकोळ ग्रंथ

(१५) गोविंदजींचे 'सृष्टींतील चमत्कार' नावाचें चार रुपये किमतीचे पुस्तक मुंबईचया ग्रंथसंग्रहालयांत असल्याचे समजतें. पण तो ग्रंथ मला पहाण्यास मिळाला नाही. तेव्हां त्याच्या अंत:स्वरूपाबद्दल कांही लिहिण्यास मार्ग नाही. त्याशिवाय त्यांच्या अवांतर किरकोळ लेखांत विशेष सांगण्यासारखे कांही नाही.

### अंत

(१६) शिकवण्याची आणि शाळेच्या देखरेखीची दगदग झेपेना, म्हणून स.१८६३ अखेर गोविंदजींनी आपले मिशनरी शाळेंतील काम सोडले. नंतर ता.२८ जानेवारी स.१८६४ रोजीं त्यांचा शिष्यवर्ग व मित्रमंडळी यांनी त्यांस मानपत्र आणि सुमारें ६००० रुपयांची थैली देऊन त्यांचा मोठा गौरव केला.[२]

नोकरी सोडल्यावर ते सव्वा वर्ष होते. त्यांची प्रकृति मूळचीच फार अशक्त असे. रात्री लिहिण्या-वाचण्याचें काम त्यांच्या हातून फारसें होत नसे. नियमितपणानें वागून होता होईल तों दिवसाच ते आपले लिहिण्याचें काम उरकीत. त्यांच्या लेखांचा कालानुक्रम देणें कठीण होय. त्यास साधन मिळत नाही. त्यांच्या 'सत्यनिरूपण' या पुस्तकाची पहिली आवृत्ति १८५२ सालीं अमेरिकन मिशन प्रेसमध्ये छापिली. त्यांच्या मुंबईच्या वर्णनावर स. १८६३ साल आहे. बाकीच्या लेखांच्या पुनरावृत्ति स. १८९१ व १८९३ सालात छापलेल्या मला मिळाल्या. तेव्हा त्यावरून मूळ साल ठरविणे शक्य नाही. काम सोडल्यावर त्यांनी काही लिहिले की नाही हे सांगता येत नाही. त्यांचा अंत ता. १५ मार्च स. १८६५ रोजी झाला.

**माडगांवकर व ॲडिसन.**

(१७) एका विद्वान् निबंधकारानें गोविंदजींस मराठीचे ॲडिसन म्हटले आहे. पण तें अंशत: मात्र खरे दिसतें. दोघांचे जीवनकार्य व इतिवृत्त यांत काहीसें साम्य आहे. तें असे:- दोघांचीही भाषा साधी, सरळ, सुबोध, शुद्ध व मनोरम वाटते.[३] दोहोंतही समकालीन समाजस्थिति, लोकाचार, लोकमतें, धर्मविधि, लौकिकी रीतरिवाज, रीतभात वगैरे गोष्टींचे प्रतिबिंब अंतर्भेदक दृष्टीस पाहण्यास मिळतें.

दोहोंतही धार्मिक, नैतिक, सामाजिक सुधारणेविषयीं चर्चा व उपदेश केला आहे; गैरशिस्त व वेडगळ चालीरीती व आचारविचार यांचा निषेध व उपहास केला आहे. दोघेही जवळ जवळ सारख्याच वयांत वारले. येथवर दोहोंतही साम्य दिसेल. उलटपक्षीं, दोहोंतही फरक तितकाच ठळक दिसतो. तो असा: पहिल्यास वरिष्ठ शिक्षणाचा मुळांत गंधही नव्हता. त्याची सर्व विद्वत्ता स्वसंपादित होती. ती शास्त्रोक्त नव्हती. पण दुसऱ्याला त्या काळात मिळणारें वरिष्ठ शिक्षण सांग विधीनें मिळाले होते. तो विद्यालयांत बराच नांमांकित होता. पुढेंही त्याचा विद्याव्यासंग मरेपर्यंत कधी खळला नाही. यांमुळे त्याची संस्कृति चांगली गहन, व्यापक अंतर्भेदक झाली. तिला त्याचें बुद्धिवैभव, कल्पकता, मार्मिकता, नाजुक विनोद, मनमोहक लेखनशैली यांची जोड मिळून त्याच्या लेखांत जी जादू भरली आहे तिनें त्या वेळच्या लोकांना नुसते वाचायला व विचार करायलाच शिकविलें इतकेंच नाही, तर त्यांना वेड लावून सोडलें; आणि अजूनही त्याचा निबंधसंग्रह अनेकदां पुनरावृत्तिरूपाने छापला जाऊन त्याचा खप कमी झालेला नाही. नवीन ग्रंथकारास तो मार्गदर्शक होत आहे. सध्यांही त्याचा प्रभाव कमी नाही. तो चिरकालीन झाला आहे. या मानानें गोविंदजींच्या ग्रंथांचा प्रभाव, विस्तार व व्याप याचें प्रमाण फार अल्प दिसतें. पहिल्यांतली जादू दुसऱ्यांत बहुतेक नाहीशीच भासते. शिवाय पहिल्याच लेखनव्यवसायास त्या वेळच्या बऱ्याच नामांकित कलमबहाद्दरांनी हातभार लावून हा संग्रह बराच विविधांगी आणि बहुश्रुतपणास विकासक, उत्तेजक व पोषक बनविला आहे. तशी गोष्ट गोविंदजींची नाही. त्यांची कृति सर्वस्वी एकांगी व एकहाती आहे. त्यामुळें तिच्यांत वाग्देवतेच्या मनोव्यापाराचा चित्रविचित्र, चित्ताकर्षक विलास व विहार फार अल्प वाटतो. या लेखांमुळे समकालीन समाजांत नि:संशय सुविरजागृति झाली, सुशिक्षणास मदत मिळाली, प्रगतीस चलनवलन मिळालें, सुधारणांची वाट सुगम झाली. पण असें असलें तरी या लेखाचे महत्त्व हंगामी आहे; शाश्वत नाही किंवा चिरकालीन नाही. आतां त्यांचा उपयोग ऐतिहासिकदृष्टीने मात्र आहे. पण सर्वसामान्य जनसमूहास ते फारसे मनोवेधक वाटणार नाहींत. तात्पर्य, इंग्रजी व मराठी वाङ्मयाची सापेक्ष जी प्रत लागेल, तीच पहिल्याच्या दुसऱ्याच्या ग्रंथांची लागेल असें मला वाटतें. ही तुलना 'शितावरून भाताची परीक्षा' या न्यायाने केली आहे. कारण गोविंदजींचे सर्व लेख मला वाचायला मिळाले नाहींत हे वरतीं सांगितलेच आहे. अशा स्थितींत ठाम मत देणें कठीण आहे.

**माडगांवकर व डॉ.टी.आर्नोल्ड**

(१८) ॲडिसनपेक्षा रग्बी विद्यालयाचा मुख्य अध्यापक डॉ.आर्नोलड याच्या जीवनकार्याशी गोविंदजींच्या कृतीचें साम्य दिसते. कारण दोघांचाही सारा जन्म एकाच शाळेंत अध्ययनाध्यापनाच्या पवित्र कार्यास वाहिल्यासारखा होता. दोघांच्याही शिष्यमंडळींत मोठे नामांकित विद्वान, संशोधक, मुत्सद्दी, लोककार्यकर्ते, लोकोपकारकर्ते पुढारी निपजले. दोघांनीही आपल्या हयातींत चांगले ग्रंथकार म्हणून नाव मिळविले, भावी प्रजेस सन्मार्गाचा कित्ता घालून ठेवला; पण पहिल्याच्या ग्रंथांतील टिकाऊ, गहन, गंभीर, व्यापक ऐतिहासिक तत्त्वज्ञान, दीर्घदृष्टि, तात्त्विकपद्धती, अंतर्भेदकता, मनोवेवधकता, यांचे मान दुसऱ्याच्या कृतींत बरेंच कमी पडेल.

### पहिल्या चौघां प्रमुख मराठी गद्यग्रंथकारांतील विशेष

(१९) पहिल्या पिढीच्या प्रमुख व प्रसिद्ध मराठी गद्यग्रंथकारांत चौघांची नावे कालानुक्रमाने प्रथमारंभीं दिलीच आहेत. त्यांच्याद्वारें नव्या मन्वंतरास आरंभ झाला; वृत्तपत्रें, मासिकें, त्रैमासिकें, ग्रंथलेखन, व्याख्यानें, लोकसंस्था, इत्यादि प्रकारांचे बीजारोपण झाले; लोकमत जागृत करण्याचे यत्न सुरू झाले; अनेकांगी सुधारणांचे निरूपण होऊ लागलें. या सर्व गोष्टींत या चौघां पुढाऱ्याचा थोडा फार हात होता. त्यापैकी पहिल्याने (छत्रे) आपल्या लोकप्रिय व मनोरम ग्रंथांच्या द्वारें लोकांना वाचनाची गोडी लावून उदार मतें, पायाशुद्ध समाजरचना, अनेकांगी सुधारणादेवींचीं चित्रें, यांची ओळख करून दिली. दुसऱ्यानें (जांभेकर) मराठी भाषेंचे नियमन करून तिच्यांत प्राथमिक शिक्षणाची सोय सोपपत्तिक ग्रंथांच्या द्वारें केली. शिक्षणप्रसारास आरंभ केला. त्याप्रीत्यर्थ इंग्रजी-मराठी वर्तमानपत्र, मासिक पुस्तक, त्रैमासिक ही काढली. व्याख्यानद्वारें लोकांत विद्येची गोडी लावली, ज्ञानाची आवड उत्पन्न केली. सामाजिक सुधारणा कृतीच्या द्वारें अमलांत आणण्याचा प्रयत्न केला. त्यास जनविरोध होऊन त्यांचा लोकच्छळ झाला. तो त्यांनी मुकाट्यांने सोसला. प्राक्कालीन ऐतिहासिक विषयांत इंग्रजी भाषेंत उनेक उत्तम निबंध लिहून ते छापल्यावर पाश्चात्य विद्वानांत उत्तम संशोधक म्हणून त्यांचा बहुमान अझूनही आहे. या सर्व गोष्टीमुळें त्यांस सर्वांत श्रेष्ठ मानतात. तिसऱ्याने (हरी केशवजी) उत्तम ग्रंथरचनेच्या द्वारे ज्ञानप्रसार केला. इंग्रजी उत्तम ग्रंथांची मराठींत बेमालुम प्रतिकृति उतरण्यांत त्यांचा हातखंडा असे, असा त्यांचा मोठा लौकिक होता, प्रत्यक्ष जनविरोधक कार्यात तो शिरला होता असें दिसत नाही. संशोधक कार्यांत त्यांचे अंग असे. या तिघां समकालीन पुढाऱ्यांच्या कार्यभागाचा सादर उल्लेख आपल्या "मुंबईवर्णन" नामक ग्रंथांत गोविंदजींनी करून जांभेकराचें संक्षिप्त इतिवृत्त देऊन त्यांच्या विविधांगी लोककार्याचा सहानुभूतिपूर्वक गौरव केला आहे. तो मोठा वाचनीय आहे. गोविंदजींच्या जीवनकार्याचा तपशील वर आलाच आहे. तेव्हां त्यांची पुनरुक्ति येथे नको.

### स्वकालोपयोगी ग्रंथांचे महत्त्व

(१९) कोणत्याही वाङ्मयांत आपापल्या कालानुरूप कार्यभाग करणारेच बहुतेक लेख असतात. सर्वकालोपयोगी ग्रंथ फारच थोडे ठरतात. पण या वरून ते टाकाऊ किंवा विस्मरणीय होत, असें मात्र नाही. चिरकालीन नसले तरी असे लेख स्वकालीन सुधारणेस प्रेरक, उत्तेजक, साधक, पोषक व वर्धक असतात. सुधारणेच्या रथास ते गति देतात आणि त्याचा मार्ग सुगम करण्यास मदत होतात. त्यांचे कर्ते मोठे थोर पुरुष असतात. कालगतीनें त्यांचे लेख जरी मागें पडले तरी त्यांबरोबर कर्त्याचें नाव लोपत नाही. या वर्गांतील पुरुष आपल्या कृतीहून अधिक श्रेष्ठ व वरिष्ठ असतात. पूर्वोक्त चौघां पुढाऱ्यांचे लेख आतां लोकांपुढें नसून त्यांची नांवे बहुमानपूर्वक सर्वत्र उल्लेखिली जातात, याचे कारण त्यांचा लोककल्याणकारक जीवनक्रम हें होय. त्यांतील क्षारानें (salt) सामाजिक देह टिकून राहतो, तो नासून जात नाही; नामशेष होत नाही. त्यांचे लेख, उपदेश, निरूपण, सद्बोध यांपेक्षा त्यांचे उदात्त चरित्र लोकोद्धारक होतें.

### उपसंहार

(२०) एकंदरींत प्रस्तुत विषयनायक हे पहिल्या पिढीच्या प्रमुख मराठी ग्रंथकारांच्या चौकडीपैकी शेवटले होत, असें मानतात. पहिल्या तिघांच्या कृतीचें यथाशक्ति व यथासाधन परिशीलन करून तिच्या रूपरेखा यापूर्वी स्वतंत्र लेखांत सादर केल्या होत्या.[४] आतां शेवटच्या कलमबहाद्दराचा परामर्ष करून वाचकांची रजा घेतो.

*(म. सा. पत्रिका, सप्टेंबर १९१८, पृष्ठे १०९ ते १२१)*

---

१. मुंबई कौन्सिलचे सभासद ना. जॉन विलोबी यांनी आक्टोबर १८५१ त

"Observance of Truth with special reference to the administration of justice and the advancement of the best interest of Society."

या विषयावर बक्षिसें लावून ग्रंथ मागविले होते. त्याअन्वयें "सत्यनिरूपण" हा ग्रंथ गोविंदजींनी लिहिला, आणि

त्यास बक्षीसही मिळून तो १८५२ त छापला गेला. या ग्रंथाच्या शेवटी ग्राहकांची जी यादी दिली आहे तीवरून गव्हर्नरसाहेब लॉर्ड फॉक्लड, चीफ जस्टिस सर अर्किन् पेरी, मेजर ली ग्रॅंड जेकब, सर जमसेटजी जिजीभाई यांनी या ग्रंथाच्या प्रत्येकी २०/२० प्रती घेतल्याचे दिसून येते. वरील लेखांपैकीं कालांतरानें काहींच्या अनेक आवृत्त्या निघाल्या होत्या. काहीं लेख २५/३० पानांचे अल्पस्वल्प होते पण कांही ४००/५०० पानांचे विस्तृत व खुलासेवार होते. त्यांच्या किंमतीही पाव आण्यापासून चार रुपयेपर्यंत होत्या. त्यांत त्यांच्या नावाप्रमाणें विविध विषयांचे विवेचन व उद्‌घाटण केले होते. स्थूल मानानें त्यांचे वर्गीकरण पुढें देतो :- १ सामाजिक, २ धार्मिक, ३ नैतिक, ४ पदार्थविज्ञानशास्त्रविषयक, ५ वनस्पतिशास्त्रविषयक, ६ प्राक्कालीनइतिहासविषयक वर्णनात्मक, ७ किरकोळ. वरील सर्व लेखांत राजकीय विषयांचे नाव नाही, हा विशेष लक्षांत घेण्यासारखा आहे. पण तो त्या काळांत सर्वसामान्य होता. ती आतां मिळत नाहींत. क्वचित् जुन्या पुस्तकालयांत त्यांपैकी कांही जीर्णावस्थेत आपला काळ मोठ्या कष्टानें काढीत आहेत, असें दिसतें. चिरंजीव व टिकाऊ भाग त्यांत फारसा असेल, असे वाटत नाही. आपल्या हयातीत इष्ट व कल्याणप्रद लोककार्य त्यांच्याद्वारें घडून ती सार्थकी लागली असे म्हणावे लागतें. त्यांनी आपल्या काळी अंतर्गत घोषणेनें निकोप, निरोगी, सात्त्विक, शुद्ध, उन्नतिप्रद आणि प्रगतिपर विचारांचे वातावरण बनवून, पुढच्या लोककार्यकर्त्यांना मार्ग दाखविला व प्रगतीचा राजमार्ग सुगम केला. आंतां त्यांच्या लेखांचे महत्त्व म्हटले तर ते केवळ ऐतिहासिकच राहिलें आहे.

२. यासंबंधाने, त्यांचे वडील चिरंजीव कै. जगन्नाथराव यांच्या एका खासगी लेखांतील पुढील उतारा वाचकांस बोधप्रद वाटेल :-

"मरणाचे अगोदर काही दिवस डॉ.विल्सनसाहेब घरी येऊन त्यांस म्हणाले :- 'आजपर्यंत तू माझी नोकरी इमानें इतबारें केलीस हे माला माहित आहे. व तुजपाशी कांही संचय नसेल. कारण दरमहा अगदीं थोडा होता. कुटुंब मोठे असून एकाचीच काय ती आयपत.' तेव्हा ते म्हणाले की, 'मी तुझ्या हाताखाली शिकलेल्या विद्यार्थ्यांकडून काही रक्कम गोळा करून देतो. म्हणजे तुझ्या धाकट्या मुलांचा चरितार्थ चालण्यास कठीण पडणार नाही.' त्यासमई बोलण्यास शक्ति नव्हती, तरी त्यांनी हळुहळु सांगितलें कीं- 'मजसाठी एवढी खटपट करू नका. ईश्वर साह्य करील.' असें म्हणून ते उभे राहिले. साहेब परमेश्वराची प्रार्थना करून निघून गेल्यावर, लौकरच त्यांनी सभा करून सुमारें चार हजार व कै.डॉ.भाऊ दाजी, डॉ.नारायण दाजी, विश्वनाथ नारायण मंडलिक, नारायण वासुदेवजी व दुसरी मंडळी मिळून दोन हजार, अशी रक्कम करून दिली. त्याचें जांबुळवाडींत घर घेतले आहे."

३. खरे पाहिलें तर गोविंदजींची जन्मभूमि गोवे प्रांतात. तेथे त्यांचे बालपण गेले. मुंबईसारख्या बकाली शहरांत त्यांचा जन्म गेला. त्यांनी असे सुरेख मराठी लिहिणें म्हणजे असामान्यच खरे.

४. छत्रे यांचे चरित्र विविधज्ञानविस्तार, पुस्तक ३१, अंक ९-१० यांत, जांभेकर यांचे स्वतंत्र पुस्तकांत, हरि केशवजी यांचे चरित्र वि.ज्ञा. विस्तार, पु. ४३, अंक ६-६ यांत- प्रसिद्ध झाला आहेत.

*

# कै. हरि नारायण आपटे यांचें त्रोटक चरित्र

**काशीबाई कानिटकर.**

*[मराठी भाषेचे आद्य कादंबरीकार हरी नारायण आपटे ह्यांचे चरित्र बहुआयामी होते. कादंबरीलेखनाव्यतिरिक्त त्यांचे समाजकार्य, सहृदयता, विद्याव्यासंग, संपादनकार्य, प्रकाशनकार्य इ. अनेक या पिढीला अज्ञात गुणांचे दर्शन काशीबाई कानिटकर ह्यांनी, त्यांच्या सुबोध प्रासादिक शैलीत घडविले आहे. मराठीतील स्त्री-कथाकार व कादंबरीकार म्हणून प्रसिद्ध झालेल्या पहिल्या पिढीतील लेखिका काशीबाई कानिटकर ह्या ह. ना. आपटेंच्या ज्येष्ठ मानसभगिनी होत्या. हरीभाऊंना त्या आपले लेखनगुरू मानीत असत. हरीभाऊ आपटे यांची धर्ममते, त्यांचे मवाळ राजकारण, त्यांच्या समाजकार्यामुळे झालेली लेखनहानि इ. अनेक अंगांनी हे चरित्र वाचनीय व मननीय झाले आहे. काशीबाई कानेटकरांनी सुधारणा युगातील काही वादळे उदा. पंचहौद मिशन, ग्रामण्य प्रकरण इ. जुन्या-नव्या मतांची शिक्षितांच्या घरोघरी काय स्थिती असे ह्यांचा नेमका परामर्श घेतला आहे. —संपादक]*

**आमची ओळख**

रा.हरीभाऊंची व माझी चांगली ओळख सन १८८४ । १८८५ सालच्या सुमाराला झाली असावी. त्यापूर्वी त्यांचे चुलते कै. महादेव चिमणाजी आपटे, हायकोर्ट वकील, यांची ओळख होती. मुंबईस त्यांचे व आमचे घर जवळ जवळ असल्यानें, व त्यांच्या येथे जो 'गायनसमाज' होता त्या समाजाचे सेक्रेटरी असायचें असल्यामुळें, त्यांच्या घरी नित्य संध्याकाळी जाणें होत असे. शिवाय नवीन होतकरू वकिलांना जुन्या कसलेल्या वकिलांची ओळख करावीच लागते, त्याहीसंबंधानें त्या दोघांचा बराच परिचय होता. माधवरावांच्या घरीं गायनसमाज असल्यामुळें मुंबईतील बरीच ठळक ठळक मंडळी तेथें येत असत. त्यात कै.का.त्र्यं. तेलंग, ब्यारिस्टर, आणि कै. शांताराम नारायण, कै. ग.रा.किर्लोस्कर, कै. घनश्याम निळकंठ नाडकर्णी वगैरे हायकोर्टाचे बरेचसे वकील असत. त्याच सुमाराला कै. अण्णासाहेब किर्लोस्कर यांच्या संगीत शाकुन्तलाच्या चार अंकांचे प्रयोग पुण्यामुंबईस फार लोकप्रिय झाले होते. संगीताबद्दल फारसे विरुद्ध मत नव्हतें, पण मूळ नाटकाच्या भाषांतराबद्दल मतभेद होता; व त्यासंबंधाने गोष्टी निघत. गायनाचा वर्ग संपला म्हणजे वरील मंडळी गप्पा गोष्टी करीत बराच वेळ बसत. त्या मंडळींत वरील विषय चर्चेस निघाला व कै. माधवराव आपट्यांनी शाकुंतलाचे चार अंकांचे मूळाबरहुकूम आणि सटीक भाषांतर करण्याचे ठरविले. 'मौजेच्या चार घटका' या नांवानें तें प्रसिद्ध आहे.

हें भाषांतर करीत असतां जेवढ्या भागाचें भाषांतर होई तेवढाच भाग घेऊन ते आमच्या येथे येऊन त्यावर आमचीं मतें घेत. याच संधीस हरीभाऊ मुंबईस आपल्या काकांच्याकडे आले होते. त्यांची व आमचे येथील माधवरावांनी ओळख करून दिली. एक दिवस ते आमच्या घरींही त्यांना घेऊन आले होते, व साधारण तोंडओळख करून दिली.

कै.माधवराव आपटे प्रत्येक वेळी आमचे घरी येत, याचे कोणास थोडे आश्चर्य वाटेल. पण त्यांच्या

घरी स्त्रियांनी जाण्यासारखी स्थिती नव्हती. कारण घरात कोणी बायकोमाणूस नसे. त्याचप्रमाणें माधवराव रोज गप्पा गोष्टी करण्यास बसतीलच असाही नेम नसे. त्याही कारणानं जी मंडळी तेथें जात ती बहुतकरून बाहेरच्या बाहेरच जाऊन, गायनवादनाचा वर्ग झाला की परत येत. माधवराव मंडळींत येऊन बसले, तर ते होऊनच मंडळीस दुसऱ्या खोलींत घेऊन जात. अशामुळें त्यांनाच आमच्या येथें यावें लागे.

यानंतर हरीभाऊंची व माझी विशेष ओळख झाली ती अशी. प.वा.गोपाळराव आगरकर यांनी 'हॅम्लेट' नाटकाचे भाषांतर करून त्यांनी ते आर्यभूषण प्रेसमध्ये छापण्यास दिलें. माझे चुलतसासरे कै. नारायण बापूजी कानिटकर यांना नाटकें लिहिण्याचा फार नाद असे व ते वर्षातून एक दोन नाटकें लिहून त्यांचे प्रयोग करवीत. या त्यांच्या व्यवसायामुळें नेहमीं एखादें नाटक छापत असे. एकदां ते व आमच्या येथें आणि कै.वा.वा.रानडे व कै. हरीभाऊ (हाय ! हाय! माझ्या नशिबीं आज साऱ्याच नांवांपुढें कै. हे अक्षर घालण्याचें आलें आहे.) वगैरे मंडळी आपल्या कामासाठी छापखान्यांत गेली असतां त्यांच्या दृष्टीस आगरकरांचे प्रूफस् पडले. ते त्यांनी वाचून पाहून त्या भाषांतराची त्या मंडळीनें खूप थट्टा केली, व त्याच बैठकीला आमच्या इकडे भाषांतर करण्याचें ठरलें. दुसरे दिवसापासून हे चौघेही पुण्यास आमच्या राहत्या घरी, माडीवर खोलीचें दार बंद करून, झालेलें भाषांतर तपाशीत. यांतच माझे वडील बंधु कै. शंभुराव कृष्ण बापट हेही असत. प्रत्येक वाक्यावर-शब्दावरही-त्यांचे मत घेण्यांत येई. या मंडळीत बसण्याचा मान क्वचित् प्रसंगी मला मिळे. त्यामुळे हरीभाऊंची व माझी चांगली ओळख झाली. पण फार दाट अशी नव्हती. ही गोष्ट १८८४ त झाली असावी असे वाटतें. पुढें १८८५ च्या मेच्या सुट्टीत आम्ही घरी पुण्यास आल्यानंतर आपलें स्वत:चे एक मासिक पुस्तक असावे अशाबद्दल गोष्टी निघूं लागल्या. त्या प्रसंगानेंही हरीभाऊ आमचे येथे वारंवार येऊं लागले. मासिक काढण्याचा विचार नक्की ठरला. त्यांत आम्ही पांच सहा जणांनीच लेख लिहिण्याचें पत्करले. रा. गं. अ. ठाकूर यांनी त्याच्या मॅनेजमेंटचे काम पत्करले. रा. हरीभाऊंनी 'गणपतराव' कादंबरीला त्यांतच आरंभ केला. आमच्या माणसांनी 'स्त्रियांच्या परवशते'या भाषांतराला सुरुवात केली व मी 'रंगराव' कादंबरी लिहू लागलें. रा.ठाकुरांनी आणखी कांही लेख लिहिण्याचें पत्करले. कै. नारायण बापूजींनी काही लिहिन म्हटले होतें, त्यांनी त्याप्रमाणें "बाजीराव आणि मस्तानी" हे ऐतिहासिक नाटक लिहिलें. या मासिकामुळे रा. हरीभाऊंचा व माझा परिचय जास्त वाढला. मासिकाचा संबंध आल्यानें आम्ही एकमेकांस पत्रे लिहू लागलो, व त्यांनी मला आपली वडील बहीण म्हणून मानली. त्या वेळेपासून अखेरपर्यंत ते मजशी धाकट्या पण प्रेमळ भावाप्रमाणेंच वागत होते.

यानंतर ते एक वेळ महिना दीड महिन्याच्या फुरसदीनं आमच्या येथे नगर जिल्ह्यांत एका तालुक्याच्या गांवी राहण्यास आले होते. तेव्हां त्यांचा चांगलाच परिचय होऊन त्यांच्या आवडीनावडी, त्यांचे आवडते विषय, वगैरेबद्दलची मला माहिती झाली. त्या सर्व गोष्टी सांगण्यापूर्वी त्यांच्याचकडून मला जी त्यांच्या संबंधाची पूर्व माहिती कळली होती, ती सांगण्याचा येथें यत्न करतें.

हरीभाऊंचा जन्म १८६४ ता. ८ मार्च रोजी झाला. त्यांची जन्मदात्री आई ते दोन अडीच वर्षांचे असतांच वारली. त्यांना सख्खें भावंड नव्हतें. लहानपणीं त्यांचा संभाळ त्यांची चुलती म्हणजे माधवरावांची पत्नी हिनें केला. पण तीही फार दिवस वांचली नाही. त्यानंतर माधवरावांच्याच जवळ ते असत. हरीभाऊ लहान असतांना आपटे मंडळी पुण्यास आसनीकर जोशांच्या वाड्यांत राहात असत. त्यांची मुंज वगैरे त्याच घरांत झाली. माधवरावांची वकिलीची परीक्षा पास होईपर्यंत ही सर्व मंडळी पुण्यास होती. पुढें माधवरावांनी वकिलीची सनद काढल्यावर ते मुंबईस गेले. त्यानंतर कांही दिवसांनी कै. नारायणराव ऊर्फ नानासाहेब यांचीही बदली मुंबईस जनरल पोस्टांत झाली, व सर्व मंडळी मुंबईसच राहूं लागली. फक्त

माधवराव ऊर्फ अण्णासाहेब यांची मातु:श्री व तिची बहीण व कांही मुलें पुण्यास असत. ही अण्णासाहेबांची मावशीच घरप्रपंचातील कामे पाहत असे, व ती त्या कामांत मोठी दक्ष असे. नानासाहेब व अण्णासाहेब फक्त हातखर्चाला लागेल एवढी रक्कम आपलेपाशी ठेवून घेऊन बाकी सर्व पैका तिच्या स्वाधीन करीत. ती 'आपल्या सुना नातवंडे वगैरेंना कपडालत्ता, दागदागिना, औषधपाणी वगैरे सर्व करी. घरांतील वर्षाची धान्य वगैरेची बेगमी करणें, चाकर नोकर पाहून ठेवणें काढणे, लग्नाच्या मुली असल्या तर त्यांना स्थळे पाहणे, मुलांना केव्हा मुंजीचा मुहूर्त लाभतो वगैरे पाहून ठरवणें, वगैरे सर्व कामें तीच करी. ती व्यवहारांत मोठी दक्ष असे. तिचे स्वत:चे मूलबाळ कांहीएक नव्हतें. पण बहिणीच्या परिवारालाच आपले समजून त्यांना ती मोठ्या प्रेमानें वागवी व शिक्षण देई.

त्या काळी स्त्रियांनी बाजारांत वगैरे जाणें गैर समजत असत. पण चिमामावशी (त्यांचें नांव चिमाताई होते) त्यासंबंधानें बेफिकीर होत्या. त्यांना आपण स्वत:जाऊन जिन्नस खरेदी केल्याशिवाय चालत नसे व दुसऱ्यांची खात्री वाटत नसे. सकाळी भाजी आणण्यास त्या मुलांना पाठवीत. पण त्यांच्या जवळून त्या पैन् पैचा हिशोब घेत व प्रत्येक बारीक सारीक जिनसेचा भाव विचारीत. अशी कर्त्या पुरुषाप्रमाणें मावशीच्या अंगी कर्तबगारी असल्यामुळें त्यांचे भाचे नानासाहेब, अण्णासाहेब हे त्यांच्यावरच सर्व विश्वास टाकीत यांत नवल काय?

हरीभाऊ व मनुआक्कांचा गजानन वगैरे मुलं पुण्यास मावशीच्या देखरेखीखालीच विद्याभ्यासास होती.

हरीभाऊंची आई वारल्यावर थोड्याच म्हणजे वर्ष दोन वर्षांनी अण्णासोहबांचेही कुटुंब वारले. त्यामुळे अण्णासाहेब विदेही होऊन मुंबईस एकटेच राहूं लागले. हरीभाऊंची आत्या मनुआक्का यांचा नवराही त्याच सुमारास वारला, व त्यांचा सासरा दोन्ही डोळ्यांनी आंधळा होता, त्यामुळे मनुआक्कांच्या घरची सर्व मंडळी सासऱ्यासुद्धां आपट्यांच्या घरीच राहण्यास आली. त्या सर्वांचा खर्चवेच करणें नानासाहेबांवरच येऊन पडले. नानासाहेबांनी द्वितीय संबंध केला होता. परंतु ती माऊली स्वभावाने फार चांगली असल्यामुळें घरांत भांडणें तंटे कांहीं झालीं नाहीत.

हरीभाऊ व गजाननराव हे साधारण वयानें सारखेच असल्यासारखे होते. ते दोघेही पुण्यास मावशीच्या देखरेखीखाली शिकत असत. नानासाहेबांचा द्वितीय संबंध झाल्यापासून नोकरीच्या गांवावर लक्ष्मी काकू व ब्राह्मण जात. बाकी सर्व मंडळी पुण्यास राहात असत. हरीभाऊंचे दुसरे चुलते कै. गोविंदराव मात्र कधी पुण्यास तर कधी मुंबईस असत, व त्यांची बायकामुलें पुण्यासच असत. त्यामुळे पुण्यांत पुरुषमंडळींत घरचे मोठे म्हणजे हरीभाऊच असत.

त्यांची आजी पुण्यास असे. पण ती माउली सकाळी उठून नित्यक्रम आटपून देवघरांत हरिनामाचा जप करीत बसे; नंतर शाळेत जाणाऱ्या मुलांच्या बरोबर जेवण आटपून आपल्या खोलींत जाऊन बसे. त्यांच्या डोळ्यांनी फारसे चांगले दिसत नव्हते. त्याचप्रमाणें बुद्धि व कर्तृत्वशक्ति कमी असल्यामुळें त्या कोणच्याच घरगुती भानगडीत पडत नसत. कोणी त्यांच्याकडे आलें तर त्याच्याशी दोन शब्द बोलावे,नाही तर आपलें नामस्मरण करीत स्वस्थ बसावें, असा त्यांचा पाठ असे. संध्याकाळी श्रीजोगेश्वरीच्या देवळांत पुराण श्रवण करण्यास दोघी बहिणी जात. तेथून आल्यावर पाय धुवून देवघरांत कांही स्तोत्रपाठ करून झाला म्हणजे एक मूठभर भुईमुगाचे दाणे खाऊन वर पाणी पिऊन पुन्हां आपल्या अंथरुणावर येऊन बसत. दाणे खाण्याच्या वेळी हरीभाऊ जवळ असले तर त्यांच्या हातावर थोडे घालीत. पण ते जर तेथें नसले तर त्यांच्यासाठी त्या काढून ठेवीत व ते जेवायला आले, म्हणजे त्यांच्या हातावर देत. पण दुसरी मुलें जवळ असली तरी त्या मुलांच्या हातावर घालीत नसत! दाणे देत ते सुद्धा इतर मुलांच्या नकळत मुकाट्यानें हरीभाऊंच्याच हातांत देत.

हरिभाऊंना मराठी शाळेत असल्यापासूनच कादंबऱ्या वाचण्याचा नाद होता. पण त्यांना मोडी लिपीचा

भारी कंटाळा असे. हिशेबाचाही कंटाळा असे. मोडी पत्र वाचावयाचें म्हणजे त्यांना महत्संकट वाटे. आणि त्याकाळचा खाजगी पत्रव्यवहार बहुतेक मोडींतच होत असे.

एकदां अशी गोष्ट झाली होती म्हणून ते सांगत की, त्यांच्या आप्तांत कोणाचे तरी लग्न मुंबईत ठरले होते. त्यासाठी नित्य मुंबईची पत्रें येत, व कांही तरी सामान वगैरे त्यांत मागितलेले असे. ती पत्रे वाचण्यास बहुतेक मारवाड्याच्या गोतासारखे गोत जमा होऊन त्यांतील एकएक अक्षर एकएक जण उकली, व कसाबसा पत्राचा मजकूर समजून घेऊन सामान रवाना होई. यावेळी मावशी मुंबईस होत्या. लग्नतिथि अगदी जवळ आल्यावर एक पत्र आलें, तें वाचण्यास गजानन व हरीभाऊ दोघेच होते. तें पत्र त्या दोघांनी आपल्या मतानें लावून ते ती जिन्नस शोधण्याकरितां गांवांत खूप भटकले, व जिन्नस मिळत नाही असें समजून उलट मुंबईस तार करून सुद्धां मोकळे झाले. नंतर रात्रीं जेवण्याच्या वेळीं ते घरांतील मंडळीस सांगूं लागले की, काय बोवा इतके हिंडलो, पण एक सुद्धां धोबी मुंबईस जाण्यास कबूल होईना! आणखी त्यांना तर तो उद्यां सकाळींच तेथें पाहिजे!! यावर त्यांच्या काकूनें विचारलें की, सगळ्यांच्या अगोदर धोब्याची काय गरज लागली? हरिभाऊ म्हणाले, "मला ग काय ठाऊक! उद्यां सहा वाजतां पोहोंचेल, अशा बेतानें त्याला पाठव म्हणून मावशीनें लिहिलें आहे." काकूंना फार आश्चर्य वाटलें, व त्यांनी तें पत्र मागून घेऊन दुसऱ्या एकाकडे वाचण्यास दिलें, तों त्यांत मजकूर होता कीं, "उद्यां देवकप्रतिष्ठा करावयाची आहे, तरी सकाळीं सहा वाजतां येऊन पोहोचतील अशा बेतानें उपाध्येबोवांची रवानगी ताबडतोब करावी!!!"

खरा प्रकार कळल्यावर सर्वांच्या हांसून हांसून मुरकुंड्या वळल्या. नंतर घाईघाईनें रात्री जेवून उठून उपाध्येबोवांकडे जाऊन त्यांची त्या रात्री मुंबईस रवानगी केली, व उपाध्येबोवा निघाल्याची दुसरी तार दिली! यासारखेच आणखी एक दोन मोडी वाचनाचे नमुने त्यांनी मला सांगितले होतें.

हिशेबाचाही घोटाळा त्याचसारखा होता; व तो घोटाळा, मला वाटतें, त्यांच्या आयुष्यांत त्यांना अखेरपर्यंत भोंवला होता, हें सर्वविश्रुतच आहे.

### हरीभाऊंचे प्रथम लग्न

कै.रा.दामोदर विद्याधर गोखले यांची कन्या मथूबाई इजशी झालें होतें. ही बाई आपल्या वडिलांची व आजीची फार लाडकी होती. कारण दामोदरपंतांना तीन अपत्यें झाल्यावर त्यांचे प्रथम कुटुंब निवर्तलें, व या मुलांचे संगोपन त्यांची आजी व वडील यांनीच केलें होते. मथुराबाई ऊर्फ रमाबाई या स्वभावाने फार सालस होत्या. माहेरच्या लाडक्या असल्यामुळे माहेरी जाण्याकडे त्यांचा थोडा जास्त ओढा होता; व आपल्या जुन्या पद्धतीप्रमाणें सासुरवासिणीस वागावें लागत असल्यामुळेंही वरचेवर माहेरी जाऊन मनाला मोकळेपणा मिळावा असें मुलींना वाटत असलें तर तें अस्वाभाविकही नव्हतें.

पण या त्यांच्या स्वभावामुळें त्यांना मोठा त्रास होई, व कधीं कधीं त्या, ही गोष्ट हरिभाऊंच्या जवळ सांगत. पण ते तिचें सांगणे ते थट्टेवारी नेऊन तिलास उलट रडकुंडीस आणीत.

रमाबाईस तीन अपत्यें झाली. त्यांत पूर्ण मासांचा (महिन्यांचा) असा एकच मुलगा झाला व त्याच्या तिसऱ्या दिवशी रमाबाईंना ताप व संग्रहणी यांचा विकार होऊन सातवे दिवशी आपलें अज्ञ बालक व प्रेमाची माणसें यांस सोडून त्या परलोकी गेल्या.

रमावहिनी गेल्यामुळें हरीभाऊंना अतोनात दुःख झाले. हरीभाऊंचा स्वभाव विनोदी असे, व रमावहिनी फार साधी भोळी बायको असे. हरीभाऊ सारखें तिची थट्टा करीत, ती थट्टा असें तिला न वाटून तें बोलणें खरेंच समजून ती त्याप्रमाणें वागे. आणि पुनःथट्टेला पात्र होई. अशामुळें तिला वाटे कीं, आपण कांहींही केलें तरी तें त्यांच्या मनाजोगें होत नाही, व आपणास सासरच्या माणसांची मर्जी संपादन करतां येत नाही. त्यामुळें त्या नेहमी हिरमुष्टी असत. ही गोष्ट त्यांच्या मृत्यूनंतर हरीभाऊंच्या मनाला फार लागली. आपण विनोद म्हणूनच करीत होतो. पण त्यापासून तिला

ताप झाला, या गोष्टीचें त्यांना फार वाईट वाटे. अल्पकाळही आपल्या हातून तिला सुख मिळालें नाही, ही गोष्ट त्यांच्या हृदयाला टोचीत राहिली.

रमावहिनी निवर्तल्यावर त्यांचे बालक त्यांच्या मागें दोन महिनेच होते. दोन महिन्यांनी तेंही आपल्या मातोश्रीकडे गेलें. या दोन मृत्यूंमुळें हरीभाऊंना फार दुःख झालें, तें इतकें की, त्या दुःखाचा परिणाम त्यांच्या शरीरावर होऊन ते तेव्हांपासून वारंवार आजारी पडूं लागले. त्या वेळेपासूनच त्यांच्या हृदयाचे ठोके केव्हां केव्हां जास्त होऊं लागले एकाएकी घसा भरून आल्यासारखा होऊन श्वासोच्छ्वासाला अवरोध होतोसें वाटूं लागलें. हा प्रकार बहुधा रात्री, पहांटे, तिनीसांजा असा होई. रमावहिनी गेल्यावर कितीक दिवस हरिभाऊंनी साखर, विडा व अंथरुणांत गादी वर्ज केली होती. पुढें बरेच दिवसांनी स्नेह्यांच्या आग्रहावरून ते साखर खाऊं लागले. ते व आम्ही सर्व त्याच वर्षी पाचगणी व महाबळेश्वर येथें उन्हाळ्यानिमित्त गेलों होतो. तेव्हां त्यांना एकाएकी घसा भरून येणें वगैरे विकार होतच होते. पण महाबळेश्वरी गेल्यावर थोडे बरें वाटलें. तेथे आम्ही डोंगराच्या निरनिराळ्या शिखरांवरून व टोंकावरून हिंडत असतां त्यांच्याशी वादविवाद करून त्यांचे मन वळवून त्यांना साखर खावयास लावलें व अशा तऱ्हेनें दुःखाचें प्रदर्शन करण्यापेंक्षा मनांतल्या मनांत तें जागरूक ठेवून लोकांशी आनंदाने वागण्यांतच जास्त धैर्य आहे, तें लोकांस दाखविण्यांत कमकुवत पणा आहे, आपल्या दुःखामुळें दुसऱ्याचा आनंद नाहींसा करणें हें पाप असून त्याचा आनंद वाढविणे हें पुण्य आहे अशासारखें नित्य बोलून बोलून त्यांचे मन वळविलें.

हरीभाऊ यावेळी डेक्कन कॉलेजांत पी.ई.च्या क्लासांत होते. त्यांनी याच्यापूर्वीच "आजकालच्या गोष्टी" लिहिण्यास सुरवात केली होती. पण मला मात्र तें माहीत नव्हतें. त्यावेळी सुधारक पक्षावर यथेच्छ तोंडसुख घेणाऱ्या पक्षाचें एक 'पुणेंवैभव' नावाचें आठवड्याचं वृत्तपत्र निघत असे. त्या पत्रांत ही कादंबरी क्रमशः येऊं लागली. ती कोणाच्या लेखणींतून उतरते हें ठाऊक नव्हतें; व पुणेंवैभवासारख्या पत्रांत येते असें असूनही ती फार सुंदर आहे, तिचा कर्ता कोणी कां असेना? पण लेखक फारच वरच्या कोटींतला असून प्रतिभासंपन्न आहे; असला चांगला लेखक प्रतिपक्षाच्या गोटांत असूनही आपण त्याचा पत्ता लावून त्याचीं अवश्य भेट घेऊं, असें आम्ही आपसांमध्ये ठरविलें. ती कादंबरी केव्हां येईल व आपण केव्हां वाचूं असें होई. त्या दिवशींचे टपाल घेऊन येणारा माणूस टपाल माझ्या हातीं अगोदर देतो, कीं तिकडे देतो, याकडे डोळे लागत "मधल्या स्थिती"तील थिएटरचा देखावाच प्रथम माझ्या दृष्टीस पडला. ती दारांतील गर्दी, ती प्रत्येकाला घाई असल्यामुळें दुसऱ्याचा पाय आपल्या जोड्याखालीं चेंगरतो आहे, व तो आयायाई करीत असतां बेपर्वाईनें जाणाराची धिटाई, प्रत्येकाचे डोळे स्टेजकडे लागलेले असल्यामुळें होणारी चेंगराचेंगरी, इत्यादि अगदी हुबेहूब वठवलेलें चित्र पाहून माझें तिकडे लक्ष्य गेलें. व तेव्हांपासून हा इतका सुंदर लेख लिहिणारा तरी कोण असावा, हें जाणण्याची अत्यंत उत्कंठा लागली.

माझे कनिष्ठ बंधु चि. रिसालदार स.कृ.बापट यांचा माझा खासगी पत्र्यव्यवहार होत असतां मी आपल्या पत्रांत त्यांनी वरील कादंबरीलेखक कोण असेल तो असो, परंतु तो फारच वरच्या दर्जाचा आहे, आपण पुणें गांवांत गेलांत तर तो कोण आहे वगैरे चौकशी करून माहिती मिळाल्यास मला कळवाल काय? असे विचारलें. त्यावर त्यांचेकडून पत्र येऊन त्यांनी 'आपले प्रिय बंधु रा. ह.ना.आपटे' असे लिहिल्यावर आम्हां दोघांना किती आनंद झाला असेल याची कल्पना वाचकांनीच करावी. नंतर मी लगेच त्यांना पत्र लिहिलें व आम्हांपासून नांव छपविल्याबद्दल विनोदानें ख़ूप दोष दिला, व पुणेंवैभवासारख्या पत्रांत कादंबरी दिल्याबद्दल खरोखरचा दोषही दिला.

याच सुमारास रा. हरीभाऊंना घरांतून बराच त्रास झाला. हरीभाऊंना म्हणण्यापेक्षां पुण्याच्या पुष्कळ

सुधारक मताच्या लोकांना त्रास झाला असें म्हणण्यास हरकत नाही.

पांचहौदमिशनमध्ये चहा घेणाऱ्या ४२ सांवर पुण्याच्या ब्रह्मवृन्दानें घातलेल्या बहिष्कारानें सर्व पुणें शहरभर वणवा पेटला होता. बेचाळिसांच्या सोयऱ्याधायऱ्यांत, आप्तांत व भाऊबंदांत एकच गडबड उडाली होती. प्रत्येक घरांत थोडा फार या ग्रामण्याचा धागा जाऊन पोहोंचला होताच. प्रत्येक घरच्या सासुरवासिनी, माहेरवासिनी यांस कोणाचीं माहेरें, कोणाचीं आजोळें, कोणाची दृष्टभेट वगैरे बंद झाली होती. याप्रमाणें हरीभाऊंनाही घरांत त्रास झाला होता. दुर्दैवानें पहिल्या रमावहिनी नुक्त्याच परलोकवासी झाल्या होत्या, व त्यांचे बालकही त्यांच्या मागोमाग गेले. हरीभाऊंचें अंत:करण त्या दु:खानें व्याप्त झालेलं असतांच त्यांच्यावर या प्रकरणी आणखी आग पाखडली जात असे. यामुळें, घरांत जो मनाला आनंद, शांति वाटावयाची, तें उलट घरी जाण्याचें त्यांना संकटच वाटे.

या चहाप्रकरणांत कोण कोण कशीं कशीं गुंतलीं गेली व कोणा कोणास कसाकसा त्रास भोगावा लागला, याची आठवण केली कीं अंगावर शहारेच येतात; व आतांचा हा पालटलेला काळ व तो काळ यांची तुलना करूं लागलें की हंसूंच येतें.

## हरीभाऊंचें दुसरें लग्न

सन १८९० सालच्या मे महिन्यांत आम्ही सर्व पंचगणी व महाबळेश्वर येथें गेलों होतों, असें वर सांगितलेंच आहे. त्यावेळी हरीभाऊंना मुली सांगून येत होत्या, व प्रो. पानसे त्यांत मन घालून मुली पसंत नापसंत ठरवीत असत. महाबळेश्वरीं असतांना कै. रावसाहेब रानड्यांचा मुक्कामही तेथेंच होता. त्यांच्या एका जिवलग मित्राची मुलगी उपवर झाली होती, व हरीभाऊ व मी बहीणभावंडांप्रमाणे वागत आहों तें त्यांना ठाऊक होतें. एक दिवस सकाळीं रावसाहेब आमच्या बिऱ्हाडी येऊन आम्हां सगळ्या मंडळीला जेवणाचें आमंत्रण देऊन गेले. त्यांच्याबरोबर यशवंतराव केळकर (यशवंत मोरेश्वर) होते. यामुळें मी नुस्तें "बरे" म्हटलें. तेवढें रावसाहेबांना पटलें नाही. तेव्हां त्यांनी अगदी हडसून खडसून बोलावणें केलें, व आमचा ब्राह्मण त्यांना पाणी आणतांना भेटला; तेंव्हा त्यालाही स्वयंपाक न करतां त्यांच्याच आचाऱ्याला मदत करण्यास येण्याचा हुकूम करून ते दोघे आपल्या बंगल्यावर गेले. ब्राह्मणासुद्धां ताकीद झाल्यामुळें कोणीं जावयाचें, कोणी घरीं राहावयाचें, याचा प्रश्नच उरला नाही. आम्ही गेलों. जेवणें झाल्यावर घरी जाण्यापूर्वी निरोप घेण्याकरितां मी त्यांच्याकडे गेलें असतां त्यांनी आपल्या मित्राच्या मुलीची गोष्ट काढली. मी म्हटलें, मीं त्या मुलीबद्दल मावशीच्याजवळ गोष्ट काढली कीं माझी चांगलीच पूजा उतरतील, आणि हरीभाऊंना घर वर्ज्य होईल. तेव्हां अशी स्थिति आणण्यापेक्षा कांही नच बोलावें तें बरें. यावर एक दोन वाक्यें आग्रहाचीं अशीं रावसाहेब बोललेच. त्यांनाही माझें म्हणणें पटल्यासारखेंच दिसलें. तें ही पुढं कांही एक न बोलतां त्यांनीही मला निरोप दिला.

नंतर घरी आल्यावर मी सर्व मंडळीस ही गोष्ट कळविली. ती ऐकून हरीभाऊंनाही समाधान वाटलें. यावेळी हरीभाऊ जरी सुधारक मताचे होते तरी ते रानडे, मोडक, पंडित वगैरे पुढाऱ्यांच्या मताचे नव्हते. एवढेंच नव्हे, तर त्यांच्याविरुद्ध मताचे होते. आम्ही दोघेंही त्या मताची असल्यामुळें आमची ते वारंवार थट्टा करीत. मतभेद कांही कांही गोष्टींत होता; कांही कांही मतें त्यांची आमचीं अगदी जुळतीं असत.

प्रो.ना.स.पानशांनी हरीभाऊंच्याकरितां मुली पाहण्याचा क्रम चालविलाच होता. पण त्यांचे दुसरें लग्न झालें तेव्हां मी पुण्यांत नव्हतें. तेव्हा त्या लग्नाची हकीगत मला बरोबर माहित नाही. पण एवढें ऐकिवांत आहे की, प्रो.पानसे व हरीभाऊ या दोघांनी मिळून मुलगी पसंत करून तें लग्न कुठल्या तरी बागेंत झाले. पुढें कित्येक दिवस हरीभाऊ या वहिनीशी वागावें तसें वागत नसत असे समजतें. याचें कारण जुन्या नव्या मतांचा विरोध, एवढेंच. त्यावेळच्या जुन्या नव्या मतांची अशी घरोघरच स्थिति होती.

जुन्या माणसांना घरचे नव्या मताचे पुरुष आपल्या बायकोशी एखादा शब्द बोलल्याचें समजलें म्हणजे अपमान वाटे; व नव्या पुरुषांना, त्यांत काय आहे? आपल्या आयुष्यांतला सोबती, त्याच्याशींच कां बोलावयाचें नाही? बाकीच्या सगळ्या माणसांशी बोलावयाचें आणि तेवढेंच काय वगळावयाचें? मग त्याच माणसानें काय केलें? असे वाटावयाचें. यामुळें घरांतल्या सासुरवासिनीला मृदंगाप्रमाणें दोहोंकडून थापट्या मिळावयाच्या. या अशा स्थितीमुळें, त्या परक्या मुलीला बिचारीला त्रास नको, असें समजून हे अगदींच उदासीन राहिले. वास्तविक असें करण्याचें त्यांना काही कारण नव्हते. पहिल्या रमाबहिनीला या नव्या जुन्याच्या झगड्यांत बराच त्रास झाला होता. तें चित्र त्यांच्या डोळ्यापुढें असल्यामुळेंच ते तसे वागत. पण पुढें सात आठ वर्षांनी जो मार्ग त्यांनी स्वीकारला तोच प्रथम स्वीकारला असता, तर लोकांना आक्षेप घेण्याला जागा राहिली नसती. कोणच्याही गोष्टीला वेळ यावी लागते. प्रत्येक माणसाच्या पूर्वार्जिताप्रमाणें त्यास अनुभव यावा लागतो; आणि मग त्याच विपरीत गोष्टी सुपरीत होऊं लागतात. या न्यायाला अनुसरूनच सर्व गोष्टी घडून आल्या. वेणूवहिनीला सास्वा, जावा, नणंदा, दीर इत्यादिकांशी वागणें कसें असतें, सासुरवासीण म्हणजे कोणत्या प्राण्यासारखी वागवावी लागते, मनधरणी म्हणजे काय, प्रसंग ओळखायचे ते कसे, इत्यादि सर्व गोष्टींचे धडे त्यांना त्या काळांत मिळवावयाचे होते; मनाला व शरीराला ताठरपणा आणावयाचा होता. यांसारखे सर्व प्रकारचे अनुभव त्यांस घेण्याला सांपडले, ते पतीच्या वरील उदासीन वागणुकीमुळेंच होय. तेव्हां हरीभाऊंनी जो मार्ग स्वीकारला होता तो वाईट तरी कां म्हणावा? जगाशी टक्कर देऊन वागणाराला सर्व तऱ्हेचे धडे मिळवावेच लागतात.

या अनुभवाबरोबर वेणूवहिनींच्या गुणांचाही विकास होऊन त्या हरीभाऊंना योग्य अर्धांगी आहेत हेंही ठरावयाचें असल्यामुळे त्यांचे धैर्य, त्यांचा दूरदर्शीपणा, त्यांच्या अंगचें शहाणपण, प्रकृतीचा काटकपणा वगैरे गुण निदर्शनास आले. वेणूवहिनी आपल्या अंगच्या चातुर्यामुळेंच आपली पूर्व स्थिति बदलून उच्च स्थानाप्रत त्या चढल्या. त्यांच्या जागी रमावहिनी असत्या तर ह्या गोष्टी त्यांना साधल्या नसत्या. त्या वेणूवहिनींच्या मानानें भाबड्या होत्या. वेणूवहिनी चतुर व शहाण्या असल्यांमुळेंच त्या 'आनंदाश्रमांत' आल्याबरोबर आनंदाश्रम हें त्याचें नांव अन्वर्थक झाले; हरीभाऊ सुखी होऊन त्या आश्रमाला शोभा आली. लोखंडाचे चणे खाल्ल्याशिवाय ब्रह्मपद प्राप्त होत नाही.

त्या वेळच्या सुधारक व पुराणमतवादी लोकांच्या येथे दोन मतांच्या झगड्यांत प्रत्येक घरीं गरीब बिचाऱ्या सासुरवासिनी मुलींचे किती हाल झाले ते सांगतां पुरवत नाही. माझ्या प्रियकर भगिनी वहिनीबाई रानडे यांनी आपल्या पुराणमतवादी वडील स्त्रियांचे जे चित्र काढलें आहे तेंच चित्र त्यावेळच्या जुन्या नव्या मतवाद्यांच्या घरचें आहे. त्यांत थोडा आणखी ज़ास्त गहिरा रंग असता तरी सुद्धां वावगें झालें नसतें. त्या चित्राहूनही जास्त दाट रंगांतली चित्रे कोठे कोठे काढतां येण्यासारखी होती. आणि 'बेचाळिसांचे प्रकरण' (पंचहौद मिशन प्रकरण) उपस्थित झाल्यावर तर कांही विचारायलाच नको. रावसाहेब रानडे कुटुंब चालविणारे धुरीण होते, तरी त्यांच्या पत्नीला इतका त्रास झाला; मग ज्यांच्या घरांत घर चालविणारे सासरे, सास्वा, चुलतसासरे, चुलत सास्वा, व चाहाड्या करण्याला दीर, नणंदा, जावा असतील त्या घरच्या सुधारणाप्रिय नवऱ्याच्या बायकोला किती त्रास व कष्ट आणि मनाचा जाच सोसावा लागला असेल. त्याची कल्पनाच करावी. या गोष्टीला अपवाद असें कांही हरीभाऊंचे घर नव्हतें. रमावहिनींच्या मनाला त्रास झाला तर ती आपल्या माहेरीं जाऊन तरी मन मोकळें करी. पण बिचाऱ्या वेणूवहिनीला तसें मायेचें मावशीशिवाय दुसरें कोणी नव्हतें. या ठिकाणीं हे सांगणें अवश्य आहे की, चहाप्रकरणाचा ऐन वणवा वेणूवहिनीच्या जाणतेपणापर्यंत प्रखर राहिला नव्हता, व बाकीचा सुधारकी अग्नि मंद मंद असल्यामुळें त्याचा प्रखर तापही पण नव्हता. तरी हरीभाऊंचे विलायतेहून जाऊन आलेले, पुनर्विवाह केलेले, जातिबंधन न मानणारे, असे स्नेहीसोबती हे घरी

येतच असत. पण वेणूवहिनींचे त्यांच्या घरी जाणे येणे नसल्यामुळें त्या त्यापासून दूर होत्या, व सुधारकीं शिंतोडे त्यांचया अंगावर फारसे उडालेही नाहींत. तो घाण जलवृष्टिसेक एकट्या हरिभाऊंच्याच अंगावर होत असे. परंतु पुरुषांना घरांत फार वेळ काढावा लागत नाही, व ज्या त्या गोष्टीवरून त्याचे पुनरुच्चारण होत नाही. गोष्ट निघालीच तर त्याचा एकदां स्फोट व्हावयाचा, नाहीं तर आंतल्या आंतच तो धुमसत राहावयाचा.

अशा कांही गोष्टी होऊ लागल्या म्हणजे बायकांना सदोदित आघात सोसावे लागतात, व त्यापासून अति मनस्ताप होतो. परमेश्वराची एक मोठी कृपा आहे म्हणावयाची की, बायकांच्या मेंदूची रचना त्यानें असे आघात सोसण्यायोग्य केली आहे.

**विद्याभ्यास पुरा झाला.**

हरिभाऊ दोन तीन वेळां प्रीव्हियसमध्यें नापास झाल्यावर अण्णासाहेबांनी त्यांना मुंबईस नेलें व तेथें जगदीश्वर प्रेसमध्ये छापखान्याचें काम शिकण्यास ठेवलें.

त्या कामाची साधारण दोन तीन महिने माहिती मिळविल्यावर त्यांची साधारण अशी चाचणी पाहण्याकरितां एक परीक्षा झाली. त्याही परीक्षेंत त्यांना तंतोतंत मार्क मिळाले नाहीत! यानंतर मला त्यांनी एक पत्र पाठविले होतें. त्यांत प्रथमच पत्राला आरंभ करतांना लिहिले होतें की, हरी नारायण आपटे व परीक्षा यांचे अत्यंत वांकडे आहे. पुढें किती मार्कांनी आपण नापास झालों तें लिहिलें. जगदीश्वर प्रेसमध्ये जवळ जवळ एक वर्ष काम शिकल्यावर ते 'आनंदाश्रमां'त छापखान्याची देखरेख व जुने हस्तलिखित संस्कृत ग्रंथ मिळवून छापण्याचे काम करूं लागले. यावेळी आनंदाश्रमाची अर्धी इमारत तयार झाली होती. व बाकीचें काम चालू होते.

जगदीश्वर प्रेसमधून शिकून बाहेर पडल्यावर अण्णासाहेबांनी हरीभाऊंस एक पब्लिशिंग कंपनी काढण्यास सांगितले. त्यांस लागणारे भांडवल ते पुरवणार होते. पण हरीभाऊंनी 'माझ्यानें तें काम होणार नाही व त्यांत नड येईल' असे स्पष्ट सांगून मोकळे झाले. पुढे 'करमणूक' काढली. तेव्हा अण्णासाहेबांनी त्यांस एक पत्र पाठवून खडखडीत सांगितले की, तूं जर माझी कोणतीच गोष्ट ऐकत नाहीस तर तुला मजकडून एक कपर्दिक सुद्धा मिळणार नाही. या पत्रांचे उत्तर हरीभाऊंनीही तसेच लिहिलें व अण्णासाहेबांस कळविलें कीं, 'मी तुमच्या पैशाची केव्हांच आशा केली नाही. तुमचा स्वकष्टार्जित पैसा आहे, तुम्ही त्याचे मालक आहांत. त्यावर माझा डोळा, स्वप्नांत सुद्धां नव्हता व आतांही नाहीं.'

याच्या अगोदरच त्यांनी "करमणूक" पत्र व "कुळकर्णी आणि मंडळी" या नांवाची एक पब्लिशिंग कंपनी काढली होती, व तिचेच एक दुकान काढलें होते. या तीनही उद्योगांत त्यांना किफायत न होतां ते उद्योग उलट अंगावरच आले. करमणूक तर शेवटपर्यंत आंतबट्ट्यांतच चालली होती. परंतु त्यांनी या संबंधानें कधीही काळजी व्यक्त केली नाही, किंवा आपणास या धंद्यांत बूड आली तर दुसरा चालवूं म्हणून वल्गना केली नाही, किंवा निवळ पैसे मिळविण्याकरितां निरनिराळे मार्ग अवलंबिले नाहीत. बक्षिसासाठींही आपली पुस्तकें कोणत्याही संस्थेकडे दिली नाहींत. त्यांचा चहाता सामान्य वर्गच होता.

कांदबरीकाराचें चरित्र लिहिणें हें अत्यंत कठिण काम आहे असे म्हणून तें मजसारख्या सामान्य माणसानें सोडून द्यावें. कारण कादंबरीकार निरनिराळ्या भूमिका घेऊन निरनिराळ्या पात्रांच्या रूपानें जगापुढें आलेला असतो. नट जो असतो त्याला फक्त बाह्य सृष्टींशींच ऐक्य करावें लागते. पण कादंबरीकार किंवा नाटककार यांना ती भूमिका आपण स्वत: बनून लोकांपुढें त्या भूमिकेची चित्रं बनवून ठेवावी लागतात. त्याशिवाय त्यांच्या हातून चांगली कृति निर्माण व्हावयाचीच नाही, व लोकरंजनही व्हावयाचे नाही. प्रत्येक भूमिकेशीं जेव्हा आपले तादात्म्य होतें तेव्हांच तें वाचकाच्या हृदयाचा परिचय व आत्मीयभाव उत्पन्न करिते. असा आत्मीय प्रत्यय आल्यानंतरच ती कृति वाचकांना स्वानुभवप्रत्यय पटविते व वाचकवर्ग तल्लीन करून सोडते.

सृष्टिदेवीनें जे जे विकार, जी जी वस्तु निर्माण केली आहे, तिचें हुबेहुब प्रतिबिंब वठले तरच त्या कृतीपासून लोकांना आनंद होतो. कादंबरीतील एखाद दुष्ट पात्राची भूमिका वाचीत असतां आपल्याला त्वेष आला, सच्छील माणसाला दुःख झालेले वाचून आपल्या मनाला दुःख झालें, वगैरे विकार आत्मसाक्ष झाल्याविना होत नाहींत. आणि अशा तऱ्हेची आत्मसाक्ष पटविणारी पात्रें हरिभाऊंच्या कादंबऱ्यांत असंख्य आहेत. यावरून त्या त्या भूमिकांची चित्रें रंगवितांना ते स्वतःच जेव्हां तें चित्र बनत तेव्हांच तें कागदावर वठलें जाई. तेव्हांच त्यांची वाङ्मयात्मक शेंकडों चरित्रें त्यांनी आपल्या हातांनींच निर्माण करून ठेवली आहेत. ज्याप्रमाणें एखाद्या साधुपुरुषाला म्हणतात की तो आत्मज्ञानी आहे, त्याचप्रमाणें कादंबरीकार हाही आत्मज्ञानी असतो. त्याला दुसऱ्याचें हृद्रत जाणण्याची शक्ती असते. म्हणून त्याच्या हातून सृष्टिनिर्मित मूर्तींप्रमाणें या काल्पनिक मूर्ति तयार केल्या जातात.

तथापि व्यवहारांत त्यांचे चालणें, बोलणें, वागणें, त्यांची मतें, वगैरे निराळी असतात. ती कशीं असतात, त्यांचा दिनक्रम कसा असतो, वगैरे लौकिक व्यवहार हा त्यांच्या कादंबरीविषयाहून अगदीं निराळाच असतो. तोच जाणण्याची लोकांना जिज्ञासा असतें.

हरिभाऊंना अगोदर लेख लिहून ठेवण्यास कधीच वेळ होत नसे. आणखी चार तासांनी छापखान्याचा माणूस 'मॅटर' मागावयाला येईल असें वाटले म्हणजे ते आपला लेख लिहूं लागत. त्यांना रात्रीची झोप फार थोडी असे. यामुळें त्यांच्या कादंबऱ्या किंवा इतर लेख ते रात्रींच सारी रात्र जागून लिहीत. पुणेवैभवांत त्यांची "मधली स्थिति" छापत असे, तेव्हां ते आमच्या येथें आम्ही नगर जिल्ह्यांत असतांना एक महिना दीड महिना आले होते, त्यावेळी मी हें पाहिलें होते. ते रात्री १०-११ वाजतां लिहावयास बसले म्हणजे पहाटेस ४ ला आपलें लिहिणें संपवून लेख टपालातं टाकीत, व नंतर थोडीशी झोंप घेत.

त्यांच्या कादंबऱ्यांत हा एक विशेष गुण आहे की, त्यांचे व्यावहारिक निरीक्षण फार सूक्ष्म असतें. पात्रांची भाषा, मुलांचे खेळ, मुलींची लहानपणची एकमेकींबरोबरील बोलणी., सासूबाईचे तोंऱ्यांतील वाक्प्रहार, अगदी जसे आपण चालत्या बोलत्या माणसांचे पाहतों तसेच ते त्यांत वठलेले आहेत. आणि अशा या मार्मिकपणामुळेंच त्यांना उत्तम कादंबऱ्या लिहितां आल्या. मराठी भाषेवर तर त्यांचे चांगलेंच प्रभुत्व होतें. त्यांनी मोलियरच्या कांही नाटकांची भाषांतरें केलीं आहेत, ती वाचीत असतां ती नाटकें मूळचींच मराठींत रचिलेली आहेत, किंवा अन्य देशांतली असून त्यांना मराठी पेहराव चढविला आहे, हें बिलकूल कळत नाही. 'मारून मुटकून वैद्य-बोवा', 'चाणाक्षपणाचा कळस', 'श्रुतकीर्ति', वगैरे त्यांची रूपांतरित नाटकें या माझ्या म्हणण्याची साक्ष पटवितील. त्यांच्या कादंबऱ्या व त्यांतील पात्रें कशीं होती, कादंबरीकार या नात्यानें त्यांचा दर्जा केवढा होता, पश्चिमेकडील कादंबरीकारांच्या पंक्तींत त्यांचे स्थान कोठें शोभतें, वगैरेचा विचार मजपेक्षा रा.वाग्भट नारायण देशपांडें यांनीं चांगला आणि मार्मिक रीतीनें केलेला आहे[१]. तेव्हां त्यासंबंधानें मी जास्त लिहूं इच्छित नाही. परंतु या ठिकाणी एवढें तरी माझ्याने लिहिल्याशिवाय राहवत नाही, कीं हरीभाऊंना परमेश्वरानें विशेष बुद्धिसामर्थ्य दिले होते तें त्यांनी सरस्वतीचीच सतत आराधना करावी म्हणून दिलें होते. आणि त्याच्या इच्छेप्रमाणें जर हरीभाऊ वागते तर त्यांच्या हातून वाङ्मयभांडारांत केवढी मोठी भर पडली असती, याची सुज्ञांस कल्पना होईल. 'सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज' या श्रीभगवदुक्तीप्रमाणें सरस्वती त्यांना उपदेश करीत होती. पण हरिभाऊंनी तिची भक्ति एकनिष्ठ अव्यभिचारी केली नाही. त्यामुळें महाराष्ट्रवाङ्मयभांडारांत संचय कमी झाला. त्यांनी आपल्या या भक्तीचा थोडा वाटा म्युनिसिपालिटीला, थोडा लोकहिताच्या कामाला, थोडा 'आनंदाश्रमा'ला देऊन त्या भक्तीचीं खंडे खंडे पाडली. या संबंधानें त्यांचे माझे बरेच खटके उडत.

हरीभाऊ पुणें म्युनिसिपालिटीचे प्रेसिडेंट झाल्यानंतर दोन तीन दिवसांनी मी त्यांच्या घरी गेलें असता काकू तेथे होत्या. त्या मोठ्या आनंदाने मला विचारूं लागल्या की, "बंधुराज कोण झाले तें कळलें का?"

हा त्यांचा प्रश्न होतो न होतो तों हरीभाऊ माडीवरून आंत आले व एकदम काकूला म्हणाले, ''अग! अग! त्यांना कांही सांगू नकोस. त्यांना ह्या गोष्टी आवडत नाहीत.'' यावर मी त्यांना म्हटलें : 'खरोखरीच असले मान तुम्हांला मिळून तुम्ही भविष्य व वर्तमान वाङ्मयभक्तांचे फार नुकसान करीत आहां. ह्या अशा कामाला देवानें शेंकडो माणसें निर्माण केली आहेत; अशी कामें ही कांही चिरस्मरणीय कामें नव्हत; ती करण्याकरिता शेंकडोंनी मोजण्यासारखी माणसें आढळतील; पण तुमचें काम करणारा मात्र हजारांत एकही नव्हे, दहा हजारांत एक सांपडावयाचा नाही. तुम्ही म्हणजे सरस्वतीचें नवसासायासांनी झालेलं एकुलतें एक अपत्य आहां, तें जणूं काय आपल्या मातेची सेवा करण्याचें टाकून दासीची सेवा करूं लागावें, तसें करतां. प्रेमळ आई आपल्याच लेंकराकडून आपली सेवा होईल. अशी आशा करीत असतां तें लेकरूं ज्याप्रमाणें दासीने गोड खाऊ हातावर ठेवून आपलेंसे करून घ्यावे व तें मग तिच्याच अनुरोधानें चालू लागावें, त्याप्रमाणें हे झालें आहे. पण तो खाऊ देण्यांत तिचा मतलब असतो; आईच्या कृपेत मतलबाचा गंधही नसतो. या सार्वजनिक कामांत तात्पुरती वाहवा बडेजाव होतो व त्याच खाऊला भुलून लोक तिच्याकडे वळतात. पण तुमच्या सरस्वती मातेने असल्या खाऊपेक्षा केवढी मोठी देणगी तुम्हांस दिली आहे? जोंपर्यंत जग कायम आहे, जोंपर्यंत मराठी भाषा अस्तित्वांत आहे, तोंपर्यंत त्या भाषेच्या ग्रंथसंग्रहांत तुम्हांला तिने अढळ पदप्राप्ति करून दिली आहे. तेव्हां तुम्ही तिचेच नि:सीम भक्त व्हावें हेंच उचित; आणि तुम्ही तिचे नवानवसांचे एकुलतें एक अपत्य आहां, तेंव्हां तिला आनंदित ठेवणें हा तुमचा पुत्रधर्म आहे.' या माझ्या बोलण्यावर ते काहींच बोलले नाहींत. पण हळूच एवढें म्हणाले की, ''हा तुमचा निव्वळ भ्रम आहे.''

हरीभाऊ सार्वजनिक कामांत प्रथम पडले ते पुण्यास १८९९ सालीं जेव्हा प्लेगाची तिसरी वारी आली तेव्हां प्लेग व्हालंटिअर म्हणून ते काम करूं लागले. तोच त्यांच्या सार्वजनिक कामाचा ओनामा होय. त्यावेळीं त्यांनी अतिशय मेहनत घेऊन प्लेग झालेल्या लोकांना मदत केली. प्रत्येक घरी जाऊन रोग्याची तपासणी करणें, त्याला औषध पाणी देणे, त्याच्या घरच्या मंडळींना धीर देऊन अडचणलेल्यास साहाय्य करणें, हीं कामें त्यांनी झीज सोसून आणि मन:पूर्वक करून त्याबद्दल लोकांकडून व सरकारकडून नांव मिळविलें. ना गोपाळ कृष्ण गोखले यांचा व हरीभाऊंचा परिचय होता तो दृढ झाला, तो या सार्वजनिक कामांतच झाला. पहिल्यांच खेपेस गोपाळराव विलायतेस गेले त्यापूर्वी ते कांही माहिती गोळा करण्याकरितां सोलापुरास कै.ग.व्यं. जोशी यांच्याकडे येऊन राहिले होते. हरीभाऊही सोलापुरास त्याच वेळी आले होते. त्यांचा हेतु हा की, ना.गोखले यांची वारंवार भेट होत जावी; आणि ती तशी भेट होतही होती. नित्य संध्याकाळी कोर्टातून आल्यावर आम्ही दोघें व हरीभाऊ अशी फिरावयास जात असूं व तेथेंच रा.ब.जोशी, गोपाळराव व सोलापूरचे एक वकील कै.नारायण गोविंद, अशा मंडळींची गांठ पडे. नंतर अनेक विषयांवर चर्चा करीत आम्ही सर्व रात्री ८ च्या सुमाराला घरी येत असूं. रात्रींही आम्ही एखादवेळ गोष्टी बोलत बसलों म्हणजे उजाडेपर्यंत आमच्या गोष्टी चालत. आणि त्या गोष्टी म्हणजे, आपली महाराष्ट्रग्रंथसंपत्ति कशी वाढेल, कोणच्या विषयावरील पुस्तके जास्त जरूरीचीं आहेत, कोणचीं कमी आहेत, इ. कै. रेंदाळकरांनीं आपल्या लेखांत [२] ज्या ज्या पुस्तकांबद्दल व भाषांतरांबद्दल उल्लेख केला आहे त्या संबंधी त्यांची कल्पना फार जुनी होती. आणि हरीभाऊ जर सार्वजनिक कामांत पडले नसते; तर त्या त्यांच्या सर्व जरी नाही तरी बऱ्याच कल्पनांना मूर्त स्वरूप आलें असतें. त्यांच्या माझ्या भेटींत किंवा आमच्या पत्रव्यवहारांत ह्याच विषयावर आमचें बोलणें होई; आणि ते मला खात्री देत की, अमुक एक कार्य शेवटास गेलें की मी खास आपला लिहिण्याचा व्यासंग सुरू करतों. ती तारीख निघून गेल्यावर मी त्यांना आठवण दिली की, त्यांच्याकडून एखादी बिनतोड सबब पुढें येई व हें झालें की मी पहा आतां अमुक पुस्तक हाती घेतोंच, असें ते



अनुक्रमणिका

म्हणत. केव्हां त्या लेखाला आरंभ केला असला तर मोठ्या आवडीनें तो वाचून दाखवीत, पण इकडे पेन्शन घेऊन पुण्यांत आल्यापासून त्यांची माझी गाठ वरचेवर पडनाशी झाली. केव्हा तरी सकाळी ते माझेकडे येत, त्यावेळी मी कामांत असें. केंव्हा तरी संध्याकाळी मी त्यांच्याकडे जाई तेव्हां ते मंडळीत असलेले असत. त्यामुळें त्यांच्या आमच्या वाङ्मयासंबंधाच्या गोष्टी फारच क्वचित् होत. तसेंच त्यांचा दर्जा आतां पुष्कळच वाढला होता, आणि मी ज्या बिंदूवर होतें त्यावरच स्थित होतें. तेव्हां त्यांच्या माझ्या आवडत्या विषयावर बोलण्याच्या वेळाचेंही स्थित्यंतर झालें.

'मी' या कादंबरीच्या उगमाचें स्थानही आमच्या रात्रीच्या रात्री बसून त्रिवर्गानी गप्पा मारतांना निर्माण झाले.

आपल्या देशांत अनेक तऱ्हेच्या सुधारणा झाल्या पाहिजेत; त्या घडवून आणण्यासाठी स्वार्थत्याग केला पाहिजे; त्याच्यासाठी ठिकठिकाणी मठस्थापना करून, शिष्यशाखा निर्माण करून, ती कामें त्यांच्या करवी घडवून आणली पाहिजेत; अशा आमच्या नेहेमी गोष्टी चालत, व त्याचेच फल "भावानंद" हें पात्र होय. त्याचप्रमाणें आणखी किती तरी कादंबऱ्यांची मूळ कल्पना त्या गोष्टीत निघाली आहे. ऐतिहासिक कादंबऱ्यासंबंधानेही असाच प्रकार आहे. आम्ही सर्व मिळून वेरूळची लेणी, औरंगाबाद, रोंझें, दौलताबादचा किल्ला पाहावयास गेलों होंतो. त्या ठिकाणी त्या त्या स्थलांच्या पूर्ववैभवाच्या व आतांच्या अवनत दशेच्या गोष्टी निघाल्या असतां ऐतिहासिक कादंबऱ्या हरीभाऊंनी आपल्या डोक्यांत आखल्या व त्याचेंच पुढें कागदार चित्र काढून त्यांनी जगापुढें ठेविलें. "वज्राघात" ही कादंबरी औरंगाबाद, विजापूर पाहिल्याची साक्ष देत आहे.

अशा एक कीं दोन पुष्कळ गोष्टी आहेत की ज्यांची आठवण केली असतां माझे हृदय भरून येतें व लेखणी अडखळते. या सर्व गोष्टी आठवल्या म्हणजे मला त्या एका क्षणापूर्वी होऊन गेल्यासारख्या वाटत आहेत. पण आजचा मी आपला विचार करूं लागलें की मला त्या सर्व रात्रीं पडलेल्या स्वप्नासारख्या वाटत आहेत. ती आनंदाची घडी कोणीकडे आणि आजचा हा प्रसंग कोणीकडे! परमेश्वराची इच्छा!!

रा. वाग्भटपंत देशपांडे व कै.रेंदाळकर या दोघांनींही त्यांच्या पुस्तकांसंबंधाने सविस्तर लिहून आपला आदर व्यक्त केला आहेच. त्यापेक्षा मला जास्त चांगले लिहितां येणार नाही. व सार्वजनिक कामासंबंधी माहिती मजपेक्षां रा.बापुराव अंबेकर यांना जास्त आहे व त्यांनी ती आपल्या लेखात दिली आहेच.[३] त्याचप्रमाणें कै. रेंदाळकर यांनीही पुष्कळ उणीव भरून काढली आहे.

### हरीभाऊंचा स्नेहसंबंध

रा.हरीभाऊंचा मित्रवर्ग फार मोठा होता. त्यांनी ज्याला एकदां आपला मित्र म्हटलें त्याच्याशी त्यांचे कधीही वितुष्ट आले नाही. त्या मित्राच्या दोषांचे दुसऱ्यांनी किती जरी आविष्करण केलें तरी ते त्याकडे दुर्लक्ष करीत. केंव्हा केव्हां ते बोलूनही दाखवीत की एकदां ज्याला आपला मित्र म्हटलें, त्याच्या दोषांकडे पाहणे म्हणजे सुजनता नव्हे. दोष हे प्रत्येकांत भरपूर भरलेले आहेतच. पण आपण त्यांच्यांत जे चांगले गुण असतील त्यांकडे पाहावे. ज्याला आपण एकदां आपला मित्र म्हटलें त्याच्याशी आपण होऊन विरुद्ध जाऊं नये.

त्यांच्या मित्रांपैकी अत्यंत जिवलग असे कांही मित्र होते. त्यांपैकी कै. माधवराव दिनकर जोशी हे एक होते. त्यांना प्लेग झाला असतां हरीभाऊंनी त्यांच्यासाठी फार परिश्रम केले. त्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या (जोशांच्या) पत्नीला व मुलांना त्यांनी धीर देऊन त्यांचा ते सतत परामर्ष घेत होते. एवढेंच नव्हे तर पहिल्या दुःखाच्या ऐन प्रसंगी पार्वतीबाई जवळ दोन समाधानाच्या गोष्टी बोलण्याला किंवा दोन घास खा म्हणून म्हणण्यालाही त्या प्लेगच्या प्रसंगी कोणी नव्हतें. तशा दिवसांत कोणी कोणाकडे जात नसे. जवळची आप्तसोयरीं सुद्धा दूर पळत असत; आणि पार्वतीबाईंना तर तसे जवळचें कोणी पुण्यांत नव्हतेंच. पण हरीभाऊंनी त्यांच्याशी समाधानाच्या गोष्टी बोलून,

आपल्या घरून अन्न आणवून, आपल्या हातांनी त्यांना वाढून, त्यांचे जेवण होईपर्यंत ते त्यांच्या जवळ बसत; व अशा रीतीने त्यांचे संकटाचे दिवस त्यांनी हलके केले.

त्यांनी पार्वतीबाईला आपली बहीण म्हटली होती. आणि ते त्यांच्याशी पाठच्या प्रेमळ भावाप्रमाणेंच वागले. येथें हे एकच उदाहरण दिलें आहे, पण त्यांच्या हातून अशी शेंकडो कृत्यें घडली आहेत. त्यांचा दुसरा एक स्नेही होता. तो काही तरी व्यसनांत गुरफटला होता. त्यानें तें व्यसन टाकून द्यावें म्हणून हरीभाऊंनी बरीच खटपट केली. व्यसनापायी पैसा खर्च होऊ लागल्यामुळे त्याच्या घरप्रपंचाची पराकाष्ठेची ओढ होत असे. हरीभाऊ त्याला कधी मदत करीत, पण ती त्याला न कळत करीत. शिवाय ते गरीब विद्यार्थ्यांनाही मदत करीत. प्लेगच्या दिवसांत अशी मदत पुष्कळांना झाली आणि हेच सार्वजनिक कामांत पडण्याचें आमिष झालें. त्यांच्या मनानें असे घेतलें की, सार्वजनिक कामांतही चांगल्या निरपेक्षबुद्धि माणसाची फार जरूर आहे. तेव्हां आपल्या सारख्यांनी असली कामें अंगाबाहेर टाकणें म्हणजे कामाला आपली नालायकी व्यक्त करणें होय.

अशा समजुतीनेंच ते सार्वजनिक कामांत अधिकाधिक आपणास गुंतवून घेऊ लागले. जों जो ते त्या कामांत आपणास गुंतवू लागले तों तों तीं कामेही त्यांना आपल्यांत गुरफटून टाकूं लागली, आणि अशामुळें ग्रंथलेखनाचें काम मागेंमागेंच पडत गेले.

सार्वजनिक कामांत तात्पुरता मानमरातब, मोठेपणा वगैरे जे लाभ व्हावयाचे ते त्यांना झाले. पण त्या लाभाबरोबर त्यांच्या अजरामर होणाऱ्या कीर्तीची हानि झाली, व वरच्या कोटींतील वर्तुळांत त्यांची प्रतिष्ठा व्हावयाची ती बेताबाताची होऊन खालच्या दर्जाच्या मंडळीचा त्यांचेभोवती गराडा पडला. आणि त्या मानानेंच हरीभाऊंच्या लौकिकी गुणाची वाहवा होऊ लागली. थोडीशी स्तुतिप्रियताही त्यांच्यांत आली. उघडच आहे, जे येणार तो त्यांची तोंडावरच स्तुति करू लागणार. अशामुळें त्यांच्या तें आंगवळणी पडून ती ऐकतां ऐकतां त्यांना आवडूं लागली, यांत नवल काय? संवयीनें कोणची गोष्ट आंगवळणीं पडणार नाही?

दुसरें, निसर्गाच्या नियमांप्रमाणें सर्व वस्तू प्रगमनशील आहेत, त्याला मानवी स्वभावच तेवढा अपवाद कसा राहील? त्यालाही प्रगमनशीलत्वाचा नियम लागू आहे. या दृष्टीनें पाहूं गेलें असतां मनुष्याला एका कामांत जय मिळाला म्हणजे दुसरें अंगावर घेण्याची आवड उत्पन्न होतेच. थोडेसें आपलें नाव एखाद्या कामांत झालें की दुसरे मोठें कृत्य करून नांव मिळविण्याची महत्त्वाकांक्षा उदित होते. या सृष्टिनियमाला अनुसरूनच हरीभाऊंनी प्रथम चांगले प्लेगव्हालंटिअर म्हणून कीर्ति संपादन केली, तो म्युनिसिपालिटींत प्रथम साधे मेंबर म्हणून वाहवा मिळवावी व आपल्या लोकांच्या उपयोगी पडावें असें त्यांस वाटलें. नंतर त्या कामांत यश आल्यासारखें दिसल्यावर लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचे मेंबर होऊन जनतेची तेथे कामगिरी बजवावी असें त्यांस वाटू लागलें. परंतु तो नाद सोडून दिला. या सर्व खटपटींत त्यांच्या वेळाचा व कांही अंशी पैशाचाही अपव्यय झाला; व जे सुवर्णकण वेंचावे ते सर्व खिशांतून गळून पडावे त्याप्रमाणें त्यांनी गोळा केलेले बौद्धिक धनाचे कण गळून पडले. ते कण पाऱ्यासारखे आहेत. पारा जमिनीवर पडलेला जसा गोळा करतां येत नाहीं. त्याप्रमाणें हे सुवर्णरज एकदां नाश पावले कीं त्यांची प्राप्ति पुन: होत नाही.

**अपत्य प्रेम**

हरीभाऊंना एक फार दिवसांनी कन्या झाली होती. ती जन्मापासून सदाची अजारीअजारीच असे. परंतु मुलगी बुद्धिवान् मोठी असल्यामुळें तिच्याबद्दल हरीभाऊंना मोठी आशा वाटत होती की, हिला उच्च शिक्षण देऊन तयार केली तर आपली 'करमणूक' व 'आनंदाश्रम' अशा दोन्ही संस्था ती चालवील. परंतु त्या त्यांच्या आशावृक्षाला गोड फळें येऊन ती चाखण्याचें त्यांच्या नशिबीं नव्हतें. ती मुलगी आठ वर्षांपर्यंत त्यांच्या मनाला आनंदांत तर केव्हां काळजींत ठेवी, व शेवटी आईला आणि बापाला दोघांनाही



अनुक्रमणिका

दु:खात लोटून परलोकी गेली! तिच्या मृत्यूमुळे हरीभाऊ व वेणू वहिनी या उभयतांसही पराकाष्ठेचें दु:ख झाले. त्यांनी त्या मुलीच्या आवडीचे सर्व पदार्थ वर्ज्य केले, व त्यांचे सेवन अखेरपर्यंत त्यांनी केले नाही. जोपर्यंत हरीभाऊंना स्वत:चे मूल नव्हते तोपर्यंत ते कोणाचे तरी मूल आपलेबरोबर घरी घेऊन येत. त्यांच्या भावाची मुलें, चुलत भावाची मुलें वगैरे तर नेहमी ते आपल्याकडे राहण्यास आणीत.

पहिल्या रमावहिनी असतांना त्यांनी आपल्या स्नेह्याची एक मुलगी आपलीशी म्हटली होती. पण ती त्यांच्याकडे आपले घर सोडून कधीच राहण्यास गेली नाही. पण तिच्यावर हरीभाऊंचे प्रेम होते, व अखेरपर्यंत ते तिला आपली मुलगी समजूनच तिच्या मुलाबाळांचे वगैरे कौतुक करीत. लिहिण्यास दु:ख वाटतें कीं, ती मुलगीही त्यांच्या मागोमाग दोन तीन महिन्यांच्या आंतच आपली लहान चिलीपिली सोडून परलोकी गेली !!

हरीभाऊंना मुक्या प्राण्यांचेही फार वेड होते. त्यांची बाळगलेली कुत्री, मांजरें वगैरेंचा त्यांच्याभोवती जमाव जमत असे. या सर्व प्राण्यांच्या पेक्षा गाढवाची दया त्यांना फार येत असे. जिवापाड श्रम करून बिचाऱ्याच्या पोटापाण्याची किंवा निवाऱ्याच्या जागेचीही कोणी काळजी घेत नाही. एवढें अश्राप जनावर असून बिचाऱ्याचा शब्द कानीं पडला तर अशुभ समजला जातो. त्यांच्या मधून जाण्यांने पुण्यांशक्षय होतो असे मानण्यांत येतें. या सर्व गोष्टी त्यांना फार तिरस्करणीय वाटत. भूतदयेचा त्यांत लवलेश नाही अशांपैकी त्या आहेत, असें ते म्हणत. काही अंशीं त्यांत सत्यही आहे.

**हरीभाऊंची धर्ममतें**

हरीभाऊ धर्मासंबंधांने बोलतांना अगदी नास्तिकासारखे प्रतिपादन करीत. पण त्यांचे आचरण अगदी पुराणमतवाद्याप्रमाणें असे. सत्यनारायणाच्या पूजा, देवाचे उत्सव, घरांतील हव्यकव्यें वगैरे सर्व कुलाचार ते यथासांग व यथाविधि करीत असत. त्यांच्या घरांतील माणसांनी कोणी विशेष अडचणीच्या प्रसंगी कोणा एकाद्या देवतेला नवस जसा फेडावयाचा असेल तसा रीतसर ते फेडीत. शांता (त्यांची मुलगी) ही एकदां फार आजारी असतां तिच्या आईनें बऱ्याचशा सत्यनारायण पूजा करण्याचा नवस केला होता. त्या सर्व पूजां दर पौर्णिमेला कराव्या लागत. त्या सर्व पूजा त्यांनी यथासांग केल्या. आनंदाश्रमांतील नैमित्तिके, कै. नानासाहेबांनी सांगितल्याप्रमाणे सोमवारचे उपोषण वगैरे सर्व करीत. शिवरात्रींचे जागरण पारणेंही करीत. या सर्व गोष्टी पाहात असतां मनांत असे येई कीं, जे हरीभाऊ परमेश्वराच्या अस्तित्वाबद्दलच संशय व्यक्त करतात तेच हे हरीभाऊ काय? कां ते बोलणारे हरीभाऊ वगेळे व कृति करणारे हरीभाऊ वगेळे?

एकाद्या देवळांत त्यांच्याबरोबर जाण्याच्या जर प्रसंग आला आणि त्यांनी देवाला नमस्कार करतानां आपण पाहिलें, आणि त्यांना जर विचारिलें की ज्याच्या अस्तित्वाचीच तुम्हांला शंका आहे त्याला नमस्कार कशाला करता? त्यावर ते अशासारखे उत्तर देत की : 'अहो, असूंद्या एकादा नमस्कार केलेला. यदाकदाचित् देव असला आणि आमच्या नास्तिकपणाबद्दल तो शिक्षा करू लागला तर त्याला आठवण देण्याला बरें पडेल. मी अमुक अमुक देवळांत नव्हता तुला नमस्कार केला, असें त्याला विचारता येईल. म्हणून असूंद्या एकादा नमस्कार केलेला.' या अशा त्यांच्या वागण्यामुळें ते खरोखर कोणच्या मताचे होते, त्यांची धर्म मतें काय होतीं, याचा ठाव लागत नसे. ज्यांना जग साधु म्हणून त्यांच्या भजनी लागतात त्या साधूंची ते थट्टा करीत. देवळारावळांतील देवांची ते थट्टा करीत नसत, पण त्यांच्या भक्तांची थट्टा करीत. थिऑसोफीची, ख्रिश्चानिटीची, एकेश्वरी पंथाची व वारकरी पंथाची ते थट्टा करीत. पण श्रीज्ञानेश्वर, तुकाराम यांचे ते भक्त होते व त्यांच्या ग्रंथांचे भोक्ते होते. या सर्वांवरून त्यांची खरी धर्ममतें कळत नसत. ते वेदांती पण होते. आपण वेदांतावर बोलू लागलों तर ते त्यांचे खंडण करून चार्वाकमतांतील वाक्ये पुढे आणीत. मग हे सर्व दुसऱ्याच्या बोलण्याला उत्तरपक्ष असावा म्हणून बोलत की काय, असां संशय येई.



अनुक्रमणिका

स्नेहासंबंधी असें त्यांचे मत ठरलेलें होतें की, एकदा जो आपला स्नेही झाला त्याचे वाईट गुणांकडे पाहावयाचें नाही. फक्त त्याचे घेण्यासारखे चांगले गुण असतील त्यांचीच आपण प्रशंसा करावी. त्याचप्रमाणें आपल्या घरातील बायकांच्या मताला मान देऊन त्यांच्या म्हणण्याप्रमाणें वागण्यांत काय नुकसान आहे? आपली धर्ममतें आपल्यांजवळ ठेवून त्यांच्या म्हणण्याप्रमाणें वागलें असतां घरांत शांति राहील.

आमच्या हिंदुगृहस्थितींत बायकांना मत नाही. चांगले कोणचें, वाईट कोणचें, हें ठरविण्याला त्यांना संधि नाही; व पूर्वकालीन स्त्रियांना तितकें ज्ञानही नव्हतें. तेव्हा पुरुषांच्या आवडी नावडी, त्यांची मते, त्यांच्या मर्जीचे कल वगैरेंच प्राबल्य असावयाचे. ते इतके की, बायकांनी बाहेर जातांना पायांत जोडा घालावा की नाही, कुंकू बारीक लावावे की मोठे, लुगड्याला कांठ बारीक असावेत कां मोठे, पुराण ऐकावेंसे वाटले तर कोणच्या देवळांत किंवा कोणाच्या घरी ऐकावें, किंवा मुळींच ऐकूं नये, यासारखा आवडी नावडीचा प्रकार फक्त एकाच व्यक्तीकडे असतो. तेव्हा तसें मत हरीभाऊंना मान्य नव्हतें, म्हणूनच त्यांनी वरील प्रकारचे वर्तन स्वीकारले असेल. नवससायास करणें व ते फेडणे त्यांना जरी पसंत नसले तरी घरांतील बायकांच्या जुन्यां समजुती जर त्यांच्यानें पालटवत नव्हत्या तर त्यांची जीं मते होती त्या मतांनाच मान देणे योग्य होते; व ते तसा मान देतही होते.

**ओघाबरोबर माणूस कसा जातो.**

रँडसाहेबांच्या निष्ठुर प्लेगव्यवस्थेमुळें त्रस्त झालेल्या लोकांना मदत करावी म्हणून हरीभाऊ प्लेग व्हालंटिअर म्हणून प्रथम लोकांना साहाय्य करण्याकरितां पुढें झालें. प्लेग व्हालंटिअर या नात्यानें त्यांनी केलेली लोकसेवा सरकार व जनता या दोघांनाही पसंत पडून सरकारनं त्या कामाबद्दल त्यांना 'केसरी हिंद' नांवाचें रौप्यपदक अर्पण केलें होते. या मानावरून आपण केलेली कामगिरी सरकार लोक या उभय पक्षांसही मान्य झाली असें हरीभाऊंना वाटलें; तोच सार्वजनिक कामांतील त्यांचा ओनामा असे समजण्यास हरकत नाही. यानंतर ते झपाट्यानें लोक व सरकार या उभय पक्षांतील मध्यस्थ अशा नात्यानें तडजोडीनें काम करण्यास पुढे सरसारवले. प्लेगदूषित भागांतून हिंडून फिरून, लोकांना कोणच्या प्रकारची दु:खे भोगावी लागतात ते अवलोकन करून, व लोकांची हालअपेष्टा डोळ्यांनी पाहून सरकारी अधिकाऱ्यांस ती त्यांची दु:खे निवदेन करून त्या दु:खापासून त्यांची मुक्तता करण्याचे काम त्यांनी अंगीकारिले; व त्यावेळीं त्यांना कांही कांही प्रसंगी त्यांत यशही आलें. सरकारी अधिकारी म्हटले म्हणजे बहुधा एककल्ली, कायद्याला अत्यंत जखडलेले असतात, त्यांच्याशी आपण कितीही युक्तिवाद केला असतां तो फुकट जातो, असा समज पुष्कळ लोकांचा होता. व प्लेगप्रतिबंधक कायदे म्हणजे हिंदुस्थानांतल्या लोकांच्या परिस्थितीचा, राहणीचा व त्यांच्या ऐपतीचा विचार न करतां बनविलेली तीक्ष्ण धारेची हत्यारेंच होत. त्या शस्त्रांच्या जिभा म्हणजे विषारी सर्पाच्या जिभा होत्या. अशा भयंकर प्राणघातक शस्त्रांपासून आपला बचाव कसा होईल, याची प्रत्येकास काळजी पडली होती. ती काळजी हरीभाऊंसारख्या मध्यस्थाच्या खटपटीनें अंशत: कमी झाली. आमच्या निरनिराळ्या धार्मिक पंथांनाही त्या शस्त्रांचा प्रखरपणा जाणवूं लागला होता. यांत ठिकठिकाणच्या वारकरी पंथांचा, देवाचे भरणारे वार्षिक मेळे, यात्रा वगैरेंचा समावेश झाला. या सर्वांना थोडी फार मोकळीक मिळून त्याच्यापासून सुटका व्हावी म्हणून हरीभाऊंनी बरीच खटपट चालविली. त्यापासून त्यांना यश किती आलें, हें सांगणे कठीण आहे. पण त्यांनी तें आपलें एक कर्तव्य आहे, तें केलें पाहिजे, असें समजून काम केले.

याशिवाय त्यांनी खासगी अनेक तऱ्हेने लोकोपयोगी कामे केली. त्यात 'नूतन मराठी विद्यालय' त्याच्या पुढची पायरी म्हणजे 'न्यू पूना कॉलेज' ही होत. या दोन्हीही शिक्षणसंस्था त्यांच्याच श्रमाची आणि कर्तबगारीची फळें होत. न्यू पूना कॉलेज काढण्याच्या

कामी त्यांनी फार मेहनत घेतली होती. ती त्यांची मेहनत यशस्वीही झाली. सार्वजनिक कामांत 'नूतन मराठी विद्यालय' व 'न्यू पूना कॉलेज' ही दोन जशी दृश्य फळें लोकांच्या नजरेपुढे सदोदित आहेत, तशीं त्यांची म्युनिसिपल कामे लोकनिदर्शनास आली नाहीत, व तीं संघशक्तीने केलेली कामे असल्यामुळे कदाचित् उठून दिसणारही नाहीत. संघांत केलेली कामें नेहमीच अशी गुप्त स्थितीत राहतात. तशांत म्युनिसिपालिटी-सारख्या 'बारभाई' संस्थेत आपल्या मताप्रमाणे व मनाला योग्य वाटेल तशी व्यवस्था करणें कठीण व परावलंबी असते. त्यामुळें हरीभाऊंसारखा निस्पृह माणूसही त्या बारभाई संस्थेत उठून दिसला नाही. ते स्वत:कितीही नि:स्पृह असले, कितीही अंग मोडून काम करणारे असले, त्यांना कितीही व्यवस्थेची व टापटिपीची आवड असली, तरी हजारों लोकांचे जेथें काम आहे तेथे एकट्यादुकट्यानें काम करावें!! या न्यायानेंच हरीभाऊंचे म्युनिसिपल कमेटींत फारसें तेज पडलें नाही. पण सरकारी अधिकारी मात्र त्यांच्या आंगचें सामर्थ्य ओळखीत होते, व त्यांचे अधिकाऱ्यांत साधारणत: बरें वजन होतें. या त्यांच्या वजनामुळेंच कलकत्याकडे एक रेल्वेचा फांटा काढण्याचे काम हरीभाऊंच्या एका श्रीमान् स्नेह्यानें अंगावर घेऊन त्या कामांत त्यांनी हरीभाऊंना घेतले.

सरकारांत खटपट करून रेल्वेची परवानगी मिळविण्याच्या कामांत त्यानें हरीभाऊंची योजना केली; व त्या कामांत यश आले म्हणजे रेल्वेच्या उत्पन्नांत त्यांचा हिस्सा राहील असें त्यानें सांगितले होते. या स्नेह्याच्या भिडेखातर हरीभाऊ त्या रेल्वेच्या भानगडीत व नफ्याच्या लोभांत पडले. हें काम अंगावर घेऊन फार दिवस झाले नाहींत तोंच मूळचा उत्पादक स्नेही एकाएकी परलोकवासी झाला! या त्याच्या मृत्यूमुळें तें सर्व रेल्वेचें जोखड हरीभाऊंच्या मानेवर बसले. त्यांच्यांतून मान काढून घेणें फार दुर्घट झालें व त्या जोखडामुळें शरीरावर व मनावर दडपण बसल्यासारखें होऊन हरीभाऊ चिंतामग्न दिसूं लागले. ते बाह्यात्कारीं खूप आनंद दाखवीत. परंतु सूक्ष्म अवलोकन करणाराला ती त्यांची स्थिति कळल्याशिवाय राहात नसे. नित्य त्यांच्या खालावलेल्या प्रकृतीमुळें त्यांचा चेंहरा विलक्षण काळवंडलेला दिसू लागला व डोळ्यास मंडळें पडलेलीं भासूं लागली. अशा स्थितींत मी त्यांना असे होण्याचें कारण विचारलें असतां, 'कांही नाही, कांही नाही' असे म्हणून तो माझा प्रश्न उडवून दिला. पण पुढे कांही महिन्यांनी स्पष्ट जरी नाही तरी अंशत: असें कबूल केलें की, त्या रेल्वेमुळे माझ्या मनाला फार टोचणी लागली आहे. त्यावर त्यांना 'असल्या भानगडींत पडून तुम्ही आपली प्रकृति कां बिघडून घेता?' असें मी म्हटलें. तेव्हा त्यांनी सांगितलें कीं, 'मी होऊन असल्या भानगडीत कधीही पडत नाही, पण मित्रकार्य करावें म्हणून पडलों. तों तो मरून गेला आणि माझ्या गळ्यांत हे जाळें अडकलें. एकादा पाण्याच्या ओघांत पडला म्हणजे जसा पुढेंच वाहावत जातो तशी माझी स्थिति झाली आहे.' या रेल्वेच्या कामासाठींच ते शेवटीं कलकत्याला गेले होते. जातांना विचारून गेले व मी कॉंग्रेस झाल्यावर परत येईन, असें म्हणाले. एकदां म्हणाले, 'गेलो तर जाईन, नाहींतर कांही दिवस लोणावळ्यासच राहीन. जसें प्रकृतिमान असेल तसें करीन.'

पुढें ते कलकत्यासच गेले. तेथे रेल्वेचे शेअर वगैरे विकण्याचें थोडे काम करून इंदूर वगैरेंकडे ते शेअर विकण्याकरितां गेले. तेथे त्यांचे काम साधारण जमत चाललें होतें. तों एक दिवस फार जोराची पर्जन्यवृष्टि झाली. त्यामुळें त्यांच्या दोन्ही पायांला एकदम सूज आली, व सपाटून ताप भरला! हेंच त्यांचे शेवटचे दुखणें होय. यानंतर ते मुंबईस आले. तेथें मुंबईच्या मोठमोठ्या धन्वंतऱ्यांना त्यांची प्रकृति दाखविण्यात आली. पण कोणीही दुखणें साध्य असल्याचें दर्शविले नाही. जलोदराची भावना आहे असें मत पडल्यावर तर त्यांच्या प्रकृतीला जास्त जास्तच चढ होत चालला; व अखेर त्यांना आतां मुंबईत ठेवणे ठीक नाही, आपल्या घरी जाऊन पडावें, असें त्यांच्या पत्नीला, आप्तेष्टांना आणि नातेवाइकांना वाटले. म्हणून त्यांनी हरीभाऊंना अत्यंत काळजीनें आणि फुलाप्रमाणें संभाळून पुण्यास आणलें. परंतु त्यांची प्रकृति म्हणजे काचेच्या बांगडीप्रमाणे



अनुक्रमणिका

झाली होती. त्यामुळें त्यांना किती जरी तजविजीनें आणलं तरी त्यापासून जास्त श्रम झाले. रेल्वेंतून घरी मेण्यांत घालून आणलें. मेण्याचाही धक्का त्यांना सहन झाला नाही. त्यामुळें रक्ताच्या उलट्या झाल्या, व तें पाहून सर्वांचाच धीर सुटला. जेमतेम त्यांना घरी आणलें. घरी आणल्यावर ते सरासरी पांच सहा तास होते. त्यांची इतकी स्थिति होती तरी त्यांनी आपली शांति ढळूं दिली नाही, आपल्या पत्नीला चार उपदेशाच्या गोष्टी सांगण्याचे कर्तव्य बाजूस सारलें नाही, व भर्त्यांनें पत्नीसाठी जें करावयाचें असतें तेंही आपलें कर्तव्य ते विसरले नाहीत. सर्व गोष्टी घाईघाईनें पण शांत चित्ताने आपल्या मित्रांच्या साहाय्यानें त्यांनी पार पाडल्या, व नंतर शांत चित्तानें हा लोक सोडून परलोकी प्रयाण केले!

झालें. आपल्या प्रियपत्नीला या मनुष्यांनी भरलेल्या जगांत एकटीला सोडली. नाही तिला कोणाचा आधार, नाही प्रेमाच्या माणसांचे छत्र, कीं नाही मनाला विरंगुळा. अशा स्थितींत बिचारीला अरण्यांत सोडावी तशी सोडून गेले; त्यांच्यासारख्या कोमल अंत:करणाच्या माणसानें पाषाणहृदयासारखे वर्तन केले. सरस्वती मातेला दीर्घकाळ दु:खांत लोटली व आपल्या आवडत्या कादंबरीरूप अपत्यांना पोरकी करून सोडली ! हाय हाय! दैवाची गति विचित्र आहे. हरीभाऊंच्या मनोरथरूपी ज्या सात सात मजली इमारती चढल्या होत्या त्या एका क्षणांत जमीनदोस्त होऊन गेल्या. सरस्वतीच्या मंदिरांतील त्यांची जागा रिकामी पडली. ती लौकर भरून येण्याची सध्यां तरी आशा नाही. मराठीचा सर वाल्टर स्कॉट म्हणा, जेन ऑस्टेन म्हणा, लॉर्ड लिटन म्हणा, किंवा रेनॉल्ड म्हणा, सर्वांचे एकीकरण होऊन झालेले हरीभाऊ आज आमच्यांतून गेले- आम्हां सर्वांना हाय हाय करीत बसवून परलोकचें सुख अनुभवण्यास निघून गेले. आपल्या जिवलग मित्राच्या मागोमाग चालते झाले व मजसारखीला त्या पूर्वकथांचे स्मरण करण्यास ठेविले! झालें यापेक्षा जास्त माझ्यानें लिहवत नाही,

हरीभाऊ, आपण ठरविल्याप्रमाणें मी तुमच्या शब्दांतून मोकळी झालें. आपण पुष्कळ वेळां बोललों होतों की, आपल्यापैकी जें कोण मागें राहील त्यानें गेलेल्याचं चरित्र लिहावें. माझ्या दुर्दैवानें तो भाग मजकडे आला. तुम्ही मात्र तसेच निसटून गेला, तसें जर मला जाता आलें असतें तर मग तुमचे शब्द तुम्हांला खरे करावे लागले असते. पण माझ्यासारखे तुम्ही दुर्दैवी नसल्यानें ती जवाबदारी तुम्हांवर आली नाही.

खरें म्हटलें तर अगोदार जाऊन तुम्हांस लिहावयास लावण्याचा माझा मान होता. पण असे कित्येक माझे मान व हक्क देवानें हरण केले आहेत. तेव्हां या एकाचीच काय गोष्ट! मजसारख्या भग्नहृदयी माणसाच्यानें याहून चांगले चरित्र लिहिणें शक्य नाही. खरोखर तुमचें चरित्र म्हणजे फार गोंडस व्हावयाला पाहिजे होते. तुम्ही जसे कादंबरीकार होतां तसें तुमचें चरित्र म्हणजे वाचकांना वाचतांना ती कादंबरीच वाटावयास पाहिजे होती. परंतु लेखणीचें सामर्थ्य तितकें मजजवळ देवानें दिलें नाही. यामुळें माझ्या स्मरणानें ज्या ज्या गोष्टींची चित्रें माझ्या डोळ्यापुढं आलीं तीं मीं वाचकांपुढें मांडली. मला यांत एक आशा वाटते, ती ही की, हें मी रेखाटलेलं चित्र घेऊन दुसरा एकखा कुशल चित्रकार त्याला आणखी रंग वगैरेचे ब्रश देऊन चांगले दर्शनीय करील व जगाला दाखवील. तारखा मित्त्या वगैरेचे मला बरोबर स्मरण नसल्यामुळें मी सर्व गोष्टी अदमासावरच ठेवल्या आहेत. जसें माझ्या सध्यांच्या स्थितीत लिहितां आले तसे लिहून मी तुमच्या शब्दांतून मोकळी झालें. मान्य करून घ्या एवढेंच सांगणे आहे.

माझी ही वाळून सुकून गेलेली तुळशीची अंजुळी अश्रुजलानें सिंचन करून माझ्या सरस्वतीमंदिरांतल्या आवडत्या भावाच्या समाधीवर वाहतें.

---

१. वि. ज्ञा. विस्तार, पु. ५१ पाहा
२. मनोरंजन पुस्तक पु. २५ अ ४
३. मनोरंजन पुस्तक पु. २५ अ ४

*



अनुक्रमणिका

# दिवेकर-संपादित जयरामकविकृत पर्णालपर्वतग्रहणाख्यान.

**संपादन : सदाशिवराव दिवेकर**
**परीक्षण : चिंतामण विनायक वैद्य.**

*[इतिहासाचे अग्रसाधन म्हणजे समकालीन लेखन होय. कवि जयदेव हा शिवाजी महाराजांच्या समकालीन कवी होत; त्याचे 'राधामाधव विलास चंपू' हे चंपूकाव्य प्रसिद्ध असून इतिहासाचार्य राजवाडे ह्यांनी त्यासाठी लिहिलेल्या परीक्षणात्मक प्रस्तावनेत शहाजी राजांचे 'स्वराज्य संकल्पक' व्यक्तिमत्त्व संशोधित केले आहे. जयराम कवी हा शिवाजी महाराजांचा समकालीन होता; त्यामुळे त्याची काव्यरचना केवळ भाटकवीची काव्यरचना म्हणून दुर्लक्षिता येत नाही; असे मत इतिहासाचे थोर अभ्यासक भारताचार्य चिंतामणराव वैद्य ह्यांनी, ह्या परीक्षणात त्यांच्या इतिहाससंशोधक दृष्टीने केले आहे. ते वाचनीय व अभ्यसनीय आहे. जयराम कवींचे 'पर्णालपर्वत ग्रहणाख्यान' हे आख्यान काव्य आहे. शिवाजी महाराजांनी अनाजी पंडिताच्या सहाय्याने पन्हाळा किल्ला कसा जिंकला; त्याचे काव्यशुद्ध आणि इतिहासशुद्ध वर्णन आहे. शिवाजी महाराजांच्या चरित्राची सभासदी-बखर ४० वर्षानंतरची आहे. जयदेवाने शिवाजी महाराजांच्या विविध पराक्रमावर मराठी, हिंदी आणि संस्कृतात आख्यानकाव्ये लिहिली आहेत. ते समकालीन लेखन असल्याने मोलाचे आहे. प्रस्तुत 'पर्णाल पर्वत ग्रहणाख्यान' हे जयरामाचे काव्य, भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणेचे सभासद रा. सदाशिवराव दिवेकर ह्यांनी संपादित केले आहे.*
*–संपादक]*

हल्ली प्रसिद्ध झालेल्या जयराम नांवाच्या शिवाजी-समकालीन कवीने केलेलें 'पर्णालपर्वतग्रहणाख्यान' अर्थात पन्हाळा किल्ला घेतल्याची संस्कृत कविताबद्ध हकीकत सदाशिवराव दिवेकर, सभासद भारत-इतिहास-संशोधक मंडळ पुणें, यांस मिळालेली, त्यांनी संपादन करून मराठी भाषांतरासमवेत व मार्मिक प्रस्तावनेसह मराठी वाचकांसमोर नुकतीच ठेवली आहे, त्याचबद्दल दिवेकरांचे, मराठी वाचकांचे आभारपूर्वक अभिनंदन करणे इष्ट आहे. शिवाजी महाराजांचे संपूर्ण पायाशुद्ध व्यापकदृष्टीने, जगतांतील एक समर्थ स्वातंत्र्यसंस्थापक या नात्याने चरित्र अद्याप लिहिलें जावयाचें आहे, आणि अशा चरित्रलेखनास समकालीन लेखांचा जितका अधिक आधार मिळेल, तितका पाहिजे आहे. सभासदादिकृत बखरी शिवचरित्रावर आहेत; पण त्या सर्व शिवचरित्र संपल्यानंतर तीस चाळीस वर्षांनी लिहिलेल्या, अर्थात् अनेक मागाहून प्रचलित झालेल्या कल्पनांनीं भरलेल्या असणे साहजिक आहे. यामुळें शिवाजीच्या निरनिराळ्या पराक्रमांच्या, समकालीन लेखांची किंमत अतिशय आहे. इतिहासाचें अग्रसाधन म्हणजे समकालीन लेख होत, हे सांगणें नको. हेही लेख तपासून ग्राह्याग्राह्यादिकाचा विचार करून शत्रुमित्रादि भावांनी भरलेले असल्याने छानून व पाखडून घ्यावे लागतात ही गोष्ट निराळी; पण त्यांत स्थळ, काळ व वृत्त यांचा विपर्यास होणें सहसा शक्य नसतें, आणि ऐतिहासिक व्यक्तींच्या मनोगत विकारांची व कार्यहेतूंची माहिती त्यांजवरून चांगली लागते. या



अनुक्रमणिका

रीतींने विचार करिता, हे जयरामकृत पर्णालपर्वत ग्रहणाख्यान फारच महत्त्वाचे आहे. याचे काव्यदृष्ट्या सौंदर्य चांगले आहे हें मी पुढे दाखविणारच आहें, पण ऐतिहासिक लेखकदृष्ट्याही याचे महत्त्व अव्वल दर्जाचें आहे; आणि हा लेख तंजावरच्या लायब्ररीतून संपादन करून तो ग्रंथ-संपादनाच्या पद्धतीने मराठी वाचकांसमोर ठेविल्याबद्दल सदाशिवराव दिवेकरांचे आभार मानणें हे आपलें प्रथम कर्तव्य आहे.

सदरहू ग्रंथ संस्कृतांत आहे, आणि काव्यस्वरूपाचा आहे, ही गोष्ट कोणाच्या दृष्टीनें, या लेखाच्या ऐतिहासिक महत्त्वास कमीपणा आणणारी आहे, असे वाटेल. परंतु या गोष्टीमुळें कोणतेंच वैगुण्य समकालीन लेखाच्या महत्त्वाला येत नाही. भाषा मराठी असल्यास त्यांत अतिशयोक्ति किंवा कल्पित गोष्टी येत नाहीत असे नाही; आणि काव्यांत अतिशयोक्तीशिवाय दुसरे अलंकार असूं शकतात. याच कारणानें श्रीहर्षचरित या बाणभट्टाच्या ऐतिहासिक कृतीस जे ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्व आहे, ते श्रीहर्षाच्या मागून शेंकडो वर्षांनी लिहिल्या गेलेल्या ऐतिहासिक ग्रंथासही नाही, हे उघड आहे. त्यांतून इतिवृत्त तर समकालीन लेखांतच चांगले निर्भेळ येऊ शकतें, त्यांत अतिशयोक्तीने किंवा इतर अन्य कारणांनी मागाहून उत्पन्न झालेल्या भाकडकथा येऊं शकत नाहींत. किंबहुना कांही कांही वृत्तांचे तपशील कालान्तरानें नष्ट होतात, ते सुभेदार असतां पुष्पमित्रानें त्यास पाटलीपुत्रास अश्वमेधासाठी बोलाविलें किंवा विदर्भाच्या एका राजाशीं त्याच्या भावाबंदांचा तंटा होता या बारीक गोष्टी समकालीन कालिदासाच्याच नाटकांत सुद्धां येऊं शकतात; किंवा श्रीहर्षाची राज्यश्री कनोजहून कैदेंतून सुटून विन्ध्यारण्यांत गेली व तेथें श्रीहर्षास सांपडली, इत्यादि तपशील समकालीन बाणाच्या श्रीहर्षचरितांतच सांपडूं शकतो. याच काव्यांत वर्णन केलेल्या पन्हाळ्यावरील झालेल्या अनाजी पंडिताच्या हल्ल्याच्या वर्णनांतील तपशील मागाहून कोणत्याही बखरींत सांपडणे शक्य नाही. किंवा बहिलोल खानाशीं झालेल्या युद्धांचे जे तपशीलवार वर्णन यांत आहे तें मागाहून कोणत्याही बखरींत मिळणे शक्य नाही. लढाईच्या वर्णनांची तर ही मुख्य अडचण नेहमीं आहे. प्रत्यक्ष लढाई कशी झाली, याचे वर्णन समकालीन किंबहुना प्रत्यक्ष पाहिलेला मनुष्यच करू शकेल. शेकडो वर्षांनी किंबहुना पांचपन्नास वर्षांनंतर सुद्धा लिहिणारा बखरकार नुसती लढाई झाली आणि तींत अमक्याचा जय किंवा पराजय झाला, एवढेंच लिहूं शकेल. एंखादा कुशल कल्पनाबाज कवि आपल्या डोक्यातून निरनिराळे काल्पनिक प्रसंग वर्णन करूं शकेल, नाही असें नाही. पण तो काल्पनिक प्रसंग वर्णन करीत आहे हे कधीही लपूं शकणार नाहीं. महाभारतकार सौति अतिशय प्रतिभावान् होता, हे निर्विवाद, पण महाभारतांतील शेंकडो युद्धवर्णनेंही काल्पनिक एकाच साच्याची वाटतात. कांही सत्यपणा भासतो, तो मूळ समकालीन व्यासाच्या वर्णनाचा आधार असल्याने सांपडतो; हे उघड आहे. असो, तर संस्कृत काव्य असल्यानें या समकालीन कवीच्या ऐतिहासिक लेखाच्या महत्त्वास कोणताच बाध येत नाही व आलेला दिसत नाही. यांतील वृत्तवर्णने, विशेषत: लढायांची वर्णने तपशीलवार असून तो तपशील काल्पनिक नाही, हें स्पष्ट दिसतें आणि यामुळें या लेखास, या समकालीन संस्कृत काव्यास, मराठी बखरीपेक्षां, अर्थात् मगाहून लिहिलेल्या बखरीपेक्षां, जास्त किंमत आहे.

जयराम कवि शिवाजीचा समकालीन होता, हें तर नि:संशय आहे, आतां हे काव्य पन्हाळगड घेतल्यावर लवकरच लिहिलें गेले काय, हा प्रश्न आहे. सदाशिवराव दिवेकर प्रस्तावनेंत म्हणतात : “शिवाजी महाराजांनी पन्हाळा शके १५९४ फाल्गुन वद्य १३ त (मार्च १६७३ इ.सुमारे) घेतला; पुढें एक महिन्यानें उम्राणीजवळ बहिलोलखानशी प्रतापराव गुजर व आनंदराव यांचे युद्ध झालें. त्यानंतर १५९५ शके (१६७३) मधील हें काव्य असावें. कारण सुरत दुसऱ्यांदा लुटली (तो प्रसंग शके १५९२ कार्तिकांतील आहे), त्यानंतर तीन वर्षांनीं कवि व्यंकोजीकडे परत येऊन सर्व हकीकत सांगत आहे, असें या काव्यांत वर्णिलें आहे. तेव्हां १५९५ शके हा या काव्याचा काळ जुळतो.” रा. दिवेकरांनी

शिवाजी महाराजांच्या चरित्राची शकावली अनेक साधनांवरून फार काळजीपूर्वक जुळविली असून ते ती लवकरच साधार प्रसिद्ध करणार आहेत; तेव्हां त्यांचे हे वर दिलेले शक मान्य करण्यास हरकत नाही. कदाचित् कवि काव्यांत वर्णनाचे प्रसंगही कल्पित दाखल करीत असतो तेवढ्यावरून काव्यकाळ ठरविणें नेहमींच योग्य होत नाही, असें कोणी म्हणेल. ठळक उदाहरण म्हणजे महाभारतारंभीं सौति म्हणतो : "मी जनमेजयाच्या सर्पसत्रांत जनमेजयानें सांगितलेलें भारताख्यान नुकतेंच ऐकून, भारतीयुद्धाची जागा स्यमन्तपंचक पाहावयास गेलो." पण ही केवळ कवीची कथाजुळवणी आहे, हें उघड आहे. कारण भारतीयुद्धाचा अगदीं अलीकडचा काळ घेतला, तरी महाभारत लिहिणारा सौति आणि जनमेजय यांच्यामध्यें कमीत कमी एक हजार वर्षांचे अन्तर दिसतें. अर्थात् कवि व्यंकोजीस मी तुम्हांस तीन वर्षांनी भेटलो, हे कदाचित् काल्पनिक म्हणेल. पण सदाशिवराव दिवेकर यांनी जें कारण पुढील ३ कलमांत दिलें आहे तें येथें लक्षांत घेण्यासारखें आहे. "राज्यभिषेकानंतर कर्नाटकच्या स्वारींत शिवाजी आणि व्यंकोजी यांमधील सावत्रपणाच्या संबंधास उग्र स्वरूप प्राप्त झाले, त्यापूर्वीं हे काव्य लिहिलें गेले असले पाहिजे, असा अन्तर्गत पुरावा आहे." (अर्थात् राज्यभिषेक शके १५९६ त झाला त्यापूर्वीचें हे काव्य शके १५९५ तलें बरोबर दिसतें) हा अन्तर्गत पुरावा असा, "मी पूर्वी शहाजी महाराजांना शिवाजीच्या पराक्रमाची हकीकत सांगितली, तेव्हां ते तुष्ट झाले. तुम्हींही ती हकीकत प्रथमपासून बेंगरूळ येथे गौरीविलास महालांत ऐकलीत." हीं प्रेमाचीं वाक्यें शिवाजीच्या तंजावरच्या स्वारीनंतर कवीस सांगतां येणार नाहींत; हे दिवेकरांचे म्हणणें ग्राह्य आहे. आपल्या काळांतून मागील कालांत जाण्याचा प्रयत्न कवीनें कीतीही बुद्धिमत्तेने केला तरी त्यास पूर्णत: तसें जातां येत नाही. तो कोठें तरी उघडा पडतो; आणि अशाच रीतीनें अन्तर्गत पुराव्यावरून याचा काळ ठरविंता येतो. पुढील एका श्लोकांत कवीनें व्यंकोजीच्या तोंडी शिवाजीविषयीं प्रेमादरपूर्वक 'दाजीस्वामी' शब्द घातला आहे. त्यावरून व इतर गोष्टींवरून ह्या काव्याचा काळ शके १५९५ धरला जाण्यास हरकत नाही. म्हणजे पन्हाळगडाची प्राप्ति आणि बहिलोलखानाचा जय, यानंतर वर्ष सहा महिन्यांच्या आंतलेंच हे काव्य आहे; आणि म्हणूनच यांतील वर्णनें ऐतिहासिक दृष्ट्या फार महत्त्वाचीं आहेत.

इतकेच नव्हे; तर सदाशिवराव दिवेकरांनी व्यंकोजीच्या मुखीं घातलेल्या प्रश्नांचें मर्म जेधे शकावलीच्या आधारें जें दाखविलें आहे, ते ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. जेधे शकावलींतील उतारा त्यांनी येथे दिला आहे, तो असा: "शके १५८९ वैशाखमासीं बहिलोलखान व एकोजी राजे यांनीं रांगणियास वेढा घातला. राजश्रींनीं वेढा मारून काढला. मग भाद्रपदांत येदिलशहाचा व शिवाजीराजे यांचा सल्ला झाला." तेव्हां व्यंकोजीच्या मुखीं तह मोडून हें उग्र कर्म दाजीस्वामींनी कां केलें हा प्रश्न मार्मिक असून तो कवीस सावत्रभाव पुढें तेढीस गेल्यानंतर खास सुचला नसता. मांडलिकांच्या एका भावास हाती धरून दुसऱ्याशीं लढवण्याची युक्ति इंग्रजांसच साधली आहे असे नाही. ती जो जात्यावर (म्हणजे परकीय अम्मल चालविण्याच्या जात्यावर) बसेल, त्यास सुचण्यासारखी आहे. ती पेशव्यांनीही चालविली. शाहू महाराजांस शिवाजीविरुद्ध लढाईवर नेणे शक्यही नव्हतें आणि धोक्याचेंही होतें. पण सावत्र बंधु व्यंकोजी यास शिवाजीविरुद्ध लढण्यास मदत घेण्याची युक्ती विजापुरकरांनीं चालविली; यांत नवल नाही. आतां व्यंकोजी फारसा हौसेने गेला असेल, असें मला वाटत नाही. आणि व्यावहारिक विचार करतांही तसें मानतां येत नाही. कारण शिवाजीने आक्रमिलेले राज्य वडिलार्जित नसून स्वसंपादित होते. अर्थात् शिवाजीस जिंकून व्यंकोजीस फारसा लभ्यांश नव्हता, जसा नेहमीं सावत्र भावांच्या भांडणांत मांडलिक राजांत असतो. उलट व्यंकोजी जे राज्य खात होता तें सर्व शहाजीच्या कमाईचें आणि विजापुरच्या मानलेल्या स्वामित्वाखाली होतें. अर्थात् तो लढण्यास गेला नसता, तर सबंध जागीर खालसा होण्याची भीति

होती. तात्पर्य, तो बहिलोलखानाबरोबर शिवाजीविरुद्ध लढला, तो बहुतेक नाखुषीनें लढला असावा. आणि तह होऊन दोन्ही स्वतंत्र राजे अलग झाले, हें त्यास बरेंच वाटले असावे. तो तह मोडून दाजीस्वामींनी आमच्या स्वामींशी युद्ध कां आरंभले, ही पृच्छा व्यंकोजीची काल्पनिक नसून स्वाभाविक असावी; आणि या वास्तविक पृच्छेस आपल्या काव्यांत कवीनें गोविलेलें दिसतें.

असों, याप्रमाणें या काव्याचे समकालीनत्व प्रस्थापित झाल्यावर त्यात काय काय हकीकती महत्त्वाच्या वर्णन केल्या आहेत, त्यांचा महत्त्वाचा सारांश रा. दिवेकर यांनी प्रस्तावनेंत दिला आहे. तो पुन्हां येथे सांगण्यापूर्वी या ग्रंथाच्या पहिल्या अध्यायावरून ग्रंथाविषयीं, ग्रंथकर्त्याविषयीं व त्याच्या इतर कृतीविषयी आपल्यास प्रत्यक्ष माहिती काय मिळते, ते पाहूं. जयराम आपले व्यंकोजीच्या दरबारी जाणें प्रथम वर्णन करून आपला उत्तम सत्कार झाल्याचे वर्णन करतो, मग व्यंकोजी वडील बंधु शिवाजीचें विनीत भरताप्रमाणें कुशल विचारतो, कवि कुशल सांगून शिवाजींचे चरित्र कवींनी पूर्वी वर्णिलेले व कविंच्या प्रसादानें मी ऐकिलेलें वर्णन केलें आहे, ते महाराजाधिराज शाहूमहाराज यांनी बेंगलूर येथे संतुष्ट चित्तानें ऐकिलें असे म्हणत आहे. यावरून शिवाजी महाराजांच्या चरित्रावर, तत्कालीन काव्यें कवींनी केली असल्याचे स्पष्ट दिसते. मग ती संस्कृत असोत किंवा मराठी. तेव्हां समकालीन इतर कवींचेही लेख बरेच असून ते सांपडण्याची आशा आहे. यापुढें कवि म्हणतो: "नंतर काही वर्षांनी काव्य लिहितां लिहितां सर्व संग्रहाचें एक काव्य केले, तो संग्रह तुम्हीं व सर्व राजवंशीयांनी रसाकुल होऊन ऐकिला." येथे 'राधामाधव विलासा'ची आठवण साहजिक येते, आणि हा ग्रंथ शके १५९५ पूर्वी तयार झाला असावा असें वाटतें. येथें त्या ग्रंथाचें नाव नाही हे खरें, तरी सर्वसंग्रह शब्दानें आणि रसाकुल शब्दानें त्याचीच आठवण येते. असो, व्यंकोजी म्हणतो "मी तें सर्व ऐकिलें आहे, पण तुम्ही येथोन गेल्यास तीन वर्षे झाली, आणि तुम्ही काय काय केले; आणि तुम्हांस राजदर्शन कसें घडले. हल्ली शिवाजीमहाराज कोठें आहेत." त्यावर कवि म्हणतो : "मी बारा भाषांत कवित्व करतो; तेव्हा प्रथम मराठी भाषेंत शिवचरित्र वर्णिले. नंतर त्यांनी सुरत दुसऱ्यांदा लुटली, त्याचे वर्णन हिंदी आणि मराठी दोन्ही भाषेंत केलें. नंतर शिवाजीमहाराजांनी त्र्यंबेकश्वर घेतले व कारंज नगर लुटले, त्याचें वर्णन मराठी व हिंदी दोन्ही भाषेंत केले. नंतर महाराजांनी बागुलांचा किल्ला घेतला. पुढे अलंसुरंग वगैरे लढाया झाल्या; अहिवंतगड, अचलगड, मार्कंडगड, रवळीजवळा, चामुंडगड, हरिश्चंद्र, महिषगड, अडसरगड किल्ले घेतले; यवनांचा प्रख्यात जीवधन किल्ला घेतला, जवार घेतलें, सोमशहाचें रामनगर घेतले व निरनिराळ्या किल्ल्यांची नवीन नावे ठेविली, तें मी वर्णन करितों, ऐका." या भाषणावरून मराठी हिंदी भाषेने दोन प्रसंगांची काव्ये कवीने केल्याचे येथे मुद्दाम सांगितले आहे. समकालीन असल्याने ही काव्यें सापडणे महत्त्वाचे आहे. त्यांतील वर्णने ऐतिहासिक दृष्ट्या मान्य करण्यासारखीं आहेत. ती काव्यें सांपडतील अशी उमेद आहे. असो, इतकें भाषण झाल्यावर व्यंकोजी, पन्हाळगड नुकताच घेतला असल्याने त्याची आठवण होऊन, म्हणतो : "आमच्या महाराजांचा (म्हणजे मोंगलांचा नव्हे, विजापुरकरांचा) विस्तीर्ण पन्हाळगड सल्ला झालेला असतांही कसा घेतला? त्या किल्ल्याची सामुग्री व व तयारी उत्तम होती. (येथें किल्ल्याच्या लढाऊ सामर्थ्याचें व तयारीचें वर्णन महत्त्वाचें आणि खरें दिले आहे, ते पाहाण्यासारखें आहे.) असा समर्थ किल्ला दाजीस्वामींनीं कसा घेतला हे प्रथम सांगा; आणि नंतर दुसऱ्या गोष्टींचे वर्णन करा." अशी या 'पर्णालग्रहणाख्यानाची' प्रस्तावना कवीनें जमविली आहे. ती काल्पनिक नाही, हे मीं पूर्वी दाखविलेंच आहे. राजदरबारांत असें संभाषण झाल्यानंतर कवीने हा ग्रंथ व्यंकोजीपाशी असतांनाच तयार करून त्यांच्या राजसभेत पंडितांसमोर वाचून दाखविला असावा, असा अंदाज करणें वावगं नाहीं.

यावरून शिवाजीमहाराजांच्या निरनिराळ्या पराक्रम-प्रसंगावर या कवींने मराठी हिंदी, मराठी व संस्कृत काव्ये केली आहेत, हें निर्विवाद दिसते, व त्यापैकीं हें काव्य प्रथम सांपडले आहे. आणि तें मराठी वाचकांसमोर आल्याबद्दल मराठी वाचकांस आनंद होईल, यांत शंका नाही. शिवचरित्र जितकें जितके समकालीन लेखांनी महाराष्ट्रीयांसमोर येईल, तितकें तितके अधिकच प्रिय होईल, हे काय सांगावयास हवे? इतर कवींचीही काव्यें शिवचरित्रावर असल्याचा यांत उल्लेख आहे; तोही खरा आहे. कारण परमानंद कविकृत शिवभारत हा एक विस्तृत ग्रंथ दिवेकरांनाच सांपडला असून, तो, ते लवकर महाराष्ट्रीय वाचकांपुढे ठेवणार आहेत.

या काव्यांत पन्हाळगड घेण्याची जी हकीकत दिली आहे तिचा सारांश दिवेकर यांनी प्रस्तावनेत दिलाच आहे, तो येथे देण्यांची आवश्यकता नाही. मात्र यावर कांही विशिष्ट विचार सुचतात, ते येथें नमूद करतो. या कवीची लेखनशैली जशी काव्यशुद्ध तशी इतिहासशुद्ध आहे, असेंही म्हणतां येते; कारण दुसऱ्या अध्यायांत या प्रकरणाची भूमिका ऐतिहासिक रीत्या ग्रंथकारानें तयार करतांना सालेरीच्या युद्धांतील मोंगलाच्या पराभवापासून योग्य सुरवात केली आहे. अवरंगजेबानें, सर्व मुसलमान राजांनी मिळून शिवाजीस ठेचावें; आणि कोणत्या तरी किल्ल्यांत त्याला कोंडून मारावे; अशी सल्ला दिली. त्यात त्याच्या लोकांनी जें प्रत्युतर पाठविलें, निदान पाठविंले असें कवि वर्णन करतो, तें फार महत्त्वाचें आहे. शिवाजीचें युक्तिसामर्थ्य, त्याच्या किल्ल्यांची कडेकोट तयारी, मैदानांत राहिलेल्या मुसलमानांची डोंगरी युद्ध करण्याची अशक्तता, शिवाजीच्या चपळ घोडदळ या पथकांचे वावटळीसारखे येणारे छापे, याचे त्यांत उत्कृष्ट वर्णन केलें आहे. याशिवाय जाधवराव व हबशी यांस अवरंगजेबानें हेटाळून शत्रूला मदत केली असेंही म्हणणे आहे, हे अन्यइतिहासादृष्ट्या खरें किंवा कसें हे ताडून पाहिलें पाहिजे. इतर मराठी बखरकारांनी व मुसलमानानी तवारीखकारांनी या वर्षाची हकीकत कशी दिली आहे, हें ताडून पाहण्यासारखे आहे, पण तितका अवकाश नसल्याने मी तें करीत नाही. पण ही जाधव आणि हबशी यांची हेटाळणी एक महत्त्वाची बाब या अध्यायांत सांगितलेली लक्षांत धरण्यासारखी आहे.

अध्याय ३ मध्यें खुद्द विजापुराकडे कवि वळून, तेथें अवरंगजेबाच्या कारस्थानांत मिळून जाणारा दिवाण खवासखान हबशी, बादशहा अल्पवयी असल्याने शिवाजीच्या विरुद्ध कसा कारस्थान करूं लागला, याचे वर्णन आरंभी आहे. अर्थात् शिवाजीस आघाडी मारून विजापुराविरुद्ध लढाई आपणच सुरू करणें जरूर पडलें व त्यानें पन्हाळयावर **अनाजी पंडितास** छापा घालण्यास पाठविले. किंबहुना विजापूर घेऊन बादशाहीचा बंदोबस्त करणें शिवाजीच्या मनांत शहाजीप्रमाणें आलें असें कवि म्हणतो; पण मला वाटतें ही कल्पना आहे. शहाजीनें जशी अहमदनगरास निजामशाही चालविली, तशी शिवाजी आदिलशाही कधी चालविता ना, हे उघड आहे. त्याच्या स्वतंत्र बाण्यास बादशाही चालविण्यापेक्षां, बुडविणेंच जास्त श्रेयस्कर वाटलें असतें. असो, अनाजीनें काळोख्या रात्री पन्हाळगडावर चढाई केली. माचीवर चढून पुढें किल्ल्याचा उभा कडा लागला तेव्हां घोरपडीनें माणसांवर माणसें चढवून तटावर माणसें पोंचविलीं व त्यांनी रणशिंगे फुंकिलीं. त्याबरोबर पाहरेकरी झोंपेतून जागे होऊन लढावयास आले, वगैरे मजेदार वर्णन आहे. पण ते किल्ल्याच्या सर करण्यास नेहमीच लागू पडेल हे जरी खरें, तरी नागोजी पंडितांची जी धांदल उडाली आहे, ती खरोखर कोणी प्रत्यक्ष पाहाणारांनी वर्णिलेली असली पाहिजे. हे पंडित मुख्य मुसलमान किल्लाधिकाराच्या हाताखाली होते. पण्डित लोक, तेव्हा काय आणि आतां काय, दोन्ही पक्षांकडे नोकरीस असत, किंबहुना मराठे लढवय्येही दोन्हीकडे लढत, हा चमत्कार हिंदुस्तानाच्याच इतिहासांत पाहावयास सांपडतो. असो, कोंडाजीच्या पराक्रमानें व अनाजी पंडिताच्या साहसानें किल्ला सर होऊन शिवाजी महाराजांस दोन दिवसांच्या आंत राजगडास

ही आनंददायक बातमी कळविली, एवढा मजकूर या अध्यायांत आहे. आणि चवथ्यांत शिवाजीनें राजगडाहून निघून प्रतापगडच्या देवीचें दर्शन घेऊन, रामदासस्वामींच्या चरणांचा स्पर्श करून, प्रतापगडास येऊन, तेथील सर्व मत्ता कबजांत घेतली; हा भाग असून शिवाजीचें वैभव, देवीचा पूजाविधि व किल्ल्यांची सामुग्री यांचे सविस्तर वर्णन कवीस करावयास सांपडले आहे.

पांचव्या अध्यायांत विजापुरांत या पन्हाळ्याच्या जिंकण्यानें उडविलेली धांदल, खवासखानानें बहिलोल खानाची लढाईवर केलेली नेमणूक, व त्यास मोंगल व इतर सरदारांच्या सैन्याशीं मिलाफ करून मग शिवाजीवर हल्ला करण्याची सल्ला हे प्रथम वर्णन करून, इतर सैन्यें येऊन मिळण्यापूर्वीच बहिलोलखाना-वर झपाट्यानें हल्ला करण्याचा शिवाजीचा धोरणी निश्चय, याचें वर्णन असून त्याप्रमाणे कृष्णाजी भास्कर यानें तात्काळ कूच करून पहाटेस बहिलोलखानास गांठून त्याचा लढाईत कसा फडशा उडवला, यांचे वर्णन आहे. हे वर्णन प्रत्यक्ष पाहाणाऱ्यानें केलेलें असावें असें दिसतें, हें प्रारंभीं सांगितलेंच आहे. शिवाजीतर्फे लढणाऱ्या अनेक योद्ध्यांची नावें मागाहून कल्पित सांगतां येणें शक्य नाही, व त्यांनीं ज्या रीतीनें बहिलोलखानाच्या फौजेस पहाटेस वेढलें व तलावावर हत्ती पाणी पिण्यास नेत असतां, कसा हल्ला सुरू केला, वगैरे माहिती खरी दिसते. लढाईतील निरनिराळ्या प्रसंगांचेंही वर्णन वस्तुस्थितींचें दिसतें. तात्पर्य, हा अध्याय ऐतिहासिक स्वरूपाचा चांगल्या रीतीनें आहे, यांत शंका नाही.

शेवटीं, या काव्याच्या सौंदर्याविषयी दोन शब्द लिहिणें अवश्य आहे. जयराम कवीची प्रतिभा उच्च दर्जाची असून ऐतिहासिक आख्यानास योग्य असें सरळ व सोपें व सुन्दर कल्पनांनी युक्त असें त्यांनी हे पद्य काव्य केलं आहे, असे म्हणतां येतें. यांत थोडासा गुण पद्याचाही आहे, हें सांगितले पाहिजे. संस्कृतांतील पद्यरचना पहिल्यापासून म्हणजे वैदिकोत्तर काळापासूनच बिघडली. वैदिक वाङ्मयांत मला, विशेषत: उपनिषदांत मात्र सोपें, तेजस्वी आणि वक्तृत्वपूर्ण असें गद्य दिसतें. पुढे सुबंधु वगैरे कवींचे वासवदत्तादि जे ग्रंथ गद्यांत लिहिले, त्यांत दीर्घ समास वापरण्याची पद्धतीच पडली, आणि त्याबरोबर अनुप्रासांची महती वाढली, यामुळें शब्दालंकार किंवा शब्दावडंबराचेंच स्तोम गद्यांत वाढलें. अशा शब्दनिनादानें भरलेल्या शब्दारण्यांतून सुद्धां बाणाची उच्चप्रतिभा तळपते, हें त्याचें काव्यश्रेष्ठत्व होय. पण गद्य लिहिण्याची तशी पद्धत ठरल्यानें जयराम कवीचा 'राधामाधवविलास'सुद्धा गद्यदृष्ट्या चमकत नाही. पण आख्यान कविताबद्ध असलें म्हणजे समासभूयसृस्त्व त्यांत येत नाही; किंबहुना महाभारत रामायणाची छाप अशा आख्यानांवर पडली असल्यानें असली पद्य आख्यानें सरळ प्रसादयुक्त अशींच बहुधा असतात आणि पुराणांची शामाठी अशुद्ध तऱ्हा बहुधा विद्वानांस मान्य होत नाही, यामुळें ही काव्यें पुराणांच्या धरतीवर जात नाहीत. **तात्पर्य**, हे जयरामाचं काव्य महाभारत रामायणाचे धरतीवर आहे. ठिकठिकाणीं लढाईचीं वर्णनेंही तशींच आहेत. शिवाजीमहाराज ज्या समारंभानें राजगडाहून निघाले, किंवा ज्या ऐश्वर्यानं त्यांनी देवीची पूजा केली, त्याचें वर्णन कवीनं विस्तारयुक्त केलें आहे. तें वाचतांना कर्णपर्वातील युधिष्ठिराच्या स्नानाची व संध्यापूजेची जी विस्तारपूर्वक वर्णनाची मौज सौतीने केली आहे, तिची आठवण येते. या शिवाय जागजागीं सहज सुचविणारे पण सुन्दर अलंकार अर्थाचे व शब्दांचे कवीनें योजिले आहेत, ते विस्ताराने दाखविणें नलगे. वाचकांनी जरूर वाचून पहावे. "कोण्डाजी रणपंडित: । स्वेन चण्डासिना तस्य मुण्डं कायादखण्यत'।।" इत्यादि सरळ शब्दालंकार किंवा "यत्रभूत' सूर्यवाहानां धावनाय क्षमाऽक्षमा ।।" 'तस्यां प्रधावितैर्नीतस्तद्धयै: कुत्रचिद्रवि: ।।" इत्यादि मौजेचे सरळ अर्थालंकार वाचकांच्या जागजागीं लक्षांत येतीलच.

*(म. सा. पत्रिका, मार्च १९२१, पृष्ठे १ ते १६)*

*

# पुस्तकपरीक्षण : सुशीलेचा देव

ले. श्री. वामन मल्हार जोशी

परीक्षण – प्रो. शंकर दामोदर पेंडसे, एम.ए. एम.ओ.एल., नागपूर

*[वामन मल्हार जोशी त्यांनी आपल्या कादंबरीलेखनातून इ. १९२० ते १९४० ह्या कालखंडाचे धार्मिक, सामाजिक, राजकीय विचारांवर भाष्य करून एक कालचरित्र उभे केले आहे. माणसाला परिपूर्ण आदर्श जीवन जगावेसे वाटते. धर्मविचार, समाजविचार आणि राजकीय विचार यातील अपूर्णता दूर कशी होईल ह्याचाच ध्यास समाज पुरुषाला सतत असतो. 'पूर्णत्व' ही 'काल्पनिक' संकल्पना असून माणूस प्रथमत: ती देवत्वात पाहतो. 'सुशिलेचा देव' ह्या कादंबरीत देव ह्या संकल्पनेची स्थित्यंतरे कशी झाली; ती सुशिलेच्या पात्रातून व्यक्त झाली आहेत. आभाळात दळणारा देव, दगडातील प्रतीकरूप देव, 'पती हाच परमेश्वर' तोही मातीचाच हे कळल्यावर 'ध्येय हाच देव', दूषित ध्येयाचा देव नको मग विश्वकल्याणात्मक देव! जीवनातील विविधांगी पूर्णत्वाकडे ओढले जाणारे मन, आपापल्या परीने संप्रदाय निर्माण करून पूर्णत्वाकडे नेणारी वाट शोधतात. आदर्श समाज आणि आदर्श राज्यव्यवस्था समुद्रापर्यंत पसरलेल्या राज्यांना एकराष्ट्र करून विश्वकुटुंबाचे उत्कट ध्येय गाठणे म्हणजेच परमेश्वरप्राप्ती मानणारा माणूस, 'स्व' आणि 'पर'च्या ओढाताणीत, त्रिशंकू व्यवस्थेत जगतो आहे. प्रबोधनयुगातील त्रिशंकू समाजाची चर्चा प्रो. वा. म. जोशी ह्यांच्या रागिणी, इंदू काळे, सरला भोळे, आश्रम हरिणी इ. कादंबऱ्यांमधून व्यक्त होते. ते एक महान समाजचिंतन आहे. हे सर्व विचार आजही चिंतनीय आहेत. शं. दा. पेंडसे ह्यांच्यासारख्या सांस्कृतिक भाष्यकाराने, ते अत्यंत सुबोधपणे केले आहे. –संपादक]*

सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय विद्वान श्री. वामन मल्हार जोशी यांच्या 'सुशीलेचा देव' या नवीन कादंबरीचे परीक्षण 'पत्रिके'त नुकतेच येऊन गेले. राजकीय, सामाजिक व धार्मिक बाबतीत जिवंत आणि प्रगमनशील विचारांचे जे थोडे विद्वान महाराष्ट्रात आहेत त्यामध्ये प्रो. वामनराव जोशी यांची गणना होते. 'रागिणी' कादंबरी लिहून मराठी वाङ्मयात तात्त्विक कादंबऱ्यांचा नवीन प्रकार निर्माण करण्याचा मान त्यांना मिळाला आहे व 'सुशीलेचा देव' ही तशाच प्रकारची नवी कादंबरी लिहून त्यांनी आपली परंपरा पुढे चालविली आहे. तात्त्विक, सामाजिक व राजकीय बाबतीत या देशातील तरुण स्त्री-पुरुषांच्या मनात आजच्या घटकेला जे विचार घोळत आहेत, त्यांचे प्रतिबिंब या कादंबरीत पडले किंवा पाडले असून ते कितपत स्पष्ट आहे याचे निरीक्षण या लेखात करावयाचे आहे.

सुशीलेच्या देवाची कल्पना लहानपणापासून हळूहळू जशी बदलत गेली, तशी मनुष्यजातीच्या बालपणापासून आतापर्यंत ईश्वराची कल्पना परिणत होत आली आहे. प्रस्तावनेत ग्रंथकार म्हणतात "ईश्वरविषयक कल्पनांचे बाबतीत कशी क्रांती झाली हे निरनिराळ्या प्रकरणांत दाखविले आहे. पण ही क्रांती नसून उत्क्रांती आहे, विकास आहे. वडिलांनी 'देवबाप्पा कर' असे सांगितल्यावर सुशील लहानपणी देवाला नमस्कार करी. कोणीही 'देवबाप्पा' म्हटले की, ती जशी कसरतीतल्या माकडाप्रमाणे देवबाप्पा करीत असे त्याचप्रमाणे मनुष्याच्या बाल्यावस्थेत परंपरेने

चालत आलेल्या ईश्वरविषयक कल्पना व उपासनेच्या पद्धती यांचा तो स्वीकार करीत असतो. त्या त्याला पटलेल्या असतात म्हणून नव्हे. सुशीला जरा मोठी झाल्यावर विचारते, "बाळू, देव म्हणजे आपल्या तात्यासारखा ना? त्याला आईसारखी बायको आहे का?" देवाची कल्पना मनुष्याने आपल्यावरूनच केली आहे. मनुष्यात नवरा-बायको असतात, म्हणून देवांनाही एक-एक बायको मनुष्याने कल्पिली आहे. मनुष्यात ज्याप्रमाणे कमी-जास्त सामर्थ्याचे लोक असतात त्याप्रमाणे देवातही कमी-जास्त सामर्थ्याचे देव असले पाहिजेत" ही कल्पना सुशीलेच्या देवांच्या कुस्तीवरून व्यक्त झाली आहे. नंतर या देवाला काहीतरी दृश्य स्वरूप असावे, अशी मनुष्याला इच्छा होते व पुढे त्या प्रतीकालाच देव समजून तो त्यांची पूजा करू लागतो. ही पुढची पायरी सुशीलेची दगडाच्या देवाची पूजा, त्याची बाळू-सुनंदाने केलेली चेष्टा, नंतर दगड म्हणजे देव नव्हे; असे वाटून तिला झालेले दुःख, वगैरे गोष्टींनी दर्शविली आहे. नंतर बाराव्या प्रकरणात अचलेश्वरीच्या डोंगरावरील सृष्टिसौंदर्याचे वर्णन करून व ही व्यवस्था व हे सौंदर्य निर्माण करणारा कोणीतरी ईश्वर असला पाहिजे काय? असा प्रश्न उत्पन्न करून "हा सर्व सृष्टीचा स्वभाव आहे" अशी ईश्वरवादातील पुढची पायरी दाखविली आहे. अव्यक्त ईश्वराची श्रद्धेने किंवा युक्तिवादानेही प्रतिष्ठा होऊ शकत नाही, असे जेव्हा मनुष्याला वाटते, तेव्हा तो सर्वश्रेष्ठ मनुष्यांनाच विभूती मानून त्यांचीच देव म्हणून पूजा करू लागतो, ही गोष्ट सुशीलेला तिचा पती हाच देव वाटला, या गोष्टीने दर्शविली आहे. या विभूतीच्या चरित्रांचे सूक्ष्म अवलोकन केले असता तेही आपल्यासारखेच मर्त्य व स्खलनशील होते; असे आढळून आले म्हणजे आपल्याच कल्पनेने निर्माण केलेल्या देवांना जलसमाधी देऊन देवांच्या ठिकाणी कल्पिलेल्या सद्गुणांनाच मनुष्य महत्त्व देऊ लागतो. पुढे हे सद्गुण म्हणजे स्वार्थाचीच दुसरी रूपे आहेत असे वाटले, म्हणजे त्यांचेही महत्त्व नाहीसे होते. अशा रीतीने श्रद्धा किंवा युक्तिवाद यांनी सिद्ध न होणारा देव मानण्यापेक्षा, मनुष्याने ध्येय हाच देव मानावा व ध्येयपूजा हीच ईश्वरपूजा समजावी अशी आजच्या घटकेची ईश्वरविषयक कल्पना, सदतिसाव्या प्रकरणात सुशीलेने आपल्या भाषणात व्यक्त केली आहे. खुद्द वामनरावांचे आजच्या घटकेचे ईश्वरविषयक विचारही असेच आहेत हे रत्नाकरातील (वर्ष २ अंक १०) "ध्येय हाच देव" या त्यांच्या लेखावरून स्पष्ट झाले आहे. उपनिषदांचे सूक्ष्म अवलोकन करूनही "पूर्णमिदं पूर्णमदः पूर्णात्पूर्णमुदच्यते" ही ईश्वर आणि सृष्टिविषयक पूर्णत्वाची कल्पना त्यांना पटलेली नाही. जगात दिसणारी अपूर्णता व विषमता पाहून "हे पूर्ण आहे" असे उपनिषदांनी म्हटले तरी ते त्यांना साहजिकच मान्य करवत नाही. ईश्वर आहे व तो नित्य आणि सनातन आहे, याबद्दल त्यांना संशय नाही; पण त्याच्या स्वरूपासंबंधीची कल्पना बदलत असते, असे त्यांचे मत असल्यामुळे, या बदलाचा इतिहास या कादंबरीत त्यांनी दिला असून, "ज्याने त्याने आपला प्रकृतिधर्म ओळखून आसक्तिरहित आणि अहंकार सोडून स्वकर्तव्य करीत राहावे; आणि सर्व भवितव्य भवितव्येवर सोपवावे हा गीतेचा संदेश खरोखरच सुंदर आहे, आणि त्याचप्रमाणेच वागले पाहिजे" असा निष्कर्ष शेवटी त्यांनी काढला आहे. पण अमुक एक गोष्ट ही मनुष्याचे कर्तव्य आहे व अमुक एक गोष्ट ही कर्तव्य नाही, हे ठरविण्याचे गमक काय? मनुष्याने आपल्यापुढे अमुक एक ध्येय ठेवणे अवश्य आहे, असा निश्चय झाल्याशिवाय कर्तव्य किंवा अकर्तव्य ठरविता येत नाही. ज्याने त्याने आपल्याला वाटेल ते ध्येय आपल्यासमोर ठेवावे व त्यालाच देव मानावे, हे मत त्यातील अनिश्चिततेमुळे मान्य होण्यासारखे नाही. ध्येयाचे स्वरूप जोपर्यंत निश्चित ठरत नाही; तोपर्यंत वाटेल ते ध्येय देवस्वरूपाला पोचेल की काय असा प्रश्न आहे. ध्येय ही ध्यान करण्याला योग्य अशी वस्तू पाहिजे आणि अमुक एक गोष्ट ही ध्यान करण्याजोगी हे निश्चित ठरले पाहिजे. इतर अनेक गोष्टींप्रमाणे देवाच्या कल्पनेतही विकास होत आला असेल, पण उपनिषदात या कल्पनेची जी परिणति झाली आहे, ती ग्रंथकारांना का पटली नाही, याची समाधानकारक

कारणे कादंबरीत दिलेली नाहीत. उपनिषदांमध्ये वर्णिलेला देव सगुण किंवा निर्गुण कसाही मानला तरी तो 'पूर्ण आहे'; किंवा ही पूर्णताच दुसऱ्या शब्दात सांगावयाची म्हणजे तो "सच्चिदानंदात्मक किंवा सर्व सद्गुणांची ज्याच्यामध्ये पराकाष्ठा झाली आहे अशा प्रकारचा आहे" आणि असा पूर्ण देव हाच प्रत्येक जीवाचा ध्येय असला पाहिजे, एवढेच नव्हे तर त्याचे ज्ञान, त्याचा साक्षात्कारही त्याने करून घेतला पाहिजे (ध्येतव्योज्ञेयश्च) असे उपनिषदांचे सांगणे आहे. पूर्ण होण्याचे हे ध्येय पुढे ठेवूनच मनुष्याने या ध्येयाला पोषक असे आपले कर्तव्यकर्म ठरविले पाहिजे. या कर्तव्यकर्माचे स्वरूपही असे पाहिजे की, त्याच्या योगाने आपली अपूर्णता घालवीत घालवीत मनुष्याने पूर्ण व्हावे. जीवाचे स्वरूप मूळचेच अपूर्ण आहे, की तो मूळचा पूर्ण असून काही कारणाने लुप्त झालेली ही पूर्णता परिश्रमाने त्याला अभिव्यक्त करावयाची आहे. हा तात्त्विक प्रश्न बाजूला ठेवला; तरी जीवाच्या 'पूर्णत्वा'च्या ध्येयासंबंधाने उपनिषदांनी प्रकट केलेले विचार, उपनिषदांचा सहृदयतेने अभ्यास केल्यामुळे वामनरावजींना पटावे, अशी अपेक्षा कोणीही करील, पण या कादंबरीत शेवटी सांगितलेला 'ध्येय हा जो ईश्वर' त्याच्या स्वरूपाच्यासंबंधाने अनिश्चितपणा हा मोठाच दोष राहून गेला आहे. 'व्यक्ती तितक्या प्रकृती' या न्यायाने व्यक्तिगणिक ध्येये भिन्न होतील, या आक्षेपाला उत्तर देता न आल्यामुळे सुशीलेने 'तेहतीस कोटी लोकांच्या हिंदुस्थानात तेहतीस कोटी देव आहेतच' अशी कोटी करून वेळ मारून नेली आहे. देवाची कल्पना खोडून टाकण्याकरिता तिने जसा युक्तिवाद केला आहे, तसा युक्तिवाद देवकल्पना सिद्ध करण्याकरताही करता येईल; कारण युक्तिवाद दोन्ही पक्षी करता येतो. सर्व दृष्टीने पूर्ण असेलाल देव शब्द आवडत नसल्यास दगड म्हणा किंवा वस्तू म्हणा किंवा ब्रह्म म्हणा– जर अस्तित्वात नसेल तर मनुष्यमात्रास, सर्व तऱ्हेची पूर्णता संपादन करण्याची जी एकसारखी ओढ लागली आहे; ती निराधार होईल. मनुष्य श्रीमंत असो गरीब असो, आहे त्या स्थितीत असमाधान व त्यापेक्षाही श्रेष्ठ स्थिती संपादन करण्याची धडपड त्याच्या ठिकाणी दृष्टीस पडते. मिळत आहे त्यापेक्षा जास्त सुख मिळाले; अशी तळमळ त्याला एकसारखी लागलेली असते. त्याच्या अनुभवाला येणाऱ्या अंशमात्र सुखाने त्याचे समाधान होत नाही. अशा स्थितीत अनुभवाला येणारे सुख ज्या सुखाचे अंशमात्र आहे असे परिपूर्ण सुख कोठे तरी असलेच पाहिजे. 'आनन्दं ब्रह्म' या औपनिषद वाक्यात हीच कल्पना व्यक्त झाली आहे. शांतीची, समाधानाची, सात्त्विकतेची, आनंदाची ज्या ठिकाणी पराकाष्ठा – पूर्णता – झाली आहे असे काही तरी स्वरूप, अशी काही तरी वस्तू – तिला वाटेल ते नाव द्या – असल्याशिवाय मनुष्याच्या धडपडीची, तळमळीची, असमाधानाची नीट संगतीच लागत नाही. हा देव, हे 'पूर्णब्रह्म', युक्तिवादाचा किंवा अनुमानाचा विषय होऊ शकते, पण हे अनुमान प्रत्यक्षाशी विसंगत असता कामा नये. या देवाचे सच्चिदानंद' असे वर्णन तरी मनुष्याने आपल्या अनुभवानेच केले आहे. मनुष्याला आपण आहो व नेहमी असावे, अशी अमरत्वाची इच्छा असल्यामुळे देव सत् व त्रिकालाबाधित आहे. मनुष्य हा चेतन व ज्ञानसंपन्न असल्यामुळे देवही चिदात्मक आहे. मनुष्याला अखंड सुखाची तळमळ लागली असल्यामुळे देवाचे स्वरूपही आनंदात्मक आहे. सत्त्वाचा, चैतन्याचा व आनंदाचा अंशमात्र अनुभव मनुष्याला आला असल्यामुळे हा अंश ज्या पूर्णाचा भाग आहे, अशा सच्चिदानंदात्मक पूर्ण ब्रह्माची किंवा देवाची मनुष्याला कल्पना यावी व हे पूर्णतेचे ध्येय त्याने आपणासमोर ठेवावे हे क्रमप्राप्तच आहे. सर्वसद्गुणसंपन्नता किंवा निर्गुणता हे एकाच वस्तुस्थितीचे अपर पर्याय आहेत. सत्-असत्, चित्-अचित्, सुखदुःख ही शब्दद्वंद्वे परस्परसापेक्षा आहेत. ज्या ठिकाणी अंधकाराची कधीच प्राप्ती नाही, त्या ठिकाणी प्रकाश या शब्दाचाही संभव नाही. पूर्ण ब्रह्माची शब्दांनी कल्पना द्यावयाची म्हणजे शब्दद्वंद्वांचा उपयोग केल्याशिवाय गत्यंतर नसते. त्या ठिकाणी असत्तेचा, जडतेचा, दुःखाचा कधी संभवच नाही त्याला सत-चित-आनंदात्मक म्हणण्यातही काही तात्पर्य नाही;

पण असत्ता, जडता, दु:ख यांचा निरास करण्याकरता या सच्चिदानंद शब्दांचा उपयोग केला जातो. अंधाराच्या अपेक्षेने प्रकाश शब्दाचा उपयोग होतो. पूर्ण ब्रह्माला अनिर्वचनीय व निर्गुण म्हणण्याचे कारण हेच. त्याला सर्वसद्‌गुणसंपन्न म्हटले; तरीही अर्थ तोच. सर्व सत्पुरुषांचा अनुभव एकच असला तरी तो व्यक्त करणे भाषेच्याच स्वाधीन पडत असल्यामुळे व एकच भाग अनेक तऱ्हांनी व्यक्त झाल्यामुळे जगामध्ये आजपर्यंत मतभेद आणि पंथभेद अपरिहार्यपणे होत आले आहेत. स्वार्थ आणि परार्थ हे शब्दद्वंद्वही असेच 'स्व' आणि 'पर' शब्दांचा आपण जसा कमीजास्त व्यापक अर्थ करू त्यावर अवलंबून आहे. 'पर' ही ज्यात सामावून जाईल इतकी 'स्व' शब्दाचा व्यापक अर्थ आपण केला तर सर्वच स्वार्थ होईल. परार्थ वेगळा उरणारच नाही. पण या स्वार्थात व 'स्व' शब्दाचा व्यक्तीपुरता मर्यादित अर्थ केला असता उत्पन्न होणाऱ्या स्वार्थात जमीनअस्मानाचा फरक आहे. शब्द तोच पण अर्थभिन्नता जशी सापेक्षतेमुळे उत्पन्न होते, त्याप्रमाणे शब्द भिन्न असले तरी अर्थैक्यही सापेक्षतेमुळे निर्माण होते. ही अपेक्षा कालत: दूर असलेल्या लोकांच्या लक्षात येत नाही आणि मग एकाच शब्दाचे किंवा वाक्याचे अनंत अर्थ व त्यावर अनंत संप्रदाय निर्माण होतात. याच दृष्टीने या कादंबरीत पान २४४-४५ वर 'सर्वव्यापी, सर्वशक्तिमान, सर्वज्ञ, अज्ञेय, अचिंत्य' वगैरे शब्दांचे विशिष्ट अर्थ कल्पून देवकल्पना खोडून काढण्याचा सुशीलेने जो प्रयत्न केला आहे व जे संशय प्रकट केले आहेत ते निरर्थक भासतात. कर्मवादाचा आश्रय करून ईश्वरावरील वैषम्यनैर्घृण्याचा आक्षेप व्यासांनी पूर्वीच दूर केला आहे. तेव्हा या शब्दांच्या पलीकडे जाऊन शब्दच्छल करीत न बसता, शब्दांचा आग्रह सोडून देऊन शब्दांनी जी वस्तू दाखवावयाची आहे त्या वस्तूकडेच लक्ष देऊन 'जी पूर्णता प्राप्त झाली असता 'भिद्यते हृदयग्रन्थि: छिद्यंते सर्वसंशय:'' अशी स्थिती प्राप्त होते. ते पूर्णत्व प्राप्त करून घेण्याचे ध्येय प्रत्येकाने आपल्यासमोर ठेवून त्या धोरणाने आपले कर्तव्यकर्म ठरविले पाहिजे'' असा निश्चित उपदेश ग्रंथकारांनी केला असता; तर हे पूर्णतेचे ध्येय म्हणजेच ईश्वर असे यथार्थ रीतीने म्हणता आले असते. अर्थात उपनिषदांपेक्षा आपण काही नवीन सांगितले असे म्हणता आले नसते हे खरे; पण नावीन्यापेक्षा सत्याचा आग्रह धरणे व त्यापुढे व्यक्तित्व विसरून जाणे अवश्य नाही काय? वाटेल ते ध्येय पुढे ठेवले तर कसा अध:पात होतो, हे ग्रंथकारांनीच रावबाच्या उदाहरणावरून चांगल्या रीतीने दाखविले आहे. भौतिक-वैषयिक सुख हे रावबाचे ध्येय होते. त्यामुळे झालेले दुष्परिणाम व त्याबरोबर श्रद्धेची व विश्वासाची आवश्यकता 'सुखवादाचे परिणाम' या प्रकरणात ग्रंथकाराने दिग्दर्शित केली आहे. रावबा म्हणतो, ''सुखाशिवाय मला साध्य नाही. भौतिक-शास्त्रांच्या नियमांशिवाय मला नियमन नाही. वस्तूंच्या गुणधर्माव्यतिरिक्त मी धर्म जाणत नाही. मला धर्म, नीती, सद्‌गुण नको आहेत का? पण माझा त्यांच्यावर आता विश्वासच बसत नाही. तुझा विश्वास आहे फार चांगले आहे. मला तुझा हेवा वाटतो आणि असे मनात येते की, तुझे पाय धरावेत आणि तुला गुरू करावे'' पृ. १२६. लहानपणापासून अश्रद्धेवर, जीवनकलहाच्या तत्त्वावर आणि भौतिक शास्त्रावर वाढलेल्या रावबाचे वरील उद्‌गार वाचले म्हणजे तो सर्व दृष्टींनी पतित झाला याबद्दल आश्चर्य वाटत नाही. पावित्र्यादी सर्व सद्‌गुण ज्या ठिकाणी पूर्णतेला गेले आहेत, असा ईश्वर आपला ध्येय करावा असा निश्चय नाही. ब ''हे पूर्णत्व आम्ही प्राप्त करून घेतले आहे. या पूर्णब्रह्माचा साक्षात्कार झाल्यामुळे आमचे सर्व संशय नाहीसे होऊन, सर्व कोडी उलगडून, निरतिशय आनंदाची प्राप्ती आम्हांला झाली आहे. आम्ही आलो त्या मार्गाने तुम्हीही या म्हणजे तुम्हालाही त्या पूर्णत्वाचा साक्षात्कार होईल'' असे सांगणाऱ्या थोर पुरुषांवर विश्वास नाही. अशा स्थितीत श्रद्धेच्या व निश्चयाच्या अभावी मनुष्याचे जीवित फुकट गेले व केवळ भौतिक सुखवादाने त्याचा शारीरिकदृष्ट्या अध:पात झाला तर त्यात आश्चर्य कसले?

ध्येयाचे स्वरूप निश्चित न करिता व्यक्तिगणिक भिन्न ध्येये असली तरी चालतील; या मताचा पुरस्कार

ग्रंथकारांनी केला असला तरी प्रत्यक्ष उदाहरणे देताना केवळ सुखवादाचे दुष्परिणाम दाखवून व सुशीला, सुनंदा व बळवंतराव यांजपुढे विश्वकुटुंबवादाचे, नराचे नारायण करण्याचे व जगात सद्गुणाची समृद्धी करून सत्ययुग अवतरविण्याचे ध्येय ठेवून, अप्रत्यक्ष रीतीने का होईना, पूर्णत्वाच्या ध्येयाचे ग्रंथकारांनी समर्थन केले आहे, ही त्यातल्या त्यात समाधानाची गोष्ट होय. ईश्वरस्वरूपाविषयीच्या जुन्या कल्पना खोडून काहीतरी नवीन सांगण्याचा प्रयत्न करणारे विद्वानसुद्धा शेवटी पूर्णत्वाच्या ध्येयाकडेच वळतात तेव्हा 'अजर, अमर, अनादी, अनंत, सच्चिदानंदात्मक निर्गुण, निराकार'' इत्यादी विशेषणे देऊन उपनिषदांनी दर्शवलेले ईश्वराचे पूर्ण स्वरूपाच, (पूर्णमद:) शेवटी खरे ठरत नाही काय? या पूर्ण स्वरूपाचे ज्ञान झाले म्हणजे 'पूर्णमिदं'' – ही सृष्टीही पूर्ण आहे, व्यवस्थित आहे येथे दिसणारी अपूर्णता ज्याअर्थी काढून टाकणे शक्य आहे; त्या अर्थी तिचे मूळस्वरूप पूर्णच असले पाहिजे व हिचे पूर्ण रूप व ईश्वराचे पूर्णरूप यात काही भेद नाही असेही ज्ञान होणे संभवनीय नाही काय? पूर्ण ईश्वर जर या सृष्टीचे आदिकारण आहे व कारणाचे गुण कार्यामध्ये ज्याअर्थी आलेच पाहिजेत त्याअर्थी ही जीवसहित सृष्टी पूर्णच आहे, प्रयत्न करा म्हणजे या जीव-सृष्टीमधील पूर्णता अभिव्यक्त होईल, असे फार मोठे तत्त्व व आशावादित्व ''पूर्णमिदं पूर्णमदः पूर्णात् पूर्णमुदच्यते'' या औपनिषद सिद्धांतात साठविले आहे. मग जुन्यापुराण्या उपनिषदांपेक्षा काही वेगळे सांगण्याचा आग्रह किंवा हौस असल्यास गोष्ट निराळी. काही काही वेगळे सांगण्याचा प्रयत्न करू लागले म्हणजे शाब्दिक बदलाशिवाय हाती काही लागत नाही, ही गोष्ट मात्र वरील उदाहरणावरून स्पष्ट झाली आहे.

सुशीला ज्याप्रमाणे तात्त्विक बाबतीत आजच्या घटकेचे विचार सांगणारी आहे. त्याचप्रमाणे सामाजिक बाबतीतही, तरुण स्त्री-पुरुषांच्या डोक्यात आजच्या घटकेला घोळणारे विचार ती बोलत असून ती पूर्ण स्वतंत्र किंबहुना अनिर्बंध आहेत असे म्हटले तरी चालेल. दुर्दैवाची गोष्ट अशी की, तात्त्विक बाबींचा विचार करताना ज्या सुखवादाचे दुष्परिणाम ग्रंथकारांनी दाखविले आहेत, त्याच सुखवादावर सुशीलेचे हे सर्व प्रगत सामाजिक विचार उभारलेले असून त्यांची दुसरी बाजू ग्रंथकारांनी दाखविली नाही. तेव्हा हेच विचार त्यांनाही अभिमत आहेत की काय अशी शंका येते. कदाचित हे विचार त्यांचे नसून आजच्या सुशिक्षित स्त्रियांचेही असतील. कारण मागच्या पिढीतील समाज-सुधारकांच्या स्वप्नातही आले नसतील असे विचार आजच्या सुशिक्षित स्त्रिया करीत असून त्यातील कित्येक धाडशी स्त्रियांनी ते आचरणातही आणले आहेत. मागच्या पिढीतील सुधारक स्त्री-पुरुषसंबंधात पुढील तीन गोष्टींचा प्रामुख्याने पुरस्कार करीत : (१) जरठ-कुमारी विवाह होऊ नयेत, (२) पुनर्विवाह करण्याला हरकत नसावी, (३) बहुपत्नीकत्वाची चाल मोडून टाकावी. पण ज्या या सुधारणा घडून याव्यात, म्हणून सुधारकांनी आकाशपाताळ एक केले, त्याच सुधारणा त्यांच्या पुढील पिढीतील कित्येक सुशिक्षित व स्वतंत्र स्त्रियांनी पायाखाली तुडवून टाकलेल्या पाहून वृद्ध समाजसुधारक थक्क होऊन गेले असतील. पैशाच्या व मानाच्या लोभाने अनेक सुशिक्षित व पदवीधर स्त्रियांनी जरठांच्या गळ्यात आपण होऊन माळा घातल्या. कित्येकींनी प्रेमाच्या अधीन होऊन पूर्वीची पत्नी जिवंत असलेल्या पुरुषांशी विवाह केले व आपले स्वातंत्र्य नाहीसे होते, म्हणून विधवांनी पुनर्विवाहाच्या सवलतीचा फायदा घेण्याचे नाकारले; आणि आता तर या सर्वांच्या मुळाशी असलेला जो विवाह त्याचीच आवश्यकता नाही, विवाहाशिवाय तरुण स्त्री-पुरुषांनी एकत्र अशनशयनादी व्यवहार करण्यास काय हरकत आहे, असा प्रश्न विचारला जात आहे. आमच्या प्रचलित विवाहसंस्थेत स्त्रियांना कोणतेही अधिकार नसल्यामुळे तरुण स्त्रियांची मने या संस्थेविरुद्ध बिथरून गेली तर त्याची संगती लावता येईल; पण तरुण पुरुषांना अशी काहीच अडचण नसताना, त्यांनीही वैवाहिक मतात स्त्रियांच्या वरील मताचीच साथ करू लागावे, याची संगती नीट लागणे कठीण आहे. सुधारणेची एकाच पिढीत झालेली ही विमान दौड पाहून आपल्या मंदवुद्धित्वाबद्दल

मागच्या पिढीतील समाजसुधारक खचित खजील होऊन जातील. ते काही निर्बंध तोडावयास गेले; पण त्याबरोबरच विवाह करावा व तो तरुण स्त्री-पुरुषांतच व्हावा असे काही निर्बंध त्यांनी ठेवले होते. पण हे निर्बंधही झुगारून देण्यास नवी पिढी प्रवृत्त झाली आहे; एवढेच नव्हे तर तरुण स्त्री-पुरुषांनी विवाहबद्ध झाल्यानंतर जन्मभर एके ठिकाणी जखडून का बसावे असे आजची सुशीला विचारीत आहे. "बायकांनी दहादा लग्ने केली तरी त्यात वाईट काय झालं? पुरुषांनी अनेक पुनर्विवाह केले तर त्यांना तुम्ही व्यभिचार म्हणत नाहीना? मग बायकांनाच निराळा न्याय का? विवाह कितवा आहे हे न पाहता तो ज्या स्त्री-पुरुषांमध्ये होतो त्यांचं एकमेकांवर प्रेम आहे की नाही ते पाहावं (पान १५५-५६). आपल्या चालीरीती, आपले विचार, आपला धर्म, सर्व काही 'रॉटन' झाले आहे. सगळे कुजलेले आहे. पार सगळी ही घाण काढली पाहिजे" (१५८). पतिपत्नीचे परस्परांतील प्रेम नाहीसे झाल्यावर त्यांचा होणारा संबंध म्हणजे अगम्यगमन आहे (२४९). असे आजच्या सुशीलांचे विचार आहेत. गेल्या २५ वर्षांत झालेल्या या प्रगतीचा वेग लक्षात घेता यानंतरच्या २५ वर्षांनी येणाऱ्या सुशीलांचे विचार व आचार कसे असतील याची इतर खंडांतील अनुभवांवरून नीट कल्पना करता येते. इतिहासाची पुनरावृत्ती होत असते; असे म्हणतात. वेदपूर्वकाली स्त्रीसत्ताप्रधान समाजव्यवस्था होती. सर्व बाबतीत स्त्रियाच पुढाकार घेत. वेदोत्तर कालापासून आत्तापर्यंत पुरुषसत्ताप्रधान अशी समाजव्यवस्था आहे. या व्यवस्थेत स्त्रियांवरील जुलमाची परमावधी झाल्यामुळे, त्यांनी प्रचलित व्यवस्थेविरुद्ध बंड पुकारले तर त्यात काही आश्चर्य नाही. आजच्या तरुण मुलींची अनिर्बंध स्वातंत्र्यलालसा व आजच्या तरुण मुलांचे स्त्रीविषयक धोरण पाहिले म्हणजे जग पुन्हा स्त्रीसत्ताप्रधान समाजव्यवस्थेकडे चालले आहे की काय; असे काही विनोदाने व काही गंभीरतेने विचारता येईल.

विवाह होण्याला व तो कायम टिकण्याला आवश्यक असलेल्या प्रेमाची व विवाह-संस्थेच्या उद्देशाची ग्रंथकारांनी जास्त चिकित्सा करावयास पाहिजे होती. वैषयिक सुखाच्या वासनेमुळे स्त्री-पुरुषात उत्पन्न होणारे आकर्षण, एवढीच प्रेमाची व्याख्या ग्रंथकारांना अभिप्रेत असेल तर त्यावर उभारलेली कुटुंब संस्थेची इमारत चिरस्थायी कधीही होणार नाही. कारण अशा तऱ्हेचे प्रेम अत्यंत चंचल असते. या प्रेमामुळे दोन तास, महिने किंवा वर्षे टिकलेल्या स्त्री-पुरुषसंबंधाला विवाह म्हणणे म्हणजे त्या शब्दाची चेष्टा करण्यासारखेच आहे. विवाह ही संस्था चंचल वैषयिक प्रेमावर उभारली नसून उच्चतर व ज्यामध्ये स्वार्थाचा अंश अत्यंत अल्प आहे अशा प्रेमावर उभारली असल्यामुळेच धार्मिक गणली जाते. अ आणि इ यांच्यापासून होणाऱ्या उ ची व्यवस्था लावावी, म्हणूनच केवळ विवाहसंस्था अस्तित्वात आली नाही; तर अ आणि इ यांचा अध:पात होऊ नये, त्यांचे आत्मिक कल्याण व्हावे, म्हणून त्यांच्या अनिर्बंध वैषयिक वासनांवर निर्बंध घालण्याकरता विवाह-संस्था अस्तित्वात आली आहे. कारण ही संस्था अस्तित्वात येण्यापूर्वी वाटेल त्या स्त्रीला वाटेल त्या पुरुषाशी व्यवहार करण्याला परवानगी होती. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे स्त्रिया व पुरुष यांना आपल्या आयुष्यात वाटतील तितकी व वाटेल तितक्या लहान-मोठ्या कालावधीची लग्ने करण्याची पूर्वी मोकळीक असे. यामुळे अनर्थ होऊ लागल्यामुळे या स्वैराचाराचे नियमन करणे हा विवाहसंस्थेचा उद्देश आहे. हा उद्देश हाणून पाडण्याचे प्रयत्न सध्या सुरू आहेत. स्त्रियांना पुरुषांइतकेच अधिकार धार्मिक, सामाजिक, राजकीय व आर्थिक बाबतीत दिले पाहिजेत यात वाद नाही. "बायका म्हणजे पुरुषांची खाजगी मालमत्ता, अंगठीप्रमाणे किंवा घड्याळ्याच्या साखळीप्रमाणे पाहिजे तशी हातात घेऊन पाहावयाची वस्तू" ही स्थिती नि:संशय बदलली पाहिजे. पण स्त्री व पुरुष या दोघांच्याही स्वातंत्र्याला, त्यांच्या व समाजाच्या आत्मिक कल्याणाकडे लक्ष देऊन काही मर्यादा घातल्या पाहिजेत. अर्थात असे करताना प्रेम व सुख यांच्या केवळ भौतिक कल्पना तेवढ्या लक्षात घेऊन चालणार नाही. खुद्द सुशीलेलाही 'स्त्री-पुरुषांची ऐहिक उन्नती आणि पारमार्थिक कल्याण

याकरता विवाह आहे; ही गोष्ट मान्य आहे. एवढेच नव्हे तर 'प्रेम म्हणजे बहुधा व बहुतांशी खूळ आहे' असेही तिने आत्मचरित्रात म्हटले आहे. असे असून 'विवाह कितीही होवोत प्रेम आहे की नाही हा मुख्य प्रश्न आहे' असे म्हणून 'प्रेमस्वातंत्र्याचा' व त्याकरता होणाऱ्या अनेक विवाहांचा तिने पुरस्कार करावा, ही गोष्ट अत्यंत विसंगत दिसते. सभेत विचारलेल्या प्रश्नांना उत्तरे देताना तरी, विवाहाचे नि:श्रेयस हेही एक ध्येय आहे; ही गोष्ट ती विसरली असावी, असे तिच्या उत्तरावरून वाटते. ग्रंथकारांनी ही विसंगती टाळली असती, भौतिक सुखवादावर उभारलेल्या वैवाहिक स्वातंत्र्याचे दुष्परिणाम दाखवून दिले असते व प्रेम आणि सुख यांच्या उच्चतर कल्पना विशद केल्या असत्या तर आजच्या अनेक तरुण मुलांमुलींची समजूत पडून, त्यांच्या शरीराचे व मनाचे मातेरे होण्याचा संभव कमी झाला असता. दु:खात सुख एवढेच की सुशीलेची मते कशीही असली तरी आरंभापासून अखेरपर्यंतचे तिचे वर्तन तिच्या नावाला साजणारे असेच आहे; मग ग्रंथकारांनी लिहिल्याप्रमाणे तिच्याविषयी लोकापवाद कितीही असोत.

सुशीलेच्या आत्मचरित्रात स्त्रीस्वभावनिदर्शक अशा एक दोन मजेदार गोष्टी दिल्या आहेत. बाराव्या प्रकरणात बाळू व सुनंदा यांच्या संवादावर दिलेल्या टीपेत सुशीला म्हणते :– "माझ्या मनात प्रेम आहे असे आतापर्यंतच्या माझ्या आयुष्यात तीन-चार पुरुषांना तरी वाटले आहे; आणि माझ्या मनात तर त्यांच्याविषयी प्रेम केव्हाही नव्हते. माझ्या काही मैत्रिणींचा असाच अनुभव आहे. पुरुषांना असे का वाटते कोणास ठाऊक?" तिच्या पतीला तिचे आपल्यावर प्रेम आहे असे वाटे; पण हे प्रेम फार पुढे जडले. ते इतके की, तिला पती हा देवच वाटू लागला. नंतर पतीही मातीच असे आढळून येऊन त्याच्याशी ती भांडली, कठोर बोलली व काही दिवस तर दूरही राहिली; पण तिचे प्रेम अगदी नाहीसे असे कधीच झाले नाही. पुढे काफचे तिच्यावर प्रेम जडले व तो प्रेमवेडा झाला हे पाहून "तिला थोडे दु:ख वाटले

आपण अनेकांचे मन आकर्षण करून घेतो ही जाणीव सुखवीत व खुलवीत नसेल?" पण ही टीप ग्रंथकाराची आहे सुशीलेची नाही. सुशीलेसारख्या तरुण स्त्रियांना आपल्याकडे अनेक तरुण आकर्षिले जातात यावद्दल आनंद व अभिमान खरोखरच वाटतो की काय हे सुशीलेच्या टीपेवरून जास्त स्पष्ट झाले असते. सुशीला ही ग्रंथकाराच्या कल्पनासृष्टीहून भिन्न अशी एखादी व्यक्ती असेलच असे सांगता येत नाही; पण प्रत्यक्ष ग्रंथकाराने एखादी गोष्ट सांगणे व ती एखाद्या स्त्रीकडून वदविणे यात थोडासा फरक पडतोच.

मुलामुलींच्या एकत्र शिक्षणासंबंधी ग्रंथकाराने निश्चितमतप्रदर्शन केले नाही. 'क्राइस्ट क्रॉस स्कूल'मध्ये मुलांमुलींच्या एकत्र शिक्षणापासून वाईट परिणाम होतील असे सुशीलेला प्रथम वाटले. पण अनुभवान्ती तिचे मन (मत?) बदलल्याचे दाखविले आहे. पुढे स्वत: तिनेच जेव्हा शाळा काढली तेव्हा "माध्यमिक शाळेतील एक-दोन मुलग्यांनी एक-दोन मुलींना पत्रे वगैरे लिहून थोडेसे अयोग्य वर्तन केले होते; आणि हे कबूल केले पाहिजे की, एकत्र शिक्षणाने मुलग्यांवर व मुलींवर कुपरिणाम झाले होते असे चालकांचेच नव्हे; तर सर्वसामान्य जनतेचेही मत झाले होते." (२४२) येथे ग्रंथकारांना कुपरिणाम झाले होते असे म्हणावयाचे आहे की सुपरिणाम झाले होते असे म्हणावयाचे आहे; ते कळत नाही.

काफने आत्महत्या करण्यापूर्वी सुशीलेचा हात आपल्या हातात घेतला, या प्रसंगाला अनुलक्षून, स्त्रीपुरुषांचे परस्पर वर्तन कसे असावे; या प्रश्नासंबंधी सुशीला, सुनंदराव व बळवंतराव यांच्यामध्ये पूर्वपक्ष उत्तरपक्ष झाले आहेत. "कोणत्याही स्त्रीने परपुरुषांशी अति सलगी करू नये आणि सुशीलेसारख्याच मुली जर एकांतात परपुरुषांशी सलगी करू लागल्या तर सौजन्याची आशाच करावयास नको" असे बळवंतरावाचे म्हणणे होते. उलट सुशीलेचे म्हणणे अशा अर्थाचे होते की, "पुरुषांना बायका म्हणजे खाजगी मालमत्ता वाटते. बायकोला स्वतंत्र अस्तित्व आहे, जीवित आहे, तिच्या आवडीनिवडी आहेत, याची पुरुषांना

लोक स्त्रियांनी परपुरुषांशी एकांतात सलगी करू नये असे म्हणतात, ते मत्सराने तसे म्हणतात, त्यांचा त्यात स्वार्थी हेतू असतो." हेतूंचा आरोप केल्यावर बळवंतरावांनी बोलणे थांबविण्याची सूचना जेव्हा केली तेव्हा जरा ताळ्यावर येऊन, सुशीलेने आपले म्हणणे बहुतेक मागे घेऊन, कमीअधिक शब्द गेल्याबद्दल क्षमा मागितली; उलट तिच्याबद्दल शंका घेतली हा मोठा अपराध झाला असे बळवंतरावानेही कबूल केले व नंतरच्या तात्त्विक वादविवादाचा सर्वसंमत निष्कर्ष असा निघाला की, काही अत्यंत अपवादात्मक प्रसंग सोडून स्त्रीने पुरुषाशी एकांतात सलगी करणे वाईट आहे. कारण अशा परिस्थितीत मोह होणे संभवनीय असते. "सर्वच 'अ' आणि 'इ' अशा परिस्थितीत पापाचरण करतात असे नव्हे. सामान्यत: करतात असेही नव्हे, तर अपवादात्मक 'अ' आणि 'इ' सोडून दिली असता सामान्य अ–ई ना मोह होण्याचा संभव असतो; हे हजारो वर्षांच्या अनुभवावरून समाजाने ओळखूनच स्त्री-पुरुषांच्या व्यवहाराच्या बाबतीत त्याने काही दूरदृष्टीचे व धूर्तपणाचे निर्बंध घालून ठेविले असते. सगळ्याचा तात्पर्यार्थ हा की, मोहानुकूल परिस्थिती होताहोईतो उत्पन्नच होऊ नये.

यापूर्वी सुशीलेचे रावबाशी लग्न झाल्यानंतर लोकव्यवहाराला अनुसरून सुनन्दराव व बळवंतराव यांच्याशी ती जेव्हा परक्यासारखी वागू लागली, तेव्हाचे ग्रंथकारांनी केलेले वर्णन त्यांच्या सूक्ष्म निरीक्षणाचे व सहृदयतेचे निदर्शक असून, चटका लावणारे आहे. सुशीला लिहिते :– "एके काळी मनाने अगदी एक असून आता आम्ही परकी होऊ लागलो. मला याचे वाईट वाटे, पण इलाज नव्हता. त्यावेळी काही वर्षे जो परकीपरकीपणा आमच्यामध्ये आला, त्याच्यामुळे मनाची जी ओढाताण व्हावयाची आणि वागणे जे विसंगत रीतीचे–कधी प्रेमाचे तर कधी अनास्थेचे, कधी सलगीचे, तर कधी तुटकपणाचे– व्हायचे, त्याची कल्पनाच वाचकांनी करावी. एकदा ज्याच्याशी अगदी जवळच्या नात्याने वागलो; त्याच्याशी लांबच्या नात्याप्रमाणे वागावे लागणे हे हृदयाला फारच जाचक होते. पण असले प्रसंग या संसारात येतात म्हणूनच तो पुष्कळ वेळा कष्टप्रद होतो." (९८-९९)

लग्नानंतर सुशीलेची मते रावबासारखी होऊ लागली व रावबाची मते सुशीलेसारखी होऊ लागली याचे वर्णन, एक रोमन कॅथलिक गृहस्थ व एक प्रोटेस्टंट गृहस्थ वाद करू लागले व शेवटी रोमन कॅथलिक प्रोटेस्टंट झाला आणि प्रोटेस्टंट होता तो रोमन कॅथलिक झाला असा दृष्टान्त देऊन केले आहे तेही मनोरंजक झाले आहे.

"चांगल्या स्त्रियांनी जर अनुरूप वराशी पुनर्विवाह करण्याचे टाळले तर 'पुनर्विवाह' करणाऱ्या त्या वाईट असा अर्थ होणार नाही काय?" असा प्रश्न सुशीलेला विचारून सामाजिक सुधारणेच्या बाबतीत "धैर्याने आपल्या मताप्रमाणे चालल्यास व विचाराला पटतील अशी नीतिबंधने पाळल्यास, लोक आपली योग्यता कालांतराने ओळखणार नाहीत असे नाही." हा सुनन्दरावाने काढलेला निष्कर्षही योग्य असाच आहे.

तात्त्विक व सामाजिक विचारांप्रमाणेच गेल्या २५-३० वर्षांत महाराष्ट्रात राजकीय मतांचा विकास कसा झाला ते ग्रंथकारांनी अनेक प्रकरणातून दाखविले आहे. "मवाळ, जहाल, ज्वलजहाल" या प्रकरणात महाराष्ट्रातील १९०७-०८ सालच्या राजकारणाचे वर्णन केले आहे. त्यावेळी गोखल्यांचा नेमस्तपक्ष, टिळकांचा राष्ट्रीय पक्ष व सावरकरांचा क्रांतिकारक पक्ष महाराष्ट्रात जिवंत असून त्यांनाच अनुक्रमे मवाळ, जहाल व ज्वलत् जहाल अशी वर्तमानपत्री नावे होती. स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण व स्वराज्य ही राष्ट्रीय पक्षाची चतु:सूत्री होती. ती स्वीकारण्याची नेमस्तांची त्यावेळी तयारी नव्हती. even at a sacrifice हे शब्द स्वदेशीच्या ठरावात घालण्याला कलकत्त्याच्या सन १९०७ च्या काँग्रेसमध्ये किती प्रयास पडले असे ग्रंथकारांनी लिहिले आहे. हे साल नजर चुकीने पडले असावे. कारण १९०७ सालची राष्ट्रीय सभा सुरतेला झाली व मवाल-जहालातील मतभेद विकोपाला जाऊन ती तेथे मोडली. ऊस व भोपळे एकेठिकाणी बांधण्यात तात्पर्य नाही असे मवाळ पक्षाला त्यावेळी वाटे. स्वदेशी म्हणजे त्यांना 'सोदेशाही' वाटत असे. विश्वनाथपंत हे राष्ट्रीय किंवा जहालपक्षाचे असल्यामुळे

स्वदेशीचा व बहिष्काराचा पुरस्कार करीत. पण एखादेवेळी विलायती माल येणे त्यांना विशेष पापाचे वाटत नसे; राष्ट्रीय शिक्षणाचेही ते अभिमानी होते, पण या बाबतीत बरीचशी वर्गणी देण्यापलीकडे त्यांनी काही कार्य केले नव्हते. स्वत: ते सरकारमान्य हायस्कूलच्या 'गटारात'च काम करीत होते व स्वत:च्या मुलाला त्यांनी तळेगावच्या समर्थविद्यालयात काही घातले नव्हते. सरकारमान्य शाळेतील विद्या म्हणजे गटारातील गंगा असे त्यावेळी म्हणण्यात येईल त्याप्रमाणे हेही म्हणत. पण या गटार-गंगेचे गंगावळ म्हणून काम करून दक्षिणा मिळविण्याचे व हे गटारतीर्थ इतरांच्याच काय, स्वत:च्याही मुलांना पाजण्याचे त्यांना काही विशेष वाटत नसे. ग्रंथकार म्हणतात त्याप्रमाणे विश्वनाथपंतांच्या या आचरणात सुसंगतीही असेल. पण या बाबतीत ज्यांच्या आचरणात वरीलप्रमाणे सुसंगती किंवा विसंगती दिसते, असे पुढारी अद्यापीही कमी नाहीत. १९२१ सालच्या असहकारितेच्या चळवळीत असा एकच महाराष्ट्रीय पुढारी निघाला की ज्याने आपली मुले प्रथमत: कॉलेजातून काढून घेऊन मग बहिष्काराचा उपदेश सुरू केला. बाकी सगळा 'परोपदेशे पांडित्य'चाच प्रकार!

"मते मिळविण्याच्या प्रयत्नात आपल्या अधिकाराचे वजन अप्रत्यक्ष रीतीने कसे टाकले जाते हे प्रागतिक हेडमास्तरांनी आपल्या राष्ट्रीय असिस्टंटकडून मत मागण्याच्या प्रकारावरून दर्शविले आहे. पण हा प्रकार अगदीच सौम्य आहे. मत 'याचना' पुष्कळ वेळा कशी सक्तीची असते, तिच्याकरता पैसा कशा रीतीने खर्च केला जातो, मत न दिल्यामुळे मित्रामित्रांमध्येही कशी वैमनस्ये उत्पन्न होतात, मते मिळविण्याच्या गडबडीत प्रतिपक्षाला वाटेल त्या सूक्तासूक्त उपायांनी हाणून पाडण्याचा मोह किती अनावर होतो; या गोष्टी आता जगजाहीर झाल्या आहेत. किंबहुना ज्याने आपल्याला मत दिले नाही त्याचा सूड उगवण्याची बुद्धीही कशी जागृत होते हे गिरीधररावाच्या मनात "या विश्वासरावाचा राष्ट्रीय पक्षाचा अभिमान चांगलाच जिरवून काढला पाहिजे, लेकाचा मला एकदम व्होट देणार नाही म्हणतो म्हणजे काय? आणि त्याच्या पोराला आणि सुनंदालाही चांगला हात दाखविला पाहिजे" असे विचार आले यावरून स्पष्ट दिसते. प्रातिनिधिक संस्थांच्या वराबरोवर 'व्होटिंग'चा एक शापच लोकांना मिळाला आहे व हा शाप किती प्रभावी आहे याचे प्रत्यंतर निवडणुकीच्या वेळी चांगले येते. निवडणुकी सुरू झाल्या म्हणजे 'इलेक्शन फिव्हर'ने फणफणून जाऊन सुशिक्षित लोकही मते देण्याघेण्याच्या गडबडीत शिष्टपणाला कित्येक वेळी कसा फाटा देतात, याचे वर्णन विस्तारभयास्तव ग्रंथकारांनी टाळले असावे.

गिरिधरराव हेडमास्तर मवाळ, त्यांचे असिस्टंट विश्वनाथपंत जहाल व त्यांचे सुनन्दासारखे विद्यार्थी ज्वलत्-जहाल अशा क्रमाने प्रत्येक पिढीत राजकीय मतांची प्रगती कशी होत गेली ते सूचित केले आहे. पुढे 'धर्माकरिता अधर्म' या प्रकरणात स्वीटपतिपत्नीवर झालेल्या हल्ल्याच्या रूपाने देशाकरिता दरवडे घालण्याची जी लाट पुढे उसळली ती चित्रित करून 'धर्मा आणि देशाभिमाना! तुमच्या नावाने कितीतरी पापे घडत आहेत" असा शेरा सुशीलेकडून त्यावर दिला आहे. यानंतर हिंदुमुसलमानांच्या दंग्यांचा उल्लेख करून 'औटघटकेचे राज्य' व 'सगळीकडून मार' या प्रकरणात लोकप्रीती किती क्षणिक असते व खऱ्या देशभक्तांना आज फुलांच्या तर उद्या जोड्यांच्या माळा स्वीकारण्याची नेहमीच कशी तयारी ठेवावी लागते याचे ग्रंथकारांनी काढलेले सुंदर चित्र होतकरू देशभक्तांनी लक्षात ठेवण्यासारखे आहे. समाजाचे खरे कल्याण व्हावे म्हणून झटणाऱ्या व्यक्ती व लोक याचा अनेक वेळी मतभेद होतो. किंबहुना मतैक्यापेक्षा मतभेदाचेच प्रसंग जास्त असतात. अशा वेळी या व्यक्तींनी पूर्वी केलेला स्वार्थत्याग लोक विसरून जातात व एकंदर लोकमतात सूर न मिसळल्याबद्दल लोक त्यांचा धिक्कार करू लागतात. अशा प्रसंगी हा धिक्कारही सहन करून आपल्याला जी गोष्ट लोकांच्या हिताची वाटत आहे; ती शांतपणे करीत राहण्याची ज्यांची तयारी असेल त्यांनीच देशसेवेचे व्रत पत्करावे. याच दृष्टीने राजा आणि प्रजा या दोघांचीही मर्जी संपादणारा तत्त्वनिष्ठ व्यक्तींची महती

जास्त समजली पाहिजे. बळवंतरावांची एका रविवारची डायरी ग्रंथकारांनी दिली आहे ती जशी मनोरंजक तशी बोधप्रदही आहे. बळवंतराव हे अस्पृश्यतेच्या विरुद्ध असल्यामुळे अचलेश्वरीला नमस्कार करण्याकरता ते जेव्हा मंदिरात गेले तेव्हा "तुम्ही नास्तिक बाटगे लोक देवळात येऊन आम्हांला का बाटवू पाहता?" असे अण्णंभटाने त्यांना म्हटले. पुढे हिंदुमुसलमानांच्या दिलजमाईकरिता भरलेल्या सभेत ते गेले तेथे मुसलमान पुढाऱ्यांनी त्यांच्या 'ढोंगी' व 'बामणी' काव्याची चांगलीच हजेरी घेतली. कारण बोहरीगल्लीतील मशिदीसमोर वाद्ये वाजवू नयेत असा मुसलमानांतर्फेचा निकाल त्यांनी एकदा दिला असला तरी गुजर गल्लीतूनही गणपती नेऊ नये हा मुसलमानांचा आग्रह त्यांना पसंत नव्हता व त्याकरिता मुसलमानांकडून सोट्याचा प्रसादही त्यांना पूर्वी मिळाला होता. या सभेनंतर ते ब्राह्मणेतरांच्या सभेला बोलावणे होते म्हणून गेले. तेथे ब्राह्मणनिंदाप्रचुर अशी भाषणे झाल्यावर मंडळींच्या आग्रहावरून ते बोलावयास उठले मात्र, तोच 'बामन इथे कशाला' 'बसवा बामणिच्याला' असे उद्गार व त्यांच्या पाठोपाठ बटाटे व कांदे यांचा त्यांच्यावर वर्षाव होऊ लागला. बखेडा माजून मारामारी झाली आणि चारपाच 'बामणांची' डोचकी चांगली शेकली गेली. पुढे मारामारीच्या चौकशीच्या निमित्ताने पोलीस अमलदारांनी जखमी लोकांना चावडीवर नेले व तेथे पाचकळपणा करून त्यांचे मन दु:खित केले. हा सर्व प्रकार वाचला म्हणजे क्षणभर हसू येईलच. पण देशसेवा म्हणजे सुळावरची पोळी आहे, लोकांच्या सुरात सूर मिसळून एक-दोन दिवसांत करण्याची हुल्लडबाजी नव्हे; ही गोष्टही वाचकांच्या मनावर चांगली ठसेल.

मवाळ, जहाल व ज्वलज्जहाल यांच्या राजकारणानंतर हिंदुस्थानात सुरू झालेले महात्मा गांधींचे राजकारण कादंबरीत फारसे चित्रित का झाले नाही ते समजत नाही. हिंदी राजकारणाच्या विकासातील महात्मा गांधींचे राजकारण ही एक महत्त्वाची पायरी आहे. देशात सध्या प्रचलित असलेल्या सत्तेचे अंत:स्वरूप लोकांना या राजकारणामुळे दिसून येणार असून जशास तसे या न्यायाने अधर्मयुद्धालाही तोंड देण्याची तयारी केली पाहिजे हे या राजकारणामुळे पुन्हा एकदा सिद्ध होणार आहे; किंबहुना महात्मा गांधींचे राजकारणही पुढे येणाऱ्या रौद्र राजकारणाची सौम्य भूमिकाच आहे असे म्हणावयास हरकत नाही. राजकारणातील चिरंतन तत्त्वांचे ज्ञान लोकांना होणार असल्यामुळे व लोकांमध्ये जी अभूतपूर्व जागृती व निर्भयता उत्पन्न झाली आहे; ती मुळेही गांधीचे राजकारण महत्त्वाचे ठरते. कदाचित् ते वर्तमानकालीन असल्यामुळे ग्रंथकारांनी तिकडे दुर्लक्ष केले असावे. शिवाय गांधींच्या राजकारणाचा दुसरा अध्याय, कादंबरी लिहून झाल्यावर सुरू झाला असल्यामुळे त्याचा समावेश करता आला नसावा.

ग्रंथकाराच्या मते विश्वकुटुंबवाद वा समाजसत्तावाद हे राजकारणाचे आजच्या घटकेचे स्वरूप असून भविष्यकाळात या तत्त्वाची कशी प्रगती होणार आहे, तेही कित्येक प्रकरणातून त्यांनी दाखविले आहे. किंबहुना देवाच्या खालोखाल विश्वकुटुंबवादाच्या या कल्पनेला प्रस्तुत कादंबरीत महत्त्व देण्यात आले आहे; कारण विश्वकुटुंबवादाचे ध्येय हेच पुढे सुशिलेचा देव बनले आहे. सध्याची स्थिती पाहिली तर आर्थिक विषमता झपाट्याने वाढत आहे. श्रमजीवी आणि बुद्धिजीवी लोक दारिद्र्याच्या चरकात भरडले जात असून त्यांना व त्यांच्या मुलाबाळांना पाहिजे तसे व पाहिजे तितके अन्नवस्त्र आणि हवापाणीही मिळत नाही. याच्या उलट पिढ्यान्‌पिढ्या पुरून उरेल इतकी संपत्ती सत्तेच्या सहाय्याने कित्येक गोळा करीत आहेत. एकीकडे टोलेजंग हवेल्या, विस्तीर्ण बागबगीचे दिसत असले तर त्यांच्याच शेजारी गरीबांच्या चंद्रमौळी झोपड्या दिसत आहेत. या चंद्रमौळी घरात आणि खेड्यापाड्यात राहणारे व पोटाकरता रात्रंदिवस कष्ट करून दमून गेलेले मजूर आणि शेतकरी जेव्हा जास्त सज्ञान होतील, दिवसभर कष्ट करूनही, आपल्याला व आपल्या पोराबाळांना पोटभर खायला मिळत नाही याची कारणे, झपाट्याने वाढत जाणारे सुशिक्षित बेकार जेव्हा त्यांना समजावून सांगतील तेव्हा, ज्या शक्तीच्या व सत्तेच्या सहाय्याने एक वर्ग

संपत्तीचे एकत्रीकरण करीत आहे; तीच सत्ता शक्तीच्या साहय्याने आपल्या हाती घेऊन एकत्र साठलेल्या संपत्तीची सर्वत्र सारखी खैरात करण्याचा प्रयत्न दीन व दरिद्री झालेले लोक केल्यावाचून राहणार नाहीत. त्यावेळी पक्षोपपक्षांची गल्लत होऊन एक दरिद्र्यांचा व एक श्रीमंतांचा असे दोनच पक्ष शिल्लक राहतील व ज्याला पुढारी व्हायचे असेल त्याला आधी आपली संपत्ती व वतनदारी लोकांच्या स्वाधीन करावी लागेल. आजच्या घटकेला 'एकंदर समाजाची रचना स्वार्थावर व लोभावर उभारली आहे. स्वार्थ व विशेषेकरून द्रव्यलोभ हाच समाजाचा पाया. ह्याच देवतांचे जे अनन्यभक्त त्यांनाच बहुतेक लोक वंदनीय व सन्मान्य समजतात'' (२०४) तशी स्थिती पुढे राहणार नाही. प्लेगच्या दिवसांत आपल्या बंगल्याला कुलूप लावून, निदान गोठ्यातली जागा तरी आमच्या आजारी पोराबाळांना राह्यला द्या असे विनवणाऱ्या लोकांनाही धुडकावून लावणाऱ्या सावकारांची लोक पुढे गय करणार नाहीत. स्वार्थातील स्व चा अर्थ व्यापक करण्याचा, स्वमध्ये समाजाचा समावेश करण्याचा प्रयत्न पुढील चळवळीत खात्रीने होईल. खासगी मालमत्तेच्या पद्धतीमुळे मनुष्य पैशाच्या लोभाला बळी पडून माणुसकीला मुकतो. त्यामुळे ही पद्धती बंद करून सर्व मालमत्ता राष्ट्राच्या मालकीची करण्याचे ध्येय या चळवळीपुढे राहिल यातही शंका नाही. पण ते कितपत यशस्वी होईल, एवढाच प्रश्न आहे. कारण श्रेष्ठ किंवा कनिष्ठ स्वार्थाच्या प्रेरणेशिवाय मनुष्य मनःपूर्वक प्रयत्न करण्याला तयार होत नाही. स्वमध्ये प्रत्येक मनुष्य विश्वाचा समावेश करील व सर्वांचे ज्यात हित त्यातच माझे हित असे जर विश्वातील मनुष्यमात्र मानतील तरच ही गोष्ट शक्य आहे. आणि 'हे विश्वचि माझे घर' अशी प्रत्येकाची वृत्ती होऊन सत्ययुग केव्हातरी अवतरावे म्हणूनच आपले प्रयत्न नेहमी चालले पाहिजेत यातही वाद नाही. पण विश्वकुटुंबी समाजव्यवस्थेचा हा सगळा डोलारा मनुष्य स्वभावाच्या आणि सहजप्रवृत्तींच्या विरुद्ध आहे; आणि इतिहासाचीही साक्ष अशीच आहे (२१५). या विनायकरावांच्या आक्षेपाला बळवंतरावांना समाधानकारक असे उत्तर देता आले नाही. मनुष्यस्वभाव कसा आहे हे निश्चित ठरविण्याला आज पुरेसे साधन नाही. आजपर्यंतच्या इतिहासावरून भविष्यकाळाबद्दलची अनुमाने करणे चुकीचे आहे. पूर्वीचा काळ आजच्या काळाहून फार भिन्न होता आणि भविष्यकाळ आजच्याहून फार भिन्न होणार आहे'' अशा अर्थाचे बळवंतरावाचे उत्तर आहे. नवा व अपूर्व इतिहास निर्माण करण्याची आकांक्षा केव्हाही अभिनंदनीय आहे. पण इतिहासाची पुनरावृत्ती होते. ही जी अनुभवसिद्ध म्हण आहे ती मनुष्याच्या स्वभावात बदल झालेला नाही याच गोष्टीची निदर्शक आहे. त्यामुळे भूतकाळ आणि वर्तमानकाळ यामध्ये 'बाह्य फरक पुष्कळ झाला आहे हे कबूल; पण मनुष्याच्या मूलभूत प्रवृत्तीमध्ये फरक झाला काय? मनुष्याची स्वार्थबुद्धी नष्ट झाली आहे का? कामवासना गेली आहे का? क्रोध थंडावला आहे का? असूया मरून गेली आहे का? खरी गोष्ट अशी आहे की, मनोविकार सगळे तत्त्वतः पूर्वीसारखेच आहेत. ते व्यक्त करण्याची पद्धती मात्र बदलली आहे. मनोविकार सगळे तेच. फक्त पोशाख बदलला आहे. प्रवृत्ती त्याच ज्ञान म्हणजे माहिती अधिक आहे. पण 'स्वभाव' बदलला आहे असे म्हणता येणार नाही'' (२१६) हे विनायरावांचेच म्हणणे वाचकांना अधिक पटते. पाच हजार वर्षांपूर्वीच्या आणि आताच्या मनुष्याच्या स्वभावात फरक पडला आहे हे बळवंतरावांचे म्हणणे, त्यांच्याच पक्षाच्या सुनंदरावांनी हल्लीच्या स्थितीचे जे भेसूर पण यथार्थ चित्र काढले आहे त्याने खंडित झाले आहे. "आतापर्यंतचा इतिहास म्हणजे कलह, मारामाऱ्या, खून यांचाच बराचसा इतिहास. लढायांत आणि युद्धात शत्रूचा जीव घेणे, म्हणजे वास्तविक खून करणे होय. पण हे खून प्रतिष्ठितपणाचे, कायदेशीर आणि मोठ्या प्रमाणावर आणि पुष्कळ वेळा अप्रत्यक्ष असतात म्हणून त्यांना खून म्हणावयाचे नाही इतकेच.'' (२२०) हल्लीच्या समाज व्यवस्थेत पैशाकरता मुलगे बापाचा खून करताना आढळतात. बायको नवऱ्याचा खून करते. लहान मुलांच्या अंगावरचे दागिने मिळावेत म्हणून त्यांचा अमानुषपणे जीव घेणारे काय थोडेथोडके

गुन्हेगार आहेत? आजच्या समाजात गरिबांना अन्न नाही; आणि श्रीमंत अजीर्णाने आजारी पडत आहेत. वयाच्या साठ-सत्तर वर्षापर्यंत घाम येईतो रोज काम करून समाजाची सेवा केली तरी म्हातारपणी अन्नाशिवाय, औषधपाण्याशिवाय काहींना मरण्याची पाळी येते, तर काही गर्भश्रीमंत असून काहीएक काम नाही म्हणून जगभर उगीच भटक्या मारीत असतात. हल्लीच्या समाजाच्या कोशात 'गरिबी' म्हणजे 'पाप', 'श्रीमंत' म्हणजे 'सर्वगुणसंपन्न', 'बळी तो कानपिळी' हा 'न्याय', सरकारच्या चुका सडेतोडपणे दाखविणे म्हणजे 'राजद्रोह', निरपराधी लाखो लोकांचे राजरोस खून पाडणे म्हणजे युद्ध चालविणे, लोकांना फसविणे म्हणजे मुत्सद्देगिरी; ढोंगे करून बाह्य शिष्टाचार पाळणे म्हणजे सभ्यता आणि देव, स्वर्ग, श्रुतिस्मृती इत्यादी शब्द उच्चारणे, टिळेमाळा करणे म्हणजे धार्मिकता''. (२१३) बाह्य स्वरूपात फरक झाला असला तरी मनुष्याचा मूळस्वभाव बदललेला नाही, या विनायकरावांच्या म्हणण्याचेच समर्थन सुनन्दरावांच्या-वरील भाषणाने झाले आहे. एवढेच नव्हे; तर खुद्द सुशीलेच्या मतांची धारही बोथट झाली. ''मनुष्य हा स्वार्थपर आहे पण तो समाजघटना बदलली. तर परार्थतत्पर होऊ शकेल, बऱ्याच सुलभतेने होऊ शकेल असे तिला वाटत असे. आता तिला असे पूर्णपणे कळून चुकले की, मनुष्य हा त्रिगुणात्मक आहे. त्यांच्यात सात्त्विक, राजस व तामस वृत्ती व प्रवृत्ती आहेत. अर्थात् समाजसुधारणा आपल्याला जितकी सुलभ वाटत होती; तितकी नाही अशी तिची खात्री झाली. (२४१) जगातील विषमता आणि अन्याय दूर करण्याची साधने योजनांचा मनुष्यास मूलभूत प्रवृत्तींकडे दुर्लक्ष करून चालणार नाही; हा या सर्व विवेचनातून निष्कर्ष निघतो.

तात्त्विक, सामाजिक व राजकीय बाबतीत अशा रीतीने उद्बोधक विचार वामनरावजींनी या कादंबरीत गुंफले आहेत. प्रत्येक विषयाच्या दोन्ही बाजू मांडून वाचकांना स्वतःस विचार करण्यास लावण्याची त्यांची इच्छा असल्यामुळेच की काय; शेवटचा निर्णय त्यांनी बहुधा कोठेच दिला नाही एवढेच एक वैगुण्य त्यात भासते. कदाचित सुशीलेप्रमाणेच ''सौम्यता, निश्चयाचा डळमळीतपणा, अपवादांची शक्यता, विशिष्ट परिस्थिती असली तरच ते विधान सत्य आहे, हे मान्य करण्याची प्रवृत्ती हे गुण'' त्यांच्यातही डोकावू लागले असावे. वामनरावांची प्रतिभा, बहुवेषी आणि बहुभाषी असली तरी निर्दोष आहे. वैवाहिक स्वातंत्र्याचे समर्थन करीत असतानासुद्धा तिच्या भोवतालचे पावित्र्याचे वलय नाहीसे होत नाही; आणि जगातील अन्यायाचे व सामाजिक विषमतेचे तिरस्कारपूर्ण वर्णन ती करू लागली म्हणजे तिच्या तेजस्वितेत भर पडते. ती आता प्रौढ परिणत झाली असल्यामुळे सर्वच बाबतीत निश्चित आणि उत्तम मते तिने बोलू लागावे अशी अपेक्षा, वामनरावजींची विद्वत्ता आणि सौजन्य याबद्दल आदर बाळगणाऱ्या तरुणांनी का करू नये?

**प्रो. शंकर दामोदर पेंडसे, एम.ए.ए.ओ.एल. नागपूर.**

(म. सा. पत्रिका, जानेवारी १९३०)

*





अनुक्रमणिका

# "इंदु काळे व सरला भोळे"

देविदास दत्तात्रेय वाडेकर

*['इंदू काळे सरळा भोळे' ह्या, वामन मल्हार जोशी यांच्या दुसऱ्या कादंबरीचे सविस्तर परीक्षण, प्रो. दे. द. वाडेकर यांनी केले आहे. ही कादंबरी 'पत्रपद्धती'ने लिहिलेली आहे. पत्रपद्धतीच्या कादंबरी लेखनाचे गुण-दोष प्रो. वाडेकरांनी स्पष्ट केले आहेत. तसेच ही कादंबरी 'मनोविकलन' पद्धतीची (Psycho-analysis) आहे. त्याचेही विवेचन उद्बोधक आहे. कादंबरीचा विषय अगदी आजही ताजा आहे. वैवाहिक जीवनात स्त्रीने आपला व्यक्तिविकास सोडून पतीच्या विकासातच धन्यता मानावी; ह्या विचारांना विरोध करणारी स्त्री, पतिविकासाकरिता व्यक्तिविकासाचा मूलभूत हक्क सोडण्यास तयार नाही. त्यासाठी ती आपल्या वैवाहिक जीवनाला संपविते. पतिविकासात त्याच्या इतिहाससंशोधनाच्या कार्यात एकरूप झालेली स्त्री अखेर व्यक्तिविकास तर गमावतेच परंतु वैवाहिक जीवनालाही पारखी होते. ध्येयाच्या मागे धावणारे स्त्री-पुरुष, संसारात कसे सुख गमावून बसतात; याचे ते चित्रण आहे. ह्यातील विविध-मत-मतांतरे वाचनीय आणि मननीय आहेत. सरला पतिपरायण, तर इंदू बंडखोर व्यक्तिमत्त्वांची आहे.*

*–संपादक]*

"इंदु काळे व सरला भोळे" ही प्रो. वा. म. जोशी याची लघुकादंबरी उर्फ कादंबरिका प्रसिद्ध होऊन वर्ष होऊन गेलें, तरी 'म. सा. पत्रिके'चा तिच्यावरील अभिप्राय प्रसिद्ध व्हावयाचा राहूनच गेला आहे. या विलंबाबद्दल ग्रंथलेखक प्रो. जोशी व 'पत्रिका', संपादक प्रो. पोतदार यांची क्षमाच मागितली पाहिजे व मी ती मागतों.

या रम्य कथेंत प्रो. वामनरावांनी 'वैवाहिक जीवन' विरुद्ध 'व्यक्तिविकास आणि ध्येयनिष्ठा' यावरील आपले विचार, वेगवेगळ्या तीन तरुण युग्मकांचे नमुनेदार (typical) जीवनपट विणून व्यक्त केले आहेत. प्रो. वामनरावांच्या इतर लिखाणांप्रमाणेंच, हीहि त्यांची कादंबरी, विचारप्रधान असून तिच्या वाचनानें वाचकांचेहि विचारप्रवर्तन झाल्याशिवाय राहत नाही.

या कादंबरीत वामनरावांनी कादंबरीकारांच्या नेहमीच्या वापरण्यांत आलेली 'साक्षात्' निवेदनपद्धति न वापरतां 'प्रतिबिंब' पद्धतीचा 'पत्र'पद्धति हा प्रकारविशेषच सर्वत्र उपयोगांत आणिलेला आहे. या पद्धतींत जसे कांही फायदे आहेत, तशा कांही गैरसोयीहि (Handicaps) आहेत. या पद्धतीचा मुख्य फायदा म्हणजे पात्रांचे विकारविचार ज्या त्या वेळीं त्यांच्याकडूनच पत्ररूपाने वदवितां येतात. परंतु तींतील प्रमुख दोष असा की, तिचा एकदा उपयोग करूं म्हटलें कीं, मग कथेंतील बहुतेक, निदान महत्त्वाच्या, पात्रांना पत्रव्यवहारपटु लेखक बनवावें लागते, व यामुळें एकंदर कथानिवेदनांत बरेंचसें कार्त्रिम्य निश्चितपणें येतें. इंग्रजी वाङ्मयांत पत्रलेखनद्वारां कथानिवेदन करण्याची नवीन प्रथा रिचर्डसन या आद्य इंग्रजी कादंबरीकाराने प्रथम सुरू केली व या लेखकावर

त्याबद्दल टीकाहि पुष्कळ झाली आहे. या टीकेचा मथितार्थ हडसन या प्रसिद्ध व लोकप्रिय साहित्यसमीक्षकानें मार्मिकपणे सारांशिला आहे: "All his (Richardson's) characters seem to have a perfect mania for correspondence and, however busy otherwise, unlimited leisure for it; and the world in which they live resembles nothing so much as a well-ordered office where everything is transcribed, docketed and filed for future reference."[१] स्वत: हडसनसाहेबांचेंहि या पद्धतीसंबंधाने असें मत आहे की चांगल्या कुशल व कलात्म लेखकांच्या लिखाणांतसुद्धा या पद्धतीमुळें घोंटाळा व अप्रत्यय-कारकता उत्पन्न होते. हें मत मला सामान्यपणें मान्य आहे. परंतु याहीपेक्षा पत्रपद्धतींत आणखीहि एक दोष आहे; तो असा पत्रपद्धति हा 'नाट्य' निवेदनाचाच एक प्रकार म्हटला पाहिजे. (पत्रें म्हणजे लेखी संवाद आणि संवाद म्हणजे तोंडी पत्रेच नव्हेत काय?) तेव्हा नाट्यनिवेदनाचे गैरफायदे पत्रपद्धतींतहि येतात. पात्रांच्या भोंवतालच्या भौतिक परिस्थितीचें व इतर प्रकारच्या वातावरणाचें वर्णन, पात्रांचें स्वभावविकलन, कथालेखकाच्या स्वत:च्या दृष्टिकोणाचा आविष्कार, इत्यादि गोष्टी 'साक्षात्'-'प्रत्यक्ष' निवेदनपद्धतीत जशा कादंबरीकारास साधितां येतात तशा किंवा तितक्या सुलभतेने त्या 'नाट्य'-किंवा 'पत्र' पद्धतीने साधत नाहींत. यामुळें पत्रात्मक कादंबरींत फार मोठे वैगुण्य रहाण्याचा संभव असतो. पत्रात्मक पद्धतीचे गैरफायदे टाळून तिच्या फायद्यांचाच केवळ फायदा घ्यावयाचा असल्यास कादंबरींत सामान्यत: 'साक्षात'पद्धति वापरून, मधून मधून हवी तर पत्रपद्धति उपयोजावी. परंतु तिचा सर्रास उपयोग केल्यास फायदा थोडा व तोटा मात्र बराच अशी स्थिति होईल; यांत शंका नाही.

वरील सामान्य विवेचन प्रो. वामनरावांच्या प्रस्तुतच्या कादंबरीसहि थोड्याफार प्रमाणांत लागू पडतें; असें मला वाटतें. तींतील पात्रें सुशिक्षित समाजांतीलच असलीं, तरी ती एकमेकांस पत्रें लिहीत बसतात, हें पाहून मौज वाटते! तसेंच बहुतेक महत्त्वाच्या पत्रांत वामनरावांचाच विचक्षणपणा, त्यांचीच भाषाशैली, त्यांचीच मनोविकलनबुद्धि, मध्येंच कंसांत वाह्यात् विधानें (obiter dicta) लिहिण्याची त्यांचीच लकब, त्यांचाच मालकी हक्काचा 'नरो वा कुंजरो वा' करणारा अनिश्चय, वगैरे जे विशेष डोकावतात त्यांवरून पत्ररूपानें गोष्ट सांगून बघण्याच्या अट्टहासाने ती सांगणाऱ्याची कशी त्रेधा उडते; हें स्पष्ट दिसतें. सर्वच कादंबरी 'पत्र'पद्धतीने लिहिण्यापेक्षा कादंबरी-लेखनांत वर म्हटल्याप्रमाणें सामान्यत: 'साक्षात्' - पद्धति उपयोजून, मधून मधून 'पत्र'पद्धतीचा अवलंब केल्यास, तें लेखन अधिक परिणामकारक व प्रत्ययोत्पादक होईल असें मला वाटतें. असो.

प्रो. वामनरावांच्या कादंबरीचें कथासूत्र अगदी साधें व आटोपशीर असून तें अगदी थोडक्यांत पुढीलप्रमाणे सारांशितां येईल. कादंबरीचा काळ अगदी अलीकडचा म्हणजे इ. स.१९१९ ते १९३४ हा आहे; व तींतील पात्रेंही वामनरावांस 'आपले मित्र' म्हणवितात, यावरून त्यांच्या माहितींतलीं आहे. मुख्य पात्रे सहा. कथेच्या सुरवातीस पुण्यास विनायकराव भोळे, सूर्यकांत ऊर्फ भाऊराव काळे व नारायणराव पाठक हे पंचविशीच्या आंत बाहेरचे तीन तरुण मित्र होते. पैकी भोळे व पाठक हे बी. ए. असून काळे हे बी. ई. म्हणजे स्थापत्यविशारद होते. भोळे हे कॉलेजांत फेलो व लेक्चरर असतां काळ्यांची श्यामलवर्ण भगिनी सरला ही त्यांची शिष्या होती. तेव्हा तिजवर भोळे यांचें प्रेम बसून, त्यांनी तिला मागणी घातल्यावरून, तिने त्यांस संमति दिली व त्यांचें लग्न झालें. दुसरी एक महाविद्यालयीन प्रभु ज्ञातीची सुंदर व कलासक्त तरुणी इंदुमती गुप्ते हिजवर भाऊ काळे यांचें प्रेम बसून मध्यंतरीं दोन्ही बाजूंच्या वडील माणसांच्या संमतीच्या अडचणी आल्या तरी शेवटीं त्यांनीं आपला मिश्रविवाह जुळवून आणिला व केला.

तिसरे नारायणराव पाठक हे लहानपणापासून कोंकणांतील साखरपें गांवच्या काशी ढवळे नांवाच्या त्यांच्या बालमैत्रिणीवर प्रेम करीत असून व विवाहाबद्दलच्या त्यादोघांच्या आणाशपथा झाल्या असूनहि, इतिहाससंशोधनाच्या ज्ञानमार्गी जीवनक्रमाच्या नादीं लागून व मनांत तिच्याशीं विवाह करण्याचें पुन: पुन्हा येत असूनहि आपल्या ध्येयसिद्धीसाठी विवाहच करावयाचा नाही, असें निग्रहानें ठरवितात व त्या कारणाने त्यांची प्रेयसीही जन्मभर अविवाहितच राहण्याचें ठरवते. अशा तऱ्हेने कथेच्या सुरवातीसच कथेंतील मुख्य चार पात्रें विवाहित झालीं असून बाकीचीं दोन पात्रें विवाह न करण्याचा निश्चय केलेलीं आहेत; आणि या त्यांच्या परिस्थितींतूनच पुढील कथानकाचा विकास झाला आहे. भोळे गांधींच्या भजनीं लागून एकटेच अहमदाबादेस सत्याग्रहाश्रमांत जातात व तिकडे कायदेभंगाबद्दल त्यांस तुरुंगवासाची शिक्षा होते. ती शिक्षा भोगून झाल्यानंतर ते कोंकणांत पाचबावडीस सहकुटुंब जातात व तेथे ग्रामसुधारणेचें कार्य करीत राहतात. तेथेहि त्यांना दीर्घ मुदतीची शिक्षा होते. या लोकसेवेच्या खडतर जीवनक्रमांत मुळांत श्रीमंतीत वाढलेली त्यांची पत्नी सरला ही स्वत:चें व्यक्तिमत्त्व विसरून पतीशी पूर्णपणे समरस होते व तिचा जीवनप्रवाह तिच्या पतीच्या जीवनप्रवाहांत अगदी लोपून जातो. पतीच्या दीर्घकालीन कारावासाच्या मुदतींत, व शेवटीं तर तुरुंगांतील हालांमुळें आजारी पडून पति वारल्यानंतरसुद्धां, ती धीराने पतीचेंच लोकोपकारक कार्य पुढेहि चालू ठेवते.— भाऊराव व इंदु काळे यांचे जीवनपट मात्र अशा रीतीने एकरूप होऊं शकले नाहीत. भाऊराव आपल्या स्थापत्यव्यवसायांत (कॉंट्रॅक्टरच्या धंद्यांत) चूर असावयाचे व प्रथमत: कांही अंशीं याचमुळें त्यांच्या पत्नीने - इंदु काळे हिने - मनरंजनाकरितां गायनशिक्षक बिंदुमाधव म्हस्करांची शिकवणी ठेवून आपली आवडती कलोपासना चालू ठेविली. परंतु यामुळे लोकापवाद उत्पन्न होऊं लागले व पतीचेंही मन साशंक झालें. तरी पण 'पतिनिष्ठा कीं व्यक्तिविकास?' असें द्वैत तिच्या मनांत उत्पन्न होऊन दांपत्यसुखाकरिता अथवा पतिनिष्ठेकरितासुद्धा व्यक्तिविकासाचा मूलभूत हक्क पत्नीने सोडून द्यावाच, अशी तिच्या मनाने ग्वाही न दिल्याने काळे दंपतीच्या सांसारिक जीवनांत दु:खद बिघाड उत्पन्न झाला. तिच्या कलाशिक्षकाने तिजशीं अतिप्रसंगाची लगट केली तरी तिचे डोळे उघडले नाहीत; उलट मानवाच्या क्षम्य प्रमादशीलतेबद्दलचा सिद्धांत ती मांडूं लागली. शेवटीं तर तिच्या कलागुरूनें तिला फसवून पळवून नेलें. यानंतर मात्र ती ताळ्यावर आली; व खुद्द खलपुरुषानेच स्वत: आत्महत्त्या करण्यापूर्वी दिलेल्या तिच्या शुद्धतेबद्दलच्या ग्वाहीने तिच्या पतीचेंहि समाधान होऊन शेवटीं त्यांच्या जीवनांत पुनश्च संवादी वातावरण उत्पन्न झालें.—तिसरे गृहस्थ म्हणजे नारायणराव पाठक हे मात्र 'इदं च नास्ति । परं च न लभ्यते ।' अशी शेवटीं स्वत:ची स्थिती करून घेऊन बसले! प्रेयसीच्या प्रेमी जीवाकडे त्यांचा जीव ओढ घेत असतांना व तीहि त्यांजकरिता एकनिष्ठ प्रेमाने झुरत असतांना केवळ हटातटाने त्यांनी ज्ञानमार्गाचा जीवनक्रम पत्करला व मध्यंतरीं पुन: पुन: चुळबुळ करणाऱ्या मनास अनेक मोहाचे प्रसंग आले असतांनाहि, त्यांनी त्यास प्रयत्नपूर्वक गप्प बसविलें! परंतु ज्ञानापासूनहि अपेक्षितेला आनंद न मिळाल्यामुळे आपलें चुकतें आहे असें वाटून, ते पुन्हा विचारपूर्वक संसारमार्ग चोखाळण्याचें ठरवितात. तोंच त्यांची प्रेयसी काशी ढवळे त्यांजकरितां झुरून झुरून मरणाच्या द्वारीं पडलेली असल्याचें त्यांना आढळतें व शेवटीं ती त्यांना दु:खांत लोटून परलोकीं प्रयाण करिते!

अशा तऱ्हेची अत्यंत मनोरम गोष्ट आपल्या कादंबरींत प्रो. वामनरावांनी विणलेली आहे. कथानकांतील अनेक प्रसंग वामनरावांनी 'पत्र'पद्धतीचा निर्बंध (Handicap) पाळून शक्य तेवढ्या बहारीने व काव्यपूर्ण पद्धतीने वर्णिले असून स्वभाववर्णन व मनोविकलन (Psycho-analysis)[२] त्यांनी इतक्या



अनुक्रमणिका

सूक्ष्मदर्शी दृष्टीने केलेलें आहे, आणि इतक्या सर्व कलाविलासाच्या समाधींतहि त्यांनी आपल्या प्रतिपाद्य तत्त्वावरील दृष्टि इतकी निश्चल ठेविली आहे की; ही लहानशीच असलेली कादंबरी अलीकडील चारसहा वर्षांतील लघुकादंबरीवाङ्मयांत अग्रस्थान सहज पटकावील असा भरंवसा वाटतो. वामनरावांच्या साहित्यविभूतीतील (Genius) कलाचातुरी व तत्त्वदृष्टी हीं दोन्हीं समान महत्त्वाचीं व महनीय अंगें कोणास थोडक्यांत एकत्र कोठें पहावयांचीं असल्यास त्यांच्या लिखाणापैकी ह्या कादंबरीकडे निश्चितपणे बोट दाखवितां येईल. या दृष्टीनें त्यांची 'रागिणी' एक मोठेसें अल्फोंन्सो जातीचे आम्रफल धरलें तर प्रस्तुतची कादंबरिका लहानसेंच पण मधुर असें काबुली द्राक्ष आहे, असें म्हणता येईल.

या कादंबरींत त्यांनी जीं पात्रें रंगविलीं आहेत, त्यांपैकी बहुतेकांचें (कारण काशी ढवळे हिला चारदोन प्रसंग सोडून बहुशः पार्श्वभूमींतच ठेविलें आहे) स्वभावचित्रचित्रण वामनरावांनी सूक्ष्मपणाने व अत्यंत सहृदयतेने केलें आहे. त्यांच्या 'इंदु काळे' व 'सरला भोळे' या मानसकन्यका हीं पत्रें वाचल्यानंतर स्पष्टपणें आपापल्या वैशिष्ट्यांसह वाचकांच्या मनश्चक्षूंपुढे उभ्या राहतात. नांवाप्रमाणेच 'सरला' असलेल्या 'सरले'ला आपल्या स्वरूपसौंदर्याबद्दल बिलकूल भ्रम नाही. विनायकरावांची मागणी आल्याबरोबर ती, आधीच प्रेमविद्ध झालेली असल्यामुळे, अर्पणबुद्धीने कांहीहि आडवळणें न घेतां त्यांस एकदम 'होय' म्हणून टाकत्ये; व विवाहानंतर पतीच्या कोणत्याहि महत्त्वाकांक्षेच्या आड न येतां, विरह असो वा सान्निध्य असो, पतीचें कार्य तेच आपलें कार्य असें समजून सुखासमाधानाने आपलें जीवन कंठित्ये. माहेरच्या श्रीमंतीनंतर सासरच्या गरिबींतहि ती भांबावत नाही; आणि स्वाभिमानहि पण विसरत नाही. पतीबरोबर पांचबावडीस थाटलेल्या वेगळ्या संसारांत तिचें मन अगदी रमून जातें. आपल्या अपत्यांचें कोडकौतुक ती स्वतः करित्ये यांत कांहींच नाही; परंतु पतीहि त्यांचें मनापासून कौतुक करितो, याबद्दलच तिला विशेष धन्य वाटतें. सांसारिक जीवनांत एवढी पतिपरायण व निरस्तस्वत्व असलेली स्त्री पतीच्या तुरुंगवासाच्या अवधींत (व त्याच्या निधनानंतरहि) न डगमगतां, धीरोदात्ततेनें पतीचें शिक्षणकार्य स्वतः पुढें चालविते; व शेवटच्या बेशुद्धींतसुद्धा अशा या पत्नीच्या नांवाचा जप करीतच पति शेवटीं मृत्यूच्या आधीन होतो; हीं दृश्यें हृदय हालविणारीं आहेत, यांत शंका नाही. एकंदरीने पतीच्या जीवनांत संपूर्णपणे लोपून जाणाऱ्या स्त्रीचा आदर्श (Type) म्हणूनच वामनरावांनी सरला काळे हिचें चित्र रंगविलेलें दिसतें.

इंदु काळे हिचें व्यक्तिमत्त्व अर्थात्च वेगळ्या प्रकारचें आहे. ती कोणांत - पतींतसुद्धा-मिसळून अथवा लोपून जाणारी स्त्री नव्हे. विवाहपूर्वीची ही इंदु गुप्ते आपल्या वडिलांस त्यांच्या इच्छेविरुद्ध आपल्या मिश्रविवाहास-आणि तोही ज्यांस तिचे वडील जोडे मारणार होते त्या भाऊराव काळ्यांशी— संमति द्यावयास लावते; ही पहिलीच तिजबद्दलची वाचकांस कळणारी महत्त्वाची घटना सूचकच आहे. विवाहानंतर नणंद व सासू यांजशीं तिचें फारसें जमत नाही. घरांतील इतर माणसांच्या संमतीशिवाय गायनमास्तर बिंदुमाधव म्हस्कर यांची शिकवणी ठेवण्यांत व त्यामुळे जनांत लोकापवाद व पतीच्या मनांत संशय उत्पन्न झाल्याचें माहीत झाल्यानंतरहि ती चालू ठेवण्यांत तिचें बेदरकार धैर्यच व्यक्त होतें. तिच्या या धैर्यात बेमुर्वतखोरपणाचाही अंश आहे, हें जूनमध्ये प्रेमविवाह झालेली ही मुलगी सप्टेंबरमध्ये पतीशीं बोलताना बिंदुमाधव म्हस्करांच्या मोहाने आपणांस त्यांजशीं प्रेमसंबंध ठेवावासा वाटला, तर आपण पतीशी घटस्फोट करूं अशी स्पष्ट भाषा खुद्द पतीलाच उद्देशून बोलते; यावरून दिसून येईल. पण तिचा मूर्खपणा याहीपुढे जातो. बिंदुमाधव म्हस्कराने एकदां तिच्याशीं अतिप्रसंगी लगट केल्यानंतर व विनायकरावांनी त्याबद्दल प्रतिकूल सल्ला दिल्यानंतरसुद्धा ती त्याची शिकवणी चालूच

ठेवित्ये. परंतु ती स्वत: अनीतिमान् नाही. परंतु यामुळे सर्व सारासार विचार गुंडाळून ठेवणाऱ्या तिच्या मूर्ख कलासक्तीचें व त्यामुळे उत्पन्न झालेल्या तिच्या लौकिकाविषयींच्या व पतीबद्दलच्या बेपर्वा वृत्तीचें समर्थन होत नाही. पतीच्या मनांत संशय आल्यापासून बाह्य देखाव्याच्या दृष्टींनें तो जरी तिच्याशीं ठाकठिकीनें वागत असला तरी त्यांत अंतरीचा उमाळा नाही, किबंहुना त्याचें अंत:करण खिन्न व संत्रस्त स्थितींतच आहे, हें तिला समजतें. तरीसुद्धा केवळ लौकिकाकरिता अथवा पति संशय घेतो म्हणून आपला कलात्म व्यक्तिविकास दाबून टाकावा कीं काय असा प्रश्न तिजपुढे उभा रहातो. यामुळे तर तिला खरेंखुरें पतिप्रेम हवें की नको हेंच समजत नाही. किंबहुना, पतिप्रेमाच्या भुकेपेक्षा तिची कलाविलासाची भूकच अधिक प्रभावी आहे, असें दिसतें. तरीपण आपल्या वर्तनाने आपण खऱ्याखुऱ्या व संतोषात्मक पतिप्रेमास पारखें झालों, याचें तिला वाईट वाटत असतेंच; आणि स्त्रीसहज अपत्य-सुखाभिलाषाहि पण तिला जाणवते. आणि पुढे बिंदुमाधव म्हस्कराने तिला पळवून नेल्यानंतर तिचे डोळे उघडतात व ती तिकडून परत आल्यानंतर, शेवटीं बिंदुमाधव म्हस्कराने आत्महत्या करण्यापूर्वी अपराधाची कबुली देऊन पश्चात्तापाने पापक्षालन करण्यासाठी लिहिलेल्या पत्रावरून तिच्या पतीचीहि संशयनिवृत्ति होत्ये. तेव्हा शेवटीं या पतिपत्नींचें मनोमय पुनर्मीलन होतें. पण या सर्व घटना घडून येईपर्यंत, त्यांच्या विवाहास बारा वर्षे होऊन गेलीं होतीं! 'कलाविकासा'ने 'कलिविकास' केला तो असा! संसारांत पतिपत्नींनी व्यक्तिविकासाचें वाजवीपेक्षा जास्त स्तोम न माजवितां त्यांनी एकमेकांशी- विशेषत: पत्नीने पतीशीं[३] समरस व एकरूप होण्यातंच दांपत्यसुखाची सिद्धता होणार आहे हेंच तत्त्व या पात्राच्या द्वारे प्रतिपादण्याचा वामनरावांचा हेतू दिसतो.

इंदु काळे व सरला भोळे यादोन स्त्रीपात्रांखेरीज मनोविकलनदृष्ट्या विनायकराव भोळे व सूर्यकांत काळे यांजपेक्षाहि नारायणरावपाठक या ज्ञानमार्गी संशोधकाचें पात्र प्रो. वामनरावांनी फार बहारीने, कुशलतेने व सूक्ष्मतेने रंगविलें आहे. परंतु आता विस्तारभयास्तव त्याचें येथे वर्णन करीत नाही. हें पात्र रंगविण्यांतील त्याच्या जनकाचें तत्त्व मात्र त्या पात्राच्याच अनुभवाच्या जळजळीत शब्दांत येथे नमूद केल्याशिवाय राहवत नाही. ''मनुष्यजन्म हा केवळ ज्ञानप्राप्तीकरिता नसून देहधर्म संभाळून शक्य तेवढें ज्ञान मिळवावें, शक्य तेवढा कलाविलासाचा आनंद उपभोगावा, शक्य तेवढें इतरांच्या उपयोगी पडून त्यांना आनंद देण्याचा प्रयत्न करावा एवढ्या करिता मनुष्यजन्म आहे. केवळ देहसुखाने समाधान व्हावयाचें नाही, कारणआपण पशु नाही. केवळ ज्ञानमार्गानें समाधान व्हावयाचें नाही, कारण आपणांस जिज्ञासेशिवाय इतर आकांक्षाहि आहेत. केवळ कलेच्या पाठीमागे लागून उपयोगी नाही, कारण एकटी कला ज्ञानाची व नीतीची भूक शमवूं शकत नाही. केवळ कर्ममार्ग उपयोगाचा नाही, कारण ज्ञानाशिवाय मनुष्य आंधळा आहे; व कलेशिवाय आयुष्य नीरस आहे. तात्पर्य (उच्च वातावरणांतून हास्यास्पद रीतीने खाली येऊन मी म्हणतों की) मनुष्याने लग्न केलें पाहिजे, निदान मीं लग्न केले पाहिजे. कोणाशीं ते तुला ठाऊकच आहे. या बाबतींत पूर्वीचा तोरा सोडून देऊन काशी ढवळे हिला 'अगं अगं काशी, मला कां नेशी' असें म्हणण्याची मला पाळी आली आहे; पण या प्रसंगातून तुमच्यासारखे मध्यस्थ मला सोडवितील अशी आशा आहे.'' यावरून नारायणराव पाठकांच्या चरित्रांत झालेली क्रांति दिसून येईल.

ललित वाङ्मयाचा प्रधान हेतु 'शुद्धकला विलासात्मक मनोरंजन कीं नैतिक अथवा इतर प्रकारचें तत्त्वप्रतिपादन' याविषयी अलीकडे बराच काथ्याकूट होत असतो. हा वाद मला येथे उकरून काढावयाचा नाही. परंतु मला येथे एवढेंच स्पष्ट करावयाचें आहे की शुद्धविलासवादी कलाचतुर

वामनराव नव्हत. त्यांच्या पूर्वीच्या लिखाणांप्रमाणेच याही कादंबरींत त्यांचा एक निश्चित तत्त्वहेतु गोवलेला असून तिच्याद्वारें त्यांनी मोठ्या सुंदर रीतीने आपलें तत्त्वप्रतिपादन साधले आहे. किंबहुना, प्रा. वामनरावांच्या प्रतिमेची घडणच अशी आहे की, प्रत्यक्ष मानवी जीवनाच्या निरीक्षणानंतर प्रथमत: तिला बौद्धिक तत्त्वानुभूति घडते व मग तिच्या ठायीं या अनुभूतीच्या अनुरोधाने इंद्रियगोचर ललितसृष्टीचा संभव होतो.[४] म्हणजे या प्रकारच्या प्रतिभेच्या ठायीं अमूर्त अव्यक्तापासून मूर्त स्वरूपांतील व्यक्तसृष्टीचा संभव होत असतो. वामनरावांची 'सुशीलेचा देव'. ही कादंबरी पहा. तींत मानवी मनोविकासांत 'ईश्वर' कल्पनेचा विकास कसा घडतो, याबद्दल त्यांनी आपल्या मनाशीं अगोदर एक मानसशास्त्रीय उपपत्ति बसवून नंतर मग ती हाडामासाच्या पात्रांच्या प्रत्यक्ष जीवनक्रमाच्या विकासांत मूर्त स्वरूपांत चितारून दाखविली आहे असें आपणांस आढळून येईल. प्रस्तुत कादंबरींतही त्यांनी वैवाहिक जीवनासंबंधी व विशेषत: त्यांतील पतिपत्नीसंबंधाविषयी आपल्या मानवी जीवनाच्या सूक्ष्म निरीक्षणावरून मनाशीं प्रथमत:च ठरविलेले सिद्धांत प्रतिपादण्यासाठी निरनिराळीं तीन स्त्रीपुरुषांचीं युग्मके कल्पिलेलीं आहेत व त्यांचा वैवाहिक अथवा विवाहविषयक जीवनक्रम रेखाटला आहे. काळे दंपतीच्या चरित्रांत व्यक्तिविकासाच्या कल्पनेच्या नादीं लागून पतीशी समरस न होणाऱ्या स्त्रीचा संसार हा वर्ण्य विषय आहे; तर भोळे दंपतीच्या जीवनक्रमांत पतीच्या जीवनप्रवाहाशीं स्वत:चा लोप करून सर्वस्वी एकजीव होणाऱ्या स्त्रीचा चरित्रपट रंगविला आहे आणि नारायणराव पाठक यांच्या कथेंत एकाकी जीवनाचें अपूर्णत्व दर्शविलें आहे. अशा रीतीने वामनरावांनी या कादंबरीचे द्वारा वैवाहिक जीवनाची व त्यांतील पतिपत्नींच्या परस्पर सामरस्याची महतीच प्रतिपादिलेली आहे असें मला वाटते. "मानवी जीवनाच्या पूर्णतेसाठी विवाह हा आवश्यक आहे व तो केल्यानंतर पतिपत्नींनी आपलें वेगळें व्यक्तिमत्त्व राखण्याचा प्रयत्न करण्यापेक्षा परस्परांशीं एकजीव होणें अथवा सामरस्य पावणें, यांतच मानवी संसाराचें स्वारस्य आहे," हीच या कादंबरीची तात्त्विक शिकवण आहे यांत मला शंका वाटत नाही.

परंतु सुखाच्या संसाराची ही शिकवण प्रतिपादिताना प्रो. वामनराव हे कादंबरींतील आपली भूमिका लालित्यमाधुरी निर्माण करणाऱ्या कलाचतुराची असून ती रूक्ष तत्त्ववेत्याची किंवा पुराणिकाची नव्हे; ही गोष्ट विसरलेले नाहीत, हीच त्यांची खरी थोरवी आहे. "वाङ्मयनिर्मितीच्या बुडाशीं कांही तत्त्व असावें यांत गैर कांहीच नाही; उलट वाङ्मय तत्त्वविहीन नसावें, असेंच आम्ही म्हणूं. परंतु तत्त्वकल्पना मनांत सदैव जागृत ठेवून निर्मिलेली कलाकृति ही थोड्याशा अतिशयोक्तीने बोलावयाचें झाल्यास - रूपकाच्या (Allegory) वळणावर जाते; व त्यामुळे खऱ्या कलाविलासास एकंदरीने बाधच येतो. पहिल्या प्रतीची कलाकृति निर्माण व्हावयाची, तर कलानिर्मितीच्या वेळीं तिच्या बुडाशीं योजिलेलें तत्त्व किंवा बोध हा निर्मात्याच्या मनांत, मुक्तामीनाच्या पोटांतील वालुकाकणासारखा सलत न राहतां बासुंदींतील शर्करेप्रमाणे चहूंकडे सारखा विरून गेला पाहिजे; किंवा रुमालावर टाकलेल्या सुगंधबिंदूप्रमाणे सर्वत्र अदृश्य वातावरणरूपाने दरवळत राहिला पाहिजे. असें न होतां कलाचतुर आपल्या मनांत जर ते बोधात्मक तत्त्व सारखें घोटीत राहील तर ललितकृतींत केवळ तात्त्विक कल्पनांचीं निर्जीव बाहुलीं नाचविलीं जाऊन त्यांत जातीचें व्यक्तिमत्त्व राहणार नाही."[५] या कलात्म कसोटीस मनांतील मध्यवर्ति कल्पना अथवा बोधात्मक तत्त्व वाचकांच्या मनावर सारखें बटबटीतपणें आघात करीत राहील, अशी तिची रचना नाही. वर 'जवळ जवळ पूर्णपणें' असें म्हटलें आहे; कारण आपणांस अभिप्रेत असणारें तत्त्व त्यांनी कलेतील केवळ वातावरणाच्या अप्रत्यक्ष सूचनेद्वारांच सुचविलें आहे असें नव्हे; वामनरावांचें प्रत्यक्ष सूचक तत्त्वप्रतिपादनही अधून मधून डोकावतें. पण हें तत्त्वप्रतिपादन कथेचा

विरस करीत नाही. प्रत्यक्ष तत्त्वप्रतिपादन ललित साहित्यांत करावयाचेंच असल्यास निदान "लघुकथेंत किंवा इतर कोणत्याही कृतींत तत्त्वसूचना ही वर्षाकालांतील नैसर्गिक विद्युल्लतेप्रमाणे कोठें तरी चमकून जावी, आमच्या अर्वाचीन विद्युद्दीपाप्रमाणे तिचा सारखा झगझगाट नसावा"[६] अशाबद्दल कलाचतुराने दक्षता बाळगिली पाहिजे. आणि ही दक्षता मात्र वामनरावांनी पूर्णपणे बाळगिली आहे; यांत तिळमात्र संदेह नाही. त्यांचे तत्त्वप्रतिपादन कथेच्या ओघांत येतें व तें कतेशीं संबद्ध व तींतूनच निगालेलें असतें व म्हणूनच त्यामुळे रसहानि होत नाहीं. पायटीपेंत दिलेले उतारे याची सहज साक्ष देतील. एवंच वामनरावांच्या कलेंत तत्त्वाच्या आंबट दह्याचा गोळा श्रीखंडांतल्या-प्रमाणे लालित्याच्या साखरेशीं सारखा मिळून व विरून जाऊन एकजीव झला नसला; तरी बंगाली रसगुल्ल्यांतल्याप्रमाणे आंत म्हणजे पोटांत व बाहेर म्हणजे भोंवतालीं लालित्याचा पाक तो विपुल प्रमाणात धारण करून आहे. वामनराव कलाचतुर व तत्त्वज्ञ हे दोन्हीही आहेत खरे!!

समीक्षणाशिवाय कादंबरीचें सामान्य स्वरूप वरील प्रकारचें आहे व त्यावरून ती अलीकडील महाराष्ट्र वाङ्मयांत अस्सल दर्जाची कादंबरीका आहे हें वाचकांच्या लक्षात येईलच. अशी ललितकृति निर्माण केल्याबद्दल महाराष्ट्रांतील रसिक वाचक यांचे सदैव ऋणी राहतील, यांत शंका नाही.

अर्तात् कोणतेंहि पुस्तक पाठ्यग्रंथ म्हणून सूक्ष्म रीतीने वाचूं गेल्यास त्यांत बारीकसारीक दोष आढळावयाचेच. तसे ते याही कादंबरीत आहेत. परंतु ते अल्प प्रमाणांत आहेत व महत्त्वाचेही नाहीत. केवळ दिग्दर्शनाकरिता कांही याखाली नमूद करून हें (काळाने आणि आकाराने) 'लांबलेले' समीक्षण आता संपवितो- (१) पृ.३वर सरला काळे ही आपल्या भावी पतीस लिहिलेल्या पत्रांत स्वत:च्या श्यामल वर्णाची स्वत:च खूप टिंगल करत्ये; व तसेंच पृ. १७वर लग्नानंतर पतीस लिहिलेल्या आपल्या भावी अपत्याचा उल्लेख 'अमावस्येच्या कडेवर बालचंद्र' असा करत्ये. आणि एकंदरीतहि तिचा स्वभाव पाहतां तिला आपल्या स्वरूपाबद्दल कसलाही अभिमान नाही. इतकेंच नव्हे; तर सौन्दर्यदृष्ट्या आपण आपल्या अशातशाच आहोंत, ही भावना तिजजवळ सदैव जागृत असल्याचें दिसतें. परंतु याच्याउलट पृ. ९ वर तिचे पति विनायकराव भोळे आपल्या मित्रास लिहिलेल्या पत्रांत आपल्या पत्नीस तिच्या काळेपणाची चेष्टा केलेली आवडत नाही हें तिचें 'गुह्य' म्हणून लिहितात, हें जरा विसंगत दिसतें. यावर आपल्या व्यंगाची आपण व आपल्या माणसाजवळ चेष्टा केली तरी ती दुसऱ्याने केलेली मनुष्यास आवडत नाही असें मानसशास्त्र कदाचित् वामनराव सांगतील. परंतु सरलेच्याइतकी मोठ्या प्रमाणावर म्हणजे अनेक उपमा आणि रूपकें कल्पून स्वत:ची चेष्टा करणाऱ्या माणसाच्या बाबतींत हें मानसशास्त्र खरें ठरत नाही; हेंच त्यांस उत्तर. (२) इंदु काळे हीस बिंदुमाधव म्हस्कराने पळवून नेल्यानंतर ती पुन: जेव्हा परत आली, तेव्हां तिचें तिच्या पतीशीं त्याबद्दल कांहीतरी खुलाशाचें बोलणें झालें असलें पाहिजे. पण त्याचा पडसाद कोणाच्याच पत्रांत—भाऊ काळ्यासारख्या मेहुण्यास वैवाहिक बाबतींतसुद्धा अत्यंत मोकळेपणाने पत्रें लिहिणाराच्या पत्रांतसुद्धा—उमटूं नये याचे आश्चर्य वाटतें. (३) पृ. ११६ वर छोटीच्या 'परकर-पोलक्या'चा उल्लेख आला आहे. पृ. ६७ व पृ. ९२ वरील उल्लेखांवरून अनुमानें करावयाचीं तर ही छोटी ता. ४।२५ रोजीं जन्मली व ता. २।३।२७ रोजीं वारली. ही दीड वर्षाची पोर परकर-पोलकें घालीत असेल काय? (४) पृ. १२७ वरील बिंदुमाधव म्हस्कराने आत्महत्येपूर्वी कृतकृत्यांबद्दल अपराद्ध व्यक्तींजवळ पश्चात्ताप व्यक्त करून पापक्षालन करण्यासाठीं लिहिलेलें पत्र त्याने भाऊ काळ्यांस न लिहितां विनायकराव भोळ्यांस कां लिहिलें, याला कांही सबळ कारणें दिसत नाहीत. (५) पृ. ८-९ वर 'लेक्चरशिप' असा



अनुक्रमणिका

शब्द दोन वेळां आला आहे; पृ. १७ वर 'पायबंद करणारी' असा शब्दप्रयोग आहे; पृ. ९७ वर ता. ७।३।२७ च्या 'ज्ञानप्रकाशां'तले ता. ९।३।२७चें सातारा जिल्ह्यांतील अंबेवाडी गांवचें बातमीपत्र छापलें आहे; इत्यादि. हे सर्व अर्थातच मुद्राराक्षसाचे प्रताप असावेत.

पण एकंदरींत छपाई चांगली आहे. पुठ्यावरील रा. दाणाईत यांनी काढलेलें कादंबरीतील प्रमुख पात्रें संसारसागरांत तरंगत असल्याचें चित्र सूचक आहे. यापात्रांच्या कृष्णच्छायात्मक आकारचित्रांवरून (Silhouttes) ती कोणकोण असावींत हें ओळखण्यांत मौज वाटते व थोड्याशा निरीक्षणानें ती ओळखतां येतातहि.

---

१. An Introduction to the Study of Literature, p. 189-90, footnote.

२. Psycho-analysis या अर्वाचीन मानसशास्त्रीय परिभाषिक संज्ञेस मराठींतील समानार्थी संज्ञा म्हणून 'मनोविश्लेषण' ही संज्ञा हल्ली वापरली जात आहे. त्यापेक्षा 'मनोविकलन' ही संज्ञा अधिक अर्थवाहक, सोपी व 'संकलन' (Synthesis) या संज्ञेशी विरोधानें जुळणारी अशी असल्यामुळे ती प्रचारांत यावी हें इष्ट दिसतें. (विकल् = वेगळें किंवा वियुक्त करणे. संकल् = गोळा किंवा संयुक्त करणें. 'मनोविकलनशास्त्र' या अर्वाचीन मानसशास्त्रीय उपशास्त्राची प्रस्तुत लेखकाने पूर्वी एक खुलासेवजा व्याख्या केली होती. ती येथे उध्दृत करितो: "मनाचें विशेषत: गूढ व खोल अबोधात्मक मनाचें विकलन (Analysis) म्हणजे त्यांतील इच्छाभावनाविकारादिकांचे सूक्ष्म धागेदोरे म्हणजेच कलान्कला उकलून स्पष्ट करून दाखविणें. (व अशा रीतीने मानसिक व इतर रोगांचा परिहार करण्यास मदत करणें) हें या शास्त्राचें प्रधान अवतारकार्य असल्यामुळे त्यास फ्रॉइडने 'मनोविकलनशास्त्र' असें नांव दिलें आहे." ('श्रीनिवास व्याख्यानमाला,' औंध, १९३२, 'मानसशास्त्रांतील सद्य:कालीन मतमतांतरें.')

३. यासंबंधांत प्रो. वामनरावांचा दृष्टिकोण स्पष्टपणें लक्षांत येण्याच्या दृष्टीने पुढील उतारे वाचकांस उद्बोधक वाटतील म्हणून ते या टीपेंत मुद्दाम उद्धृत करीत आहे:

**(उतारा-इंदुमती काळे हीस विनायकराव भोळे यांचे पत्र.)**

"सौभाग्यवतीही मी मुलींशी फार बोलतों म्हणून अधून मधून मला बोलते व संशयखोरपणा दाखवते. (सगळ्याच बायका संशयखोर असतात का?) तिच्या भलत्या संशयांना अर्थात् मी फारशी भीक घालीत नाही, कारण तिचे संशय क्षणभरच टिकतात. (आणि पुष्कळ वेळ टिकले तरी भलत्या संशयांना भलतें महत्त्व देऊन ध्येय कसें सोडतां येईल?)"

**(उतारा-विनायकराव भोळे यांस इंदुमती काळे हिचें पत्र.)**

"आपण लिहिलें आहे की सौभाग्यवतीने भलते संशय घेतले तरी मी आपलें ध्येय सोडणार नाही. निश्चय उत्तम आहे पण पतीने जर का भलते संशय घेतले तर पत्नीने मात्र आपलें ध्येय सोडावें असें आपलें मत दिसतें. असा फरक का? प्रश्न जरा भांडखोरपणाचा आहे, पण खरा व जिव्हाळ्याचा आहे, म्हणून विचारला आहे."

**(उतारा-इंदुमती काळे हीस विनायकराव भोळे यांचें पत्र.)**

"आपल्या मागील पत्रांतील प्रश्न बोंचक आणि मार्मिक (आणि मर्मभेदकहि!) होता. पतीकरीता तुम्हाला ध्येय सोडण्यास सांगतों आणि मी स्वत: पत्नीकरिता आपलें ध्येय सोडण्यास तयार नाही, यांत विसंगति दिसते खरी. माझ्याहि ती ध्यानां आली होती, पण म्हटलं की तुमच्या ध्यानांत येणार नाही, उगीच कशाला खोलांत शिरा?

"हल्लीच्या समाजांत (आणि पुढेहि कित्येक शतकें) स्त्रियांचे ध्येय संसार करणें हें असणार; म्हणून त्यांनी पतीला नापसंत असलेली, अतएव या ध्येयाच्या आड येणारी, गोष्ट टाळावी. पुरुषांचें ध्येय याहून भिन्न आहे, म्हणून त्यांनी पत्नीच्या इच्छेला जरा बाजूला ठेवलें तरी हरकत नाही, असें माझे थोडक्यांत उत्तर आहे......स्त्रियांना सुंदर कौटुंबिक संसार पाहिजे असतो; पुरुषांना कौटुंबिक संसारांतल्यापेक्षा उच्चतर पराक्रम हवा असतो. या नियमाला अपवाद आहेत; पण सामान्यत: हा नियम बरोबर आहे....पत्नीने घेतलेल्या संशयास किती महत्त्व द्यावें; हा प्रश्न सोडून माझ्या पुढच्या व्यावहारिक प्रश्नासंबंधी मी तुम्हाला असे सांगतों की, माझ्याबद्दल तिचा संशय मधून मधून

डोकावतो; आणि माझ्यावरच्या प्रेमाच्या माराने तो दडपून जातो, आणि म्हणूनच मी तिकडे दुर्लक्ष करतो. खरोखरीच तों प्रबळ झाला तर काय करावें, हा विचार पडेल. आपल्या पतीचा आपल्याबद्दलचा संशय दृढ व प्रबळ होत चालला आहे, म्हणून आपण हटवादीपणा करूं नये असें माझें म्हणणें." इत्यादि.

४. ज्यांच्या प्रतिभेची मानसशास्त्रीय घडण याच्या अगदी उलट आहे अशा लेखकांपैकी आदर्श लेखक म्हणजे प्रो. ना. सी. फडके. यांच्या प्रतिभेस प्रत्यक्षाच्या अवलोकना नंतरही व्यक्त अथवा इंद्रियगोचर ललितसृष्टीच कल्पनेच्या वातावरणांत दिसत असत्ये व तिचें चित्रण हाच त्यांचा कलाविलास आणि या कलाविलासांतच लालित्ययुक्त कल्पनासृष्टीचें चित्रण करतां करतांच अप्रत्यक्ष रीत्या एखादे अव्यक्त तत्त्व सहज कुठेंतरी स्फुरून जातें. प्रो. फडक्यांस मान वेळावणाऱ्या, अंबाडे पुन: पुन: चांचपून पाहाणाऱ्या किंवा नाकपुड्या फुगवणाऱ्या तरुणी व क्रीडानिपुण अथवा कलाचतुर तरुण हेच प्रथम दिसतात व मग त्यांजबद्दलच्या गोष्टी सांगताना त्याच्या निवेदनांत अप्रत्यक्षपणे एखादें तत्त्व येऊन जातें.

५. प्रस्तुत लेखकाच्या श्री. भा. वि. वरेरकर यांच्या 'स्वैरसंचारा'वरील अभिप्रायांतील -- लोकशिक्षण, डिसेंबर १९३५, पृ. ७४१-४२.

६. लोकशिक्षण, पूर्वोल्लिखित स्थळीं.



---

## नवीन आजीव सभासद
## दापोली शाखा

१. भाबीडा शैलेश सुरेश
२. मोहिते अरुण काशिराम
३. सावंत राजन दत्तात्रय
४. म्हामुणकर नितीन विष्णू
५. सैतवडेकर श्रावणी मंगेश
६. जगदाळे वर्षा संदेश
७. राऊत संदेश धर्माजी
८. कडके प्रिती पराग
९. मेहता अस्मिता आशिष
१०. मेहता आशिष चंद्रकांत
११. जगदाळे संदेश पांडुरंग
१२. सैतवडेकर मंगेश चंद्रकांत
१३. वाडकर मुनाफ युसूफमियाँ
१४. निंबाळकर सुरेश तुकाराम
१५. नाईक विठ्ठल गोविंद
१६. भाटकर मुनाफ हुसैन
१७. कदम महेश रघुनाथ
१८. भावे सुनंदन जगन्नाथ
१९. कांबळे प्रशांत गंगाराम
२०. जाधव राजेश भिकाजी
२१. पाटील उत्तम राजाराम
२२. धोपट शैलेश महादेव
२३. गांधी कैलास विनायक
२४. लिंगावळे विरेंद्र उदय
२५. घैसास जयंत विनायक
२६. कांबळे रुहिक्षा राजेंद्र
२७. गोरे गंगा शिवाजी
२८. भागवत उमेश विठ्ठल
२९. चव्हाण सुनील गणपत
३०. पाताडे नंदिनी नंदकिशोर
३१. कांबळे मनोजकुमार ज्ञानदेव
३२. शिवगण शिवाजी राजाराम
३३. ओक प्रसाद दत्तात्रेय
३४. मोरे मंगेश राजाराम
३५. रानडे प्रसाद यशवंत
३६. मराठे संतोष शरदचंद्र
३७. केळकर सुरेश रामचंद्र
३८. शेंबेकर प्रशांत कृष्णा
३९. मोटे सत्यवान विठ्ठल
४०. पोंक्षे मकरंद सुभानू
४१. निर्बाण अशोककुमार जयकिसन
४२. रोगडे श्रीरंग मारोती
४३. शिंदे महेश सिताराम
४४. शेठ निलेश अशोक
४५. कदम संतोष शिवराम
४६. पवार विजयसिंह चंद्रकांत
४७. सागवेकर महेश मोहन
४८. गोरे शिवाजी नामदेव
४९. राजपुरे स्मिताली संदीप
५०. राजपुरे संदीप रामचंद्र
५१. शिर्के संतोष
५२. शिर्के गौरी संतोष








अनुक्रमणिका

अंतर्बाह्य निबीड काळे भवतालीचे जळण्यासाठी...वाचावे !

## ।। दुर्मिळ ग्रंथधन घरपोच ।।



नवतीचे पर्व

**विदर्भ साहित्य संघ**

| | |
|---|---|
| लोक साहित्य संपदा : ना. रा. शेंडे | धन्यतेची थाप : डॉ. वि. भि. कोलते |
| आणखी गडकरी : डॉ. मधुकर आष्टीकर | वक्ता दशसहस्त्रेषु : संपा. वि. स. जोग |
| तीन भाषणे :गणेश व्याख्यानमाला १९७७ : डॉ. र. श. केळकर | विदर्भ साहित्य संमेलने अध्यक्षीय भाषणे: |
| 'प्रातिभ' लघुकथा संग्रह : प्रा. ज. रा.फणसाळकर | खंड १ : साहित्यभूषण तु.ना. काटकर |
| समग्र बजाबा : द. भा. प्रधान | खंड २ : डॉ. श्रीपाद भालचंद्र जोशी |
| ज. के. उपाध्ये यांची कविता : संपा.डॉ. आशा सावदेकर | युगवाणी साहित्य सूची-नियमित/पुरवणी : केशव जोशी |
| दक्षिणेतील दोन आचार्य : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | वैदर्भीय प्रबंध सूची (१९३९-९८): डॉ. व. वि. कुलकर्णी |
| कविता विदर्भाची : डॉ. आशा सावदेकर | कै. वा.ना. देशपांडे यांचे स्फुट लेखन : |
| छंदशास्त्र : एक अध्ययन : कुंदर दिवाण | तुलाधर, चित्रगुप्त, त्रिविक्रम |
| वसंत वैभव : संपा. डॉ. कुंदा केळापुरे/डॉ. मदन कुळकर्णी | संपा. प्रा. राम शेवाळकर |

**एकूण ग्रंथ : २०** **विशेष सवलत ४०%**

**एकूण ग्रंथ मूल्य : ₹ २०००/-** **एकूण संच मूल्य : ₹ १२००/-**

**।। विद्यापीठ/महाविद्यालयीन ग्रंथालये आणि जिज्ञासू मराठी भाषक अभ्यासकांनी संपर्क साधावा ।।**

■ धनादेश/धनाकर्ष पाठविताना यथोचित वटणावळीची भर घालूनच पाठवावा. ■ सामान्यत: हे संच आपल्या प्रतिनिधींना सुपूर्द करता येतील किंवा पार्सलने हवे असल्यास अधिक खर्च (अंदाजे रु. ३००/-) पाठवावा लागेल.

**परंपरा, संस्कृती आणि अस्मिता यांची युगसाक्षी धारा आता नवनवोन्मेषशाली रूपबंधात**

विदर्भ साहित्य संघाचे वाङ्मयीन त्रैमासिक

# ।। युगवाणी ।।

संपादक : अजय देशपांडे

*आता संकेत स्थळ yugwanivss.com वर वाचा*

**वार्षिक वर्गणी रु. २००/-, त्रैवार्षिक वर्गणी रु. ५००/-**

सरचिटणीस, विदर्भ साहित्य संघ, सांस्कृतिक संकुल, झाशी राणी चौक, सीताबर्डी, नागपूर-४४० ०१२
www.vssngp.org ०७१२-२५५३७६७/२५४००१८ Email: vssngp@gmail.com

# इतिहास - परिषद् - अध्यक्षीय भाषण

श्री. गो. स. सरदेसाई, कामशेत

*[मराठ्यांचा इतिहास उच्च नीतितत्त्वांवर घडला आहे. मराठ्यांनी कुणालाही बुडविले नाही की, तुझे ते माझे असे म्हणून तैमूरलंगासारखी कत्तल करून शिरांचे मनोरे उभे केले नाहीत. नादीरशहाने बादशाही धुळीस मिळविली असता; संतमालिकेत शोभणाऱ्या शाहू छत्रपतींनी पेशव्यास आज्ञा करून बादशाहत राखली. संभाजी छत्रपति व संताजी घोरपडे यांचा खून करण्यात औरंगजेबाला धन्यता वाटली; पण त्याच संताजीच्या हातात खानाजादखान हाती आला इतिहासाचा बुद्धिपुरःसर विपर्यास करून तो सांगितला जात असल्याची खंत इतिहासकार (गो. स.) सरदेसाईंनी व्यक्त केली आहे. त्याची मीमांसा करताना ते म्हणतात की, मराठ्यांच्या इतिहासाला हिंदी आणि इंग्रजीत लिहिले गेले नाही; त्यामुळे मराठ्यांचा खरा इतिहास आणि कैफियत जगापुढे आली नाही. १-२ जून १९४३ रोजी इतिहास परिषदेच्या अध्यक्षपदावरून केलेले रा. गो. स. सरदेसाईंचे भाषण आजही प्रेरक आहे. -संपादक]*

(म. सा. परिषदेने ता. १-२ जून १९१४ या दिवशीं भरविलेल्या अितिहासविषयक परिषदेच्या अध्यक्षीय भाषणांतील कांही महत्त्वाचे अुतारे खाली दिलें आहेत. स्थलसंकोचास्तव समग्र भाषण देणें शक्य झालें नाही यास्तव वाअीट वाटते.)

१. आजपर्यंतच्या अभ्यासाने अितिहासविषयक कित्येक कायमचीं तत्त्वें मला पटून बसलीं आहेत. कालमानाप्रमाणे तीं बदणारीं आहेत. इतिहासाचा प्रत्यक्ष अुपयोग आम्हां मानवांस बिलकूल नाही. सुताराचें किंवा गवंड्याचें काम केलें तर थोडीबहुत मजुरी तरी मिळेल, ती देखील अितिहासापासून प्राप्त होणारी नाहीं. शाळा-कॉलेजें नसतीं तर मला वाटतें अितिहासाकडे कोणीं ढुंकूनदेखील पाहिलें नसतें. शालोपयोगी पुस्तकें लिहिणारांना व प्रकाशणारांना कांही थोडी प्राप्ति होते, पण खरा अितिहास बनविणारे राजवाडे-खऱ्यांसारखे प्रचंड अभ्यासक आजन्म दरिद्री राहिलें. यास्तव मी म्हणतों, अितिहासाचा अुपयोग प्रत्यक्ष असा कांही नाही. पण मनुष्यस्वभावच असा आहे की, यशापयशाच्या बाबतींत मागील काळाकडे पाहून तो त्याची कारणपरंपरा शोधूं लागतो. ती खरी किंवा बिनचूक असतेच असें नाही, पण तिच्यावर त्याचा विश्वास बसतो, त्यास धीर येतो, नुकसान झालें तर सुधारणेचा मार्ग शोधून काढतो. अशा प्रकारची ही मानसिक कसरत प्रत्येक अिसम आपापल्यापुरती मार्गदर्शी करून घेतो. कसरत करणाराच्या मगदुराप्रमाणे ती व्यक्तीस व राष्ट्रास कमीअधिक उपयोगी पडते. मराठ्यांचे राज्य अनेकांनी कपटाने कमावलें; तें क्षणमात्रांत नाहीसें झालें. या घोर परिणामाची चिकित्सा शत्रु-मित्रांनी करून आपापल्यापरी निदान ठरविलें. आपल्याकडे गोपाळराव हरि देशमुख, विष्णुशास्त्री चिपळूणकर, ज्योतिबा फुले, न्यायमूर्ति रानडे,

संशोधक राजवाडेप्रभृतींनी चर्चा करून कित्येक सत्त्वें ठरविलीं. हा जसा अेक दाखला सांगितला, तशाच प्रकारें पूर्वीच्या मोगलांचे व अितर अितिहास बनत गेले. अर्थात् हा अितिहास म्हणजे ज्यांचीं त्याचीं वैयक्तिक मतें होत. मनुष्याची बुद्धि कोती व स्वार्थी असल्यामुळे अितिहासकाराच्या कृतींत त्याचे वैयक्तिक मनोविकार अुतरत जातात. त्यांत अस्सल सत्याचा गाभा फारच अल्प असतो. शिवाजीनें अफझलखानास मारलें, किंवा पानपतावर मराठ्यांचा पराभव झाला, अेवढें अल्प सत्य स्थूलमानाने स्वीकारतां आलें तरी तेवढ्याने आपली जिज्ञासा भागत नाही. हे प्रकार कां घडले, कसे घडले, त्यांतील यशापयशाबद्दल जबाबदार कोण, त्यांत नीति-अनीति कोणीं किती पाळली अशा प्रकारची चिकित्सा करणें हेंच अितिहासाचें मुख्य प्रयोजन असून लेखकाच्या भावनेप्रमाणे तें भिन्न बनत जातें. गतगोष्टींचें विवेचन करतांना आधार ध्यानांत घ्यावे लागतात. आज आपल्या सभोंवार प्रचंड युद्ध चालू आहे, त्यांतील प्रत्येक घडामोडींत सत्यांश किती हें जर आपणांस नक्की ठरवितां येत नाही तर गतकालीन अितिहासाचा प्रकार काय सांगावा! अितिहासांत सत्य धुंडाळण्याचा प्रयत्न निष्फल असून हें सत्य ज्याच्या त्याच्या भावनेप्रमाणे बदलत जाणारी वस्तू होय.

मग आपणांस अितिहासाचा अुपयोग काय, हा प्रश्न प्रामुख्याने पुढे येतो. त्या संबंधाने अितकेंच सांगतां येईल की; गतकालाची पुष्कळशी बरीवाईट माहिती अितिहासावरून विद्यार्थ्यांस मिळते, भाराभर गतकालीन वृत्तें जमा करून त्यांवरून कार्यकारणमभाव ठरविण्याची कसरत त्याच्या बुद्धीस अल्पस्वरूप मिळते. हे केवळ आनुषंगिक अुपयोग अितिहासाचे झाले. पण माझ्या मतें सर्वांत मोठा फायदा राजकारणी पुरुष आपल्याला मतलबसिद्धीकडे गतकालीन अितिहासाचा कसा करून घेतो हें मनांत आणलें तर पूर्वीच्या मानाने आजच्या मनूंत केवढें परिवर्तन घडून येत आहे; याची आपणांस कल्पना होईल. प्रत्येक राष्ट्राचें राजकारण. आज कुशल मुत्सद्दी मागील अितिहासावर खेळवीत आहेत. युरोपांत हिटलरने पहिल्या जागतिक युद्धाचा अनुभव आपल्या हातीं राजसत्ता मिळविण्याकडे कसा केला; हें आपण जाणतों; आणि ती सत्ता आपल्याहातीं टिकविण्याकडे तो करीत आहे. याच पायावर त्याने सर्वाधिकार पैदा करून जर्मन राष्ट्राचा जम बसविला. अिटली, रशिया अित्यादि राष्ट्रांचे धुरीण तोच प्रकार आपापल्या राष्ट्रासाठी करीत आहेत. मुख्य प्रधान चर्चिल पांच हजार वर्षांचा हिंदुस्थानचा अितिहास लपवून अलिकडील शेपन्नास वर्षांतला ब्रिटिश साम्राज्यशाहीचा जो बोलबाला गाजला; तो तसाच पुढे चिरस्थायी करण्याचा हट्ट धरीत आहे. त्याचा उघड भाव असा दिसतो, हिंदी लोकांनो, तुम्हीं नेभळेपणाने आपलें राज्य गमावून आमचा आश्रय केला. आता तुमचें संरक्षण करण्याची जबाबदारी आमचेवर आली; ती आम्हांस सोडतां येत नाही. आमचे हातून तुमचें संरक्षण न होअूं शकलें तर आम्ही आमचे दोस्त जे अमेरिकन त्यांचें सहाय्य घेअूनहि आम्ही आपली जबाबदारी पार पाडूं. मी प्रधानकीवर आहें तोपर्यंत तुमच्या संरक्षणाचा अन्य मार्ग मी स्वीकारणार नाहीं. आफ्रिकेचे सर्वाधिकारी स्मट्स्साहेब चर्चिलची पृष्ठरक्षा करीत आहेत.

पाकिस्तानचे पुरस्कर्ते जनाब जिना गतकालीन अितिहासाचा अुपयोग कसा करितात तेंहि ओघाने ध्यानांत घेण्याजोगें आहे. ते सांगतात, हिंदु हो, आम्हीं अल्पसंख्याकांनी बाहेरून येअून तुम्हां नेभळ्यांस जिंकिलें, तुमचीं मंदिरें धुळीस मिळविलीं, मूर्ति फोडिल्या, तुम्हांस बाटवून आम्ही आमची संख्या वाढविली, पांचशें वर्षे तुमच्या मानेवर आम्हीं आपल्या सत्तेचें जूं बसविलें, असे आम्ही पराक्रमी असतां आज तुम्ही आम्हांस भलत्याच गमजा सांगूं लागलां तर आम्ही त्या बिलकूल चालूं देणार नाहीं. अशा रीतीने जो तो आपल्या मतलबाकडे मागील अितिहासाचा अुपयोग करून कसा घेतो; त्याचीं थोडीं ठळक अुदाहरणें आज आपल्या दृष्टिसमोर असलेलीं, ओघास आलें, म्हणून सांगितलीं.



अनुक्रमणिका

## २. मराठ्यांच्या अितिहासाचें वैशिष्ट्य

मराठ्यांनी शेपन्नास वर्षेपावेतो हिंदुस्थानावर सार्वभौम सत्ता गाजविली. बाळाजी विश्वनाथाने बादशाही सनदांनी बादशहास आपल्या छत्राखाली घेतल्यापासून थोरल्या माधवरावाच्या मृत्यूपर्यंत, किंबहुना सवाअी माधवरावाच्या अंतापर्यंत, हिंदी राजकारणाचें केंद्र सातारा-पुण्यांतून हालत होतें. पेशव्यांना विचारल्याशिवाय कोणतेंहि महत्त्वाचें राजकारण परभारें सिद्धीस जात नव्हतें. अनेक राजकारणी पुरुष राज्याचे हक्कदार पुण्यांत येअून वर्षानुवर्ष खटपट करीत. या संबंधाचा भरपूर पुरावा डोळे अुघडून पाहाणारास स्पष्ट दिसेल. आज जशी हिंदी जनतेची आरोळी अमेरिकेच्या कानापर्यंत पोंचूं नये, अशी कारवाअी घडत आहे, तशाच प्रकारची कारवाअी शेदीडशे वर्षांपासून आमच्या अितिहाससंबंधाने चालत आली असून, ती हाणून पाडण्याचा योग्य प्रयत्न आम्हीं बिलकूल केला नाही. मराठ्यांच्या अितिहासाचे खरें हृद्गत व त्यांतील प्रसिद्ध व्यक्तींची कर्तबगारी आमची आम्हांसच जर धड समजली नाही; तर ती बाह्य जगास कशी पटणार? अेक तर, असा पुरावा दाखविणारें साहित्य अलीकडेस बाहेर आलें असून तें मराठी भाषेंतच अडकून पडलें आहे. शिवाय आमच्या संशोधकांनी अिंग्रजी भाषेवर बहिष्कार घातल्यामुळे आमचा सर्व पुरावा बाह्य जगास अज्ञात राहिला. स्वराज्याचा ताजा अनुभव प्राचीन काळीं व अलीकडच्या यादवांनंतरचा फक्त मराठ्यांना आहे; आणि त्याबाबत भरपूर राजकारणी अुत्कृष्ट कागद मराठ्यांशिवाय दुसऱ्यांचे नाहीत. या दोनच गोष्टींनी मराठी अितिहासास वैशिष्ट्य आलें आहे; अितकेंच नव्हे तर त्यांतील विषयांतहि अेक प्रकारचें हृदयंगम कौतुक भरलेलें आहे, तें या प्रसंगी दाखविणें, मला वाटतें, युक्त होअील.

पराक्रमी व्यक्ति राष्ट्राला भाग्यास चढवून त्याचा अितिहास बनवितात हा आजचा अनुभव मराठशाहींत उत्कृष्ट व्यक्त झाला. छत्रपति शिवाजी, बाजीराव व थोरले माधवराव पेशवे, तसाच हातींतोंडीं घास आलेला सवाअी माधवराव अित्यादि राष्ट्रपुरुषांचे मृत्यु अकालीं झालेले पाहून मनास अवर्णनीय अुद्वेग वाटतो. हे अंत वाचवत नाहीत; आणि वाचल्यावर वाटतें आमच्या देशात अुद्धार होअूंच नये; अशी परमेश्वराची अिच्छा आहे कीं काय? औरंगजेबास चहूंकडून ग्रासीत आणून त्यास समग्र गिळण्याची संपूर्ण तयारी झाली असतांच शिवाजीमहाराजांना केवळ पन्नाशींत अकस्मात् मृत्यु यावा; आणि औरंगजेबाने ८९ वर्षे जगावें हा दैवयोग नाही तर काय? शिवाजीला आणखी दहापांच वर्षे अवधि मिळता; तर पुढचा अितिहास साफ बदलून गेला असता. बाजीरावाची तीच गत. निजाम, बादशहा, पोर्तुगीज, अिंग्रज अित्यादि विरोधकांस ज्या बहाद्दराने दातीं तृण धरून पायांशीं लोटांगण घेण्यास लाविलें, त्याला चाळिशींतच मृत्यु यावा, नुसतीं पांचचार वर्षे जास्त मिळू नयेत, हा काय अीश्वराच्या घरचा न्याय म्हणावा? थोरल्या माधवरावाने तर सर्व शत्रू पादाक्रान्त करून अठ्ठाविशींत कारभार आटोपला. त्याला आणखी पांचदहा वर्षे मिळालीं असती तर हैदर, अिंग्रज, राघोबा अित्यादींचें कांडात निघालें असतें. लगेच सवाअी माधवराव जन्मास आला. समस्त राष्ट्रास वाटलें थोरल्या माधवरावानेच आपले अपुरे कार्यभाग संपविण्यासाठी पुन: अवतार घेतला. करतळींच्या फोडाप्रमाणे सर्वांनी त्याची जोपासना केली; आणि आता दैन्य संपलें, असें वाटूं लागतांच त्यानेहि अकल्पित रीतीने अिहलोकांतून प्रयाण करावें, यास केवळ अिंग्रजांची सद्दी अेवढेंच म्हणतां येअील. या बनावाने द्वितीय बाजीरावास समग्र राज्य बुडविण्याची संधि मिळाली. हे प्रकार कार्यकारणभावाने सोडवितां आले, तरी ते विचारशक्तीस कुंठित केल्याशिवाय राहात नाहीत. मराठ्यांचें राज्य बुडण्याचीं हीं धडधडीत कारणें दृष्टिआड करून शस्त्रास्त्रांची हेळसांड, जातिभेद, आर्थिक दैन्य अशीं नानाविध असंबद्ध कारणें शोधीत बसण्याची सवय आम्हांस



अनुक्रमणिका

अिंग्रज लेखकांनी शिकविली, ती अद्यापि आपण मान्य करीत आहों. Human destinies are often regulated by the play of the contingent and the unforeseen (Fisher's History of Europe.) म्हणजे आकस्मिक अतर्क्य घडामोडी होअून मानवी व्यवहारास भलतेंच स्वरूप प्राप्त होतें, असें अेक विद्वान् आधुनिक अितिहासकार म्हणतो त्यांतच पुष्कळ तथ्य आहे.

मराठ्यांच्या अितिहासांत आणखी अनेक अुच्च तत्त्वें भरलेलीं आहेत. मुसलमानांनी या देशावर राज्य केलें, मराठ्यांनी केलें, आज अिंग्रज कसे करीत आहेत; तें तर आपण प्रत्यक्षच पाहत आहों. मराठ्यांच्या समग्र अितिहासांत मुसलमानांच्या तोडीचा अेकहि अत्याचार दाखविता येणार नाही. तयमूरलंगासारखे त्यांनी शिरांचे मनोरे रचले नाहीत, अब्रूरक्षणासाठी बायकांना जोहार करावे लागले नाहीत. गुलामकादरासारखी बादशहाची व त्याच्या पवित्र सिंहासनाची विटंबना केली नाही. औरंगजेबाने बंधु दारांचें शीर कापून तें सुवर्णपात्रांत आपल्या पित्यास नजर केलें, असले अमानुष प्रकार मराठ्यांच्या अंत:करणांस शिवलेहि नाहीत. अेका नारायणरावाच्या स्वजातीय खुनापलीकडे निष्कारण वध त्यांनी शत्रूचाहि केला नाही. संभाजी छत्रपति व संताजी घोरपडे यांचे खून करवून औरंगजेबाने कृतकृत्यता मानली, पण त्याच संताजीच्या हातांत, त्याचा सामान्य अुमराव खानाजादखान युद्धांत पाडाव आला असतां, संताजीने त्यास आपली संरक्षक फौज देअून बादशहाचे भेटीस पाठवून दिलें. नादीरशहाने बादशाही धुळीस मिळविली आणि तख्त रिकामें झालें असतां, संतमालिकेंत शोभणाऱ्या शाहू छत्रपतीने पेशव्यास आज्ञा करून बादशाहीचा सांभाळ केला; निक्षून कळविलें की नवें मंदिर अुभारण्यापेक्षा जुन्याचा जीर्णोद्धार करण्यांतच जास्त पुण्य आहे.

पण मराठ्यांच्या अितिहासांतले असले अुच्च नीतीचे मासले विध्वंसकांपुढे सांगून काय अुपयोग! ज्यांना सत्य, न्याय, परोपकार, गरीबांचे संगोपन अशा अुच्च गुणांची दरकार वाटत नाही; आणि जे दुष्ट स्वार्थाने अंध बनले आहेत, त्यांना त्यांच्याच तोडीचे अुपाय शिकविल्याशिवाय कसें भागणार? हल्लीच्या महायुद्धाच्या मनूंत तर हजारो वर्षे मान्य झालेलीं जीवितमूल्येंच साफ बदलून गेलीं असून थापेबाजीला अूत आला आहे. पण अिंग्रजांची ही कावेबाज राजनीति, आज नवीन निर्माण झालेली नसून ती पूर्वीपासूनच आपल्या अितिहासाच्या बोकांडीस बसलेली आहे. प्राचीन काळापासून मुसलमानांच्या आगमनापर्यंत या भूमीला आर्य हें सार्थ नांव प्राप्त होअून, जीवनाचीं मूल्यें कायम होअून बसलीं. सर्व जन्तुजाताला अुच्च पदवीप्रत पोंचवायचें, सर्वांच्या सुखाची-पशुपक्ष्यांची देखील-सोय पाहायची हा त्या पूर्व मनूचा दंडक होता. त्यांत बळी तो कान पिळी या अधम तत्त्वाला जागा नव्हती. या प्राचीन अुच्च तत्त्वाला पहिला धक्का मुसलमानांनी-गज्नवी महंमूद, अल्लाअुद्दीन खिलजी, तयमूरलंग प्रभृतींनी दिला. तुझ्यापाशीं आहे तें तुला ठार करून मी जबरदस्तीने घेणार; या न्यायाचा अवलंब करून त्यांनी या सुवर्णभूमीची संपत्ति लुटून बाह्य देशांत नेण्याचा पायंडा पाडिला. ही प्रथा अेतद्देशीय आर्यांना मान्य नव्हती. धर्माच्याबाबतीत कोणी कोणावर जबरदस्ती करू नये, हे तत्त्व आर्यांनी पाळून यवन, अिराणी, शक, हूण असे नानाविध परदेशी लोक हिंदभूमींत वेळोवेळीं आले त्या सर्वांस त्यांनी आत्ममय करून सोडिलें. पण जेव्हा त्यांना पुढे मुसलमानांच्या संहारक स्वभावाची पारख झाली; तेव्हा त्यांस धर्मबाह्य ठरवून दूर ठेविलें. मुसलमानांच्या पश्चात युरोपीय लोक या देशांत आले, त्यांनी जरी मुखाने व्यापाराचा व शान्तीचा जप चालविला; आणि मंदिरें व मूर्ति प्रत्यक्ष फोडल्या नाहीत, तरी आपल्या जहांबाज राजकारणाने अनेक युक्त्यांनी द्रवशोष करून या सुवर्णभूमीला दारिद्र्यांत लोटलें. त्याचे कष्ट आपण अद्यापि अनुभवीत आहों.

### ३. अितिहासाचा बुद्धिपुरःसर विपर्यास.

पाश्चात्यांच्या जबरदस्त राजकारणाने मराठ्यांचा अुज्ज्वल अितिहास अत्यंत विकृत बनला आहे. मराठ्यांनी सगळ्या लोकांस नागविलें, जाचलें, लुटलें, त्यांचा छळ केला, प्रत्यक्ष मोगल बादशहास कैदेंत वागविलें; अशी भलतीच ओरड करून, आम्ही आलों; म्हणून तुमची सुटका होअून तुम्हांस सुखाचे दिवस दिसले, अशी त्यांनी राजपूत, बंगाली, कानडी अित्यादि मराठेतर राष्ट्रिकांची समजूत घातली. लेक, वेल्स्ली, माल्कम, अेल्फिन्स्टन अित्यादि बहादुरांनी जो हा विपर्यास चालू केला, त्याचाच अनुवाद अितर अितिहासकारांनी असा कांही बेमालूम करून सोडला की; मराठ्यांना अितिहासांत स्थानच राहिलें नाही. मोगलांचे अनुयायी अिंग्रज बनले. अशा या विकृत अितिहासावर आम्ही शेदीडशे वर्षे पोसलों. अद्यापि महाराष्ट्राच्या युनिव्हर्सिटींत मराठ्यांना स्थान नाही. आमच्या संरक्षणाची, आमच्या अन्नवस्त्राची जबाबदारी अिंग्रजांनी आपल्या हातीं घेतली, त्याचप्रमाणे आमच्या बुद्धीसं काय खाद्य पुरवायचें याचाहि निर्णय आपण करून त्या धोरणाने 'पब्लिक अिन्स्ट्रक्शन' या भपकेबाज नांवाखाली आमचें अेकंदर स्वत्व त्यांनी हिरावून घेतलें आहे.

शिवाजी महाराजांपासून तों अखेरपर्यंत मराठ्यांचे ध्येय अेकच होतें. आपले धर्माचार निर्वेध पाळण्याची स्वतंत्रता मराठ्यांना पाहिजे होती. आमचीं मंदिरें व तीर्थक्षेत्रें यांस मुसलमानांनी अुपद्रव देअूं नये, तीं हिंदूंच्या ताब्यांत असावीं, अेवढाच मराठ्यांचा प्रयत्न होता. मुसलमानांचें राज्य किंवा धर्म ते बुडवीत नव्हते. सदाशिवरावभाअूने, माधवराव पेशव्याने, महादजी शिंद्याने बादशहास मुद्दाम आणून पदापन्न केलें. पानिपतचा झगडा धार्मिक स्वरूपाचा बिलकूल नव्हता. नजीबखानाने धर्म बुडाला, अशी खोटीच आरोळी मतलबास्तव ठोकून आपला कार्यभाग साधला. आमच्या घरांत आम्ही मालक असावें, दुसऱ्यांचें घर आम्हांस नको, हाच अेकंदर मराठ्यांच्या राजकारणाचा मथितार्थ असून, तो शिवाजी महाराजांनी औरंगजेबास लिहिलेल्या कानअुघाडणीच्या सुप्रसिद्ध पत्रांत अुत्कृष्ट व्यक्त झालेला, अितिहासांत नमूद आहे.

### ४. अिंग्रज साम्राज्याचा बडेजाव?

मराठ्यांविरुद्ध ही जी प्रचंड हाकाटी अुर्फ 'प्रॉपागँडा' पूर्वीपासून व अद्यापिहि चालू आहे; ती उलटवून आपल्या अितिहासाचें सत्य स्वरूप जगापुढे प्रतिष्ठितपणें स्थापन करणें; हें माझ्या मतें आपल्या साहित्यिकांचे व संशोधकांचे आद्य कर्तव्य होय. मी जेव्हा जेव्हा बाह्य प्रांतात प्रवास करतों, तेव्हा अेक गोष्ट प्रामुख्याने नजरेस येते की, आम्हां मराठ्यांसंबंधाने भीषण गैरसमज व प्रखर तिरस्कार बाहेर सर्वत्र पसरलेला आहे. आपला सर्वांचाहि हाच अनुभव असेल. दिवसेंदिवस ही ओरड व ही हाकाटी वाढत आहे. तिला आळा घालण्याचा प्रयत्न आम्ही बिलकूल करीत नाहीं. याचें मुख्य कारण हिंदी भाषा आपण स्वीकारीत नाहीं; आणि अिंग्रजीवर बहिष्कार घातला. मग आमचें हृद्गत कितीहि जीव तोडून आम्हीं मराठींत मांडलें तरी त्याचा फैलाव बाहेर कसा होणार? राजवाड्यांच्या प्रस्तावना अुच्च दर्जाच्या आहेत, त्या जर अिंग्रजींतच त्यांनी लिहिल्या असत्या तर त्यांचा फैलाव हिंदुस्थानभर होअून सर्व युनिव्हर्सिट्यांतून त्यांचा अभ्यास चालू राहता. आज कलकत्ता, मद्रास, नागपूर, बनारस येथील विश्वविद्यालयातून त्यांचा अभ्यास चालू राहता. आज कलकत्ता, मद्रास, नागपूर, बनारस येथील विश्वविद्यालयांतून मराठी अितिहासाचा अभ्यास चालतो तितकाहि मुंबअींत त्याला प्रवेश नाही. जनतारूपी न्यायाधीश हजर आहे, त्यांजपुढे आमच्या विरुद्ध फिर्याद देअून वर्षे लोटलीं, पण आमचें डिफेन्स, आमचा बचाव, आमची कैफियत किंवा केसच जर आपण मांडीत नाहीं, आमचा पुरावा जर आम्ही त्यांजपुढे आणीत नाहीं, तर त्यांत कसूर कोणाची?





अनुक्रमणिका

**५. आमची कैफियत दाखल करण्याची निकड-**

प्रसिद्ध व्यक्तींचें स्वभावचित्र यथातथ्य रेखाटून त्या व्यक्ति वाचकांपुढे जिवंत अुभ्या करणें; हें अितिहासांतलें कठिण पण महत्त्वाचें काम होय. मराठ्यांच्या अितिहासांत शिवाजी, बाजीराव, शाहू छत्रपति, सदाशिवरावभाऊ, माधवराव पेशवे अित्यादींचे स्वभावविशेष व कर्तबगारी दाखविणारीं कितीतरी बहुमोल पत्रें खुद्द त्यांचीं व अितरांचीं आज अुपलब्ध असून ती बाह्य अभ्यासकांस कळत नाहीत, त्यामुळे वरील थोर व्यकींसंबंधाने बाहेर मिथ्या ग्रह पसरलेले आहेत. अर्थात् मराठ्यांची राजनीति व त्यांचे अंत:करण व्यक्त करणारे हजार पांचशे निवडक अुत्तमोत्तम कागद अिंग्रजीत रूपान्तर करून बाहेर आणणें, अत्यंत जरूर आहे. पूर्वी रालिन्सन साहेबांनी अेक लहानसे सोर्सबुक बाहेर आणलें, पण तो प्रयत्न तेवढ्यावरच थांबला. माझा बहुतेक युनिव्हर्सिट्यांशीं संबंध आला, आणि हमेश माझ्याकडे पृच्छा येतात, आणि कित्येक अभ्यासक कामशेतला येअूनहि राहिले आहेत, त्यांत मला आढळलें आमची कैफियतच जगापुढे नाही; याबद्दल बाहेरच्यांसहि हळहळ वाटते. पण हें काम अेकट्यादुकट्याचें नाही, तें सर्वांच्या सहकारानेच होण्याजोगे आहे.

मलाहि काही अिंग्रजीचा मोठा प्रेमा वाटतो असें नाही. अिंग्रजी कोर्टें चालू झालीं; तेव्हापासून त्याच भाषेंत सर्व न्यायाचा व्यवहार चालून, केवढा जबरदस्त भुर्दंड जनतेवर बसला आहे पाहा. पण निर्वाह नाही. त्यास अिलाज काय? महाराष्ट्रीयाने लिहिलेलें अेकहि शिवाजीचरित्र बहुजनांस मान्य होणारें अद्यापि अिंग्रजीत लिहिलें गेलें नाही. असें चरित्र लिहिण्याची वेळ आली नाही; ही सबब न कर्त्याचा वार शनिवार, या स्वरूपाची मला वाटते. याचा परिणाम असा झाला की जें जदुनाथ सरकारांचें शिवाजीचरित्र आपण दोषार्ह समजतों, त्यावर आज पाव शतकपावेतो हिंदी जनता पोसली जाअून त्यांतले दोष मात्र दिवसेंदिवस दृढमूल होत आहेत. जनता क्षुधित आहे, तिला चांगलें अन्न मिळालें नाही; तर कदान्न खाअून निर्वाह करील, अुपाशी राहणार नाही. शिवाजीमहाराज व माधवराव पेशवे, हे दोन आपले प्रमुख राष्ट्रपुरुष. पहिल्याचें चरित्र जनतेस पुरविण्याचा मान अेका बंगाली परस्थाने घेतला. मी समजत होतों माधवरावांचें चरित्र तरी अिंग्रजींत पुरविण्याची संधि अेखाद्या महाराष्ट्रीयास मिळेल. पण गेल्या महिन्यांत बॅनर्जी नांवाच्या अेका गृहस्थांनी लिहिलेलें त्या पेशव्यांचें अिंग्रजी चरित्र माझे हातीं पडून, याहि बाबतींत माझी निराशा झाली. काळाच्या अुदरांत आणखी काय आहे कोणीं सांगावें? बॅनर्जींचे अिंग्रजी चरित्र पुष्कळ सरस निपजलें आहे, हें सांगण्यास संतोष वाटतो. मुंबअी, मद्रास, कलकत्ता येथील अप्रसिद्ध अिंग्रजी दप्तरें धुंडाळून हें पुस्तक लिहिलें असल्यामुळे, अिंग्रजमराठ्यांचे हर्षामर्ष चांगले सप्रमाण दाखविले असून; दहापांच वर्षें पेशवा जगता तर अिंग्रजांचा रिघाव येथे झाला नसता, असें निश्चित वाटूं लागतें.

आजच्या आपल्या कर्तव्यासंबंधी विचार करितां आपला पुरावा व तदनुरोधाने आपल्या अितिहासाची मुख्य कैफियत अिंग्रजींत व हिंदींत अथवा जमेल तर दोनहि भाषांत मांडणें हीं दोन निकडीचीं कामें समोर आहेत. आपल्या भावी पिढीच्या राजकारणासाठीहि या कामांची अत्यंत आवश्यकता आहे. कारण या भावी पिढींतूनच अेखादा शिवाजी पुन: निर्माण होअून देशोद्धार करणार आहे. त्याची पूर्वतयारी करून देण्यास आम्ही चुकतां कामा नये. त्यासाठी आपल्या अेकंदर साधनसाहित्याची छाननी कसून होणें जरूर आहे. निदान अेक लाख छापील पृष्ठें सहज होतील अेवढा या साहित्याचा विस्तार आज असून बरींचशीं पुस्तकें दुर्मिळ आहेत, त्यांचे पुनर्मुद्रण झालें पाहिजे. सर्व साहित्य अेकत्रित असलेले संग्रह पांच दहाच फार तर असतील. भाषेचे, कल्पनेचे, अुत्कृष्ट साहित्याचे मासले,

अपरिचित शब्द, म्हणी, रचना वगैरे वैचित्र्य यांत मुबलक मिळू शकेल. मराठेशाहींतील गद्यरचना या विषयावर स. १९१८साली अिंदूरच्या साहित्यसंमेलनापुढे मी अेक निबंध वाचला होता. त्यानंतर राजवाड्यांचे खंड, पेशवे दप्तराचे भाग अित्यादिकांत आलेल्या चांगल्या चांगल्या पत्रांची मीं निवड करून ठेविली असून माझ्या सर्व पुस्तकांत प्रत्यंतरसंदर्भ म्हणजे क्रॉस-रेफरन्सिस मुद्दाम लिहून ठेविले आहेत. माझ्या अशा टिपणांचें भारूड पुष्कळच वाढलें आहे.

**६. प्रस्तुतचें कर्तव्य.**

मराठींतलें प्रचंड साधनसाहित्य अत्यंत अव्यवस्थित रीतीने छापलेलें असून अभ्यासकांस तें सर्व अेकदम हाताशीं मिळेल अशी सोय नाही. व्यक्तिसूची, विषयसूची, शब्दकोश, अिंग्रजींतील बक्लंडसारखा चरित्रकोश अशीं साधनें अवश्य पाहिजेत; तीं नाहीत. कालक्रमाने जुळविलेल्या वंशावळींची फ़ार मोठी जरूर आहे. शिवाय महाराष्ट्राप्रमाणेच अितर प्रांतांतून, अितर भाषांतून निरनिराळ्या संस्थांमार्फत किंवा व्यक्तिश: नानाविध संशोधन महाराष्ट्राबाहेर पंजाब, अयोध्या, बंगाल, कर्नाटक अशा दूरदूरच्या प्रांतांत सारखें चाललें असून त्याची दखल घेतल्याशिवाय मराठ्यांचा अितिहास पूर्ण होणार नाही. सगळ्या युनिव्हर्सिट्यांतून कितीतरी विषयांवर प्रबंध लिहिले जात आहेत, अशांच्या फलाचा अुपयोगहि आपल्या अितिहासांत झाला पाहिजे. मराठ्यांच्या अितिहासाची पार्श्वभूमि म्हणजे शिवकालापूर्वीच्या दोनतीनशे वर्षांच्या घडामोडी अर्थात् स्थूलमानाने ज्ञानेश्वरापासून तुकारामापर्यंतचा काळ निश्चित स्वरूपांत मांडण्याअितकी सामग्री आज अुपलब्ध आहे, पण ती सर्व अेकत्रित करून मुसलमानांचें आक्रमण व तन्निवारणार्थ हिंदूंनी केलेले प्रयत्न यांचा संगतवार अितिहास लिहिला जाअील तर मराठ्यांचा अुत्कर्ष कां व कसा झाला; याची आधारभूत मीमांसा अभ्यासकांस मिळेल. या कार्यास चारदोघांनी तबाडतोब वाहून घ्यावें; अशी माझी सूचना आहे.

*(म. सा. पत्रिका, ऑक्टोबर १९३१)*

*

---

**नवीन आजीव सभासद**

५३. भुवड नंदिनी रवींद्र
५४. देशमाने चेतन मुरलीधर
५५. काटीकर नरेंद्र श्रीरंग
५६. साबळे आबासाहेब वेताळ
५७. उंब्राकर शिवानंद गोविंदराव
५८. कापसे पंचाक्षरी शंभूलिंग
५९. देवर गुंडी संतोष ईश्वराप्पा
६०. परशेट्टी राजशेखर मल्लिकार्जुन
६१. भालेराव दिलीप कृष्णा
६२. उभे दत्तात्रय नथू
६३. दुधाणे संजय पांडुरंग
६४. बडे गजेंद्र प्रभाकर
६५. जोशी ज्ञानेश्वर अरविंद
६६. गंधे किशोर दिनकर
६७. मोडक दीपक नारायण
६८. ओगले क्रांती प्रसन्नकुमार
६९. जामदार नानासो पांडुरंग
७०. कदम युवराज राजाराम
७१. कोकरे सुनील मारुतराव
७२. हजारे माणिक रघुनाथ
७३. गोसावी राजेंद्र सच्चिदानंद
७४. गोसावी शितल राजेंद्र
७५. बर्गे अरुण एकनाथ
७६. पडवी संजय छगन
७७. देवरे रवींद्र
७८. कदम युवराज राजाराम
७९. क्षिरसागर पुष्पा
८०. देसाई प्रभाकर बचाराम
८१. भोसले रोहित उमेश
८२. मराठे उमेश बाळकृष्ण
८३. जोगदेव प्रमोद विष्णू
८४. येलुलकर जयंत तिपन्ता
८५. गायकवाड पंकज परमेश्वर
८६. पवार दीपक चंद्रकांत
८७. पवार गणपत गोपीनाथ



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

# चित्रपट आणि सार्वजनिक सदभिरुचि[१]

श्री. के. नारायण काळे

*[संगीत नाटकाची सद्दी १९३५ ते ४० च्या दरम्यान संपुष्टात आली. नाट्यमन्वंतर संस्थेचे रंगभूमी सावरण्याचे प्रयत्नही प्रभावी ठरले नाहीत. करमणुकीच्या एका नव्या माध्यमाचे – चित्रपटाचे – आगमन झाले होते. चित्रपटातील अश्लील दृश्यांवर आणि सदभिरूचीविरुद्ध असलेल्या कथानकांनी एकूणच सामाजिक सदभिरूची बिघडू लागल्याची चर्चा होऊ लागली होती. रा. कृष्णराव मराठे ह्यांनी ही निषेधाची मोहीम सुरू केली. कै. कृष्णराव मराठे ह्यांनी आजची चित्रपटसृष्टी पाहिली असती, तर श्लील-अश्लीलतेच्या चर्चेपलीकडची दृश्ये पाहून त्यांनी काय केले असते कुणास ठाऊक! प्रस्तुत लेखाचे लेखक के. नारायण काळे म्हणतात – चित्रपटसृष्टीबाबत परिक्षणाची शास्त्रीय दृष्टी अद्याप विकसित झाली नाही; त्यामुळे सामुदायिक रसास्वादाबाबत 'स्व-नियंत्रणाचे/नियमनाचे' नियमांबाबत गोंधळ आहे. निर्माते, शिक्षणतज्ज्ञ आणि समाजशास्त्रज्ञांनी मिळून त्याचा विचार करावा. शेवटी लोकाभिरूचीच्या मागणीप्रमाणेच हा व्यवसाय होणार. कारण चित्रपटकला ही लोकशाहीचे औरस संतान आहे. तरीही, लोकाभिरूचीच्या काही निश्चित सर्वसमावेशक सभ्यता (decency) पाळल्या गेल्याच पाहिजेत. करमणुकीच्या साधनाच्या एका स्थित्यंतराची चर्चा, एक कालचरित्रच उभे करते आहे. –संपादक]*

.....काव्य, कादंबरी किंवा लघुकथा यांच्याप्रमाणे नाटक आणि चित्रपट यांचा रसास्वाद अेकट्या माणसाला आपल्या खोलींत बसून स्वत:शीच घेतां येत नाही. या दोहोंपैकी नाट्यकला ही व्यक्तिनिष्ठ कलांच्या भरभराटीच्या कालांत अस्तित्वांत आली. तरी पण तिचें स्वरूप अितर कलांपेक्षा वेगळें आहे हें, 'नाट्यं भिन्नरुचिर्जनस्य बहुधाप्येकं समाराधनम्' या कालिदासाने केलेल्या तिच्या वर्णनावरून व भरताने आपल्या नाट्यशास्त्रांत जे प्रयोगविषयक सामाजिक दंडक व नियम घालून दिले आहे; त्यांवरून स्पष्ट आहे. नाटक हें काव्याचा अेक प्रकार असल्यामुळे तें वाचतांहि येतें व पाहतांहि येते. यामुळे अेकवेळ नाटक अेकट्यानेच स्वत:च्या खोलींत बसून वाचणें व त्या रीतीने त्याचा आनंद घेणें शक्य होअील; पण त्याचा प्रयोग मात्र अेकट्याने पाहवणार नाही. तो समुदायांत बसूनच पाहिला पाहिजे. हीच गोष्ट चित्रपटाच्या बाबतींतहि खरी आहे. मात्र नाटकाप्रमाणे चित्रपटाचे संवाद व त्यातील गाणीं, हीं स्वत:च्या खोलींत अेकटें बसून अेखाद्याला वाचतां आली तरी, त्यांचा यथार्थ रसास्वाद मात्र त्याला त्या रीतीने घेतां येणें शक्य नाही. चित्रपटांत शब्दनिष्ठ रसनिर्मितीला फारच थोडा अवसर असतो. त्यांतील बहुतेक सारे रंजक तत्त्व त्याच्या दृश्यात्मक भागावर अवलंबून असतें. या भागाचे रसग्रहण प्रेक्षकाला अेकट्याने करतां येणार नाही; तें त्याला अितर प्रेक्षकांच्या संगतींतच शक्य होतें. प्रेक्षकांशिवाय सुन्या पडलेल्या अेखाद्या नाट्यमंदिरांत नाटक अगर चित्रपट चालू असतां जी सुरसता प्रेक्षकाला त्यांत आढळून येत नाही, ती तेच नाटकगृह प्रेक्षकांनी भरगच्च भरलेलें असलें आणि रंगभूमीवरील किंवा पडद्यावरील

नाट्यप्रसंगांना प्रेक्षकांच्या सहृदय प्रतिक्रियेची सहजसंभव साथ मिळत असली, म्हणजे आपोआप आढळून येऊ लागते. याचें कारण, प्रत्येक प्रेक्षकाचें मन अितर प्रेक्षकांच्या सामुदायिक मनाशीं अेकजीव होणें हें या प्रकारच्या कलाकृतींच्या आस्वादासाठी आवश्यक असतें, हें आहे. या कलांची निर्मिती आणि त्यांचा रसास्वाद हीं दोन्ही सामुदायिक मनावर अवलंबून आहेत. अेकाकी वैयक्तिक मनांना या गोष्टी शक्य नाहीत. त्यामुळे नाटक व चित्रपट या कला व्यक्तिनिष्ठ न राहता सामाजिक स्वरूप पावतात; आणि अुलटपक्षी त्यांच्यावर सामाजिक प्रवृत्ति, विचार, अभिरुचि व अपेक्षा यांचा परिणाम होणें अनिर्वाह्य होतें.

सामुदायिक करमणुकीचे साधन म्हणून चित्रपटाला सार्वत्रिक लोकप्रियता प्राप्त झाली आहे, याचे कारण या कलेचे हे सामाजिक स्वरूपच होय. ही कला अद्याप आपणाला काहीशी नवी आणि अपरिचित आहे. आपल्या सामाजिक जीवनात जरी ती एक मोठी कुतूहलाची आणि सार्वत्रिक चर्चेची उपयुक्त बाब होऊन बसली असली, तरी अजून तीबद्दल आपणांला पुरेशी शास्त्रीय दृष्टी आलेली नाही. चित्रपट काढणारे चित्रपट काढतात, पाहणारे ते पाहतात, त्यावर अभिप्राय देणारे आपापले अनुकूल-प्रतिकूल अभिप्राय देतात, शाळा-कॉलेजातील विद्यार्थी आणि ज्यांना पुरेसा रिकामा वेळ आहे असे अरुण-तरुण स्त्रीपुरुष, चित्रपटव्यवसायात काम करणाऱ्या स्त्रीपुरुषांचे पगार, त्यांची राहणी, त्यांचे नैतिक व कौटुंबिक जीवन, त्यांची खरी-खोटी मते, यांबद्दलच्या रसभरित वार्तालापात त्यांच्याबद्दल स्वत:ला वाटणारे कौतुक व असूया व्यक्त करीत असतात. अशा रीतीने आपल्या सार्वजनिक जीवनातील बराचसा भाग जरी चित्रपटविषयक कौतुक व वार्ता यांनी नि:संशय व्यापून टाकलेला असला, तरी आपल्या सामाजिक जीवनावर चित्रपटांचा प्रत्यक्ष काही बरावाईट परिणाम होत आहे, किंवा होणार आहे, अशा गंभीर दृष्टीने या विषयाकडे फारसे कोणी पाहत नाही; आणि स्वाभाविकच या सर्व वार्तालापांना रिकामपणची कामगिरी यापेक्षा विशेषसे अधिक महत्त्व येत नाही.

अगदी नुकती नुकती अशी स्थिती होती, व अजूनही बरीचशी आहे. परंतु 'संस्कृती संरक्षकमंडळा'चे एक आधारस्तंभ श्री. कृष्णराव मराठे हे सेवानिवृत्त होऊन त्यांनी आपले लक्ष्य साहित्यातील अश्लीलता व पावित्र्यविडंबन यांच्या बरोबरीनेच चित्रपटातील असदभिरुचि व शृंगारिक प्रसंग यांचे निर्मूलन करण्याकडे वळविल्यामुळे व त्यांच्या प्रयत्नांना सरकारदरबारी यश मिळू लागल्यामुळे, चित्रपटविषयक चर्चा हा एक गंभीर विषय होऊ पाहत आहे, व आतापर्यंत याबाबत उदासीन असलेले प्रेक्षकही चित्रपट पाहताना या गोष्टीवर डोळ्यात तेल घालून पहारा ठेवू लागले आहेत.

श्री. कृष्णराव मराठे यांच्याबद्दल कुणाची काही मते असली, तरी एक गोष्ट मात्र नाकारता येणार नाही; की ते प्रामाणिक आहेत. स्वत:ला योग्य वाटणाऱ्या गोष्टींचा निरलस प्रचार व अनिष्ट वाटणाऱ्या प्रवृत्तींचा प्रतिकार ते तळमळीने आणि कळकळीने करीत असतात. त्यांची दृष्टी कदाचित आकुंचित असेल, त्यांची विचारसरणी प्रतिगामी असेल, त्यांना कलेचा विषय व्हावा, असे वाटणारी त्यांची जीवनकक्षा संकुचित असेल, पण हे मात्र निश्चित की, इतके असले तरी त्यांची दृष्टी समाजहिताची आहे. ते म्हणतात त्या प्रमाणात किंवा त्या रीतीने नसले, तरी बऱ्याच अंशी आपल्या चित्रपटसृष्टीत सदभिरुचीच्या रास्त मर्यादांबाबतही बरेचसे अराजक माजून राहिले आहे, पुष्कळशी बेबंदशाही बोकाळली आहे; आणि त्या अनिष्ट प्रथांचे नियमन-नियोजन होऊन काहीतरी विशिष्ट सार्वजनिक सदभिरुचीचे निर्बंध, सर्व चित्रपटनिर्मात्याकडून पाळले जाणे, सामाजिक व सांस्कृतिक प्रगतीच्या दृष्टीने आवश्यक व हितकारक आहे.

श्री. मराठे यांच्यासारख्या एखाद्या व्यक्तीने स्वयंस्फूर्तीने हे कार्य शिरावर घेतले म्हणजे ज्यांना अशा प्रकारचे नियमन नको असते त्यांना त्या व्यक्तीला, "तुम्ही कोणाचे प्रतिनिधी? तुम्हांला या बाबतीत काय अधिकार?" अशांसारखे सहज सुचणारे अडवणुकीचे प्रश्न विचारणे फारच सोपे आणि सोयीचे



अनुक्रमणिका

असते. या प्रश्नांनी हे स्वयंभू समाजसुधारक गोंधळतात किंवा डगमगतात असे नाही; पण काठावर बसून मौज पाहणाऱ्या काही व्यक्तींचा बुद्धिभेद करण्याला मात्र हे प्रश्न चांगलेच उपयोगी पडतात; आणि विशिष्ट मर्यादेपर्यंत त्यात सत्याचा अंशही असतो. मात्र या सत्याचा अंशाचा विधायक उपयोग करण्याच्या दृष्टीने हे अडवणुकीचे प्रश्न विचारले जात नाहीत; तर आपल्याला नको असलेल्या विचारप्रणालीच्या प्रचाराला मुळाशीच खुडून नेस्तनाबूत करण्याचा हा गोंडस, स्वार्थी प्रयत्न असतो. एखाद्या विशिष्ट व्यक्तींचे मतप्रदर्शन व प्रचार जर अनधिकारी व अप्रातिनिधिक असेल, तर अधिकारी व प्रातिनिधिक मतप्रदर्शन व प्रचार होईल, अशी व्यवस्था त्या चळवळ्या व्यक्तीचा अधिकार व प्रातिनिधित्व नाकारणाऱ्यांनी केली पाहिजे. पण ती तशी होत नाही. कारण त्यांना प्रातिनिधिक किंवा अप्रातिनिधिक, अधिकृत किंवा अनधिकृत, स्वत:च्या हिताविरुद्ध जाणारे कोणतेच मतप्रदर्शन नको असते; आणि म्हणूनच कोणताच विधायक प्रयत्न न करता फक्त विशिष्ट मताला अनधिकृत व अप्रातिनिधिक म्हणून स्वस्थ बसणे, किंबहुना थोडे पुढे जाऊन त्याच्यावर मागासलेपणाचा शिक्का मारून त्यास हास्यास्पद ठरवणे, हेच त्यांच्या फायद्याचे असते.

या दृष्टीने चित्रपटविषयक सामाजिक नियंत्रणाच्या प्रयत्नांना घेण्यात येणारे काही आक्षेप विचार करण्यासारखे आहेत. उदाहरणार्थ, असे म्हणण्यात येते की, ''प्रेक्षक चित्रपट पाहतात, ते ती एक करमणुकीची बाब म्हणून. त्यांच्या सामाजिक किंवा नैतिक जीवनावर त्यांचा परिणाम असा काही होतच नाही. तेव्हा असदभिरुचीच्या प्रसाराची ओरड म्हणजे काही उपद्व्यापी मंडळींचा अव्यापारेषु व्यापार आहे. बरे, यदा कदाचित, चित्रपटातून कोठे सदभिरुचीचा भंग होत असला, तरी योग्यायोग्य पाहून जे काय बरे वाईट करावयाचे ते करावयाला सरकारने 'बोर्ड ऑफ सेन्सॉर्स' नेमले आहेच. त्यांच्या कामात ही आगंतुक ढवळाढवळ कशाला? आणि शेवटी, काही लोकांनी असदभिरुचीच्या नावाने कितीही आरडाओरड आणि गिल्ला केला, तरी जोपर्यंत बहुसंख्य प्रेक्षक असले चित्रपट अहमहमकीने पैसे देऊन पाहत आहेत, तोपर्यंत या मूठभर लोकांच्या आरडाओरडीचा चित्रपटनिर्मितीचा व्यवसाय करणाऱ्या व्यापारी दृष्टीच्या लोकांवर काय परिणाम होणार?''

वर वर पाहता हे आक्षेप बिनतोड आहेत असे वाटले, तरी थोडा खोल विचार केला असता ते तसे नाहीत, हे सहज कळून येईल. लोक करमणूक या दृष्टीने चित्रपट पाहतात, विवेचक दृष्टीने पाहत नाहीत, म्हणूनच त्यातील आकर्षक व उठावदार भागांचा परिणाम त्यांच्या मनावर नकळतच विशेष उत्कटपणे होतो. चित्रपटप्रेमी स्त्री-पुरुषांचे पोशाख, त्यांची चालचलणुक, त्यांचे बोलणे-वागणे, यांच्यावर थोडी शोधक नजर फिरवली तर त्यांचे आवडते चित्रपट, त्यातील गाणी व संवाद आणि नटनटी यांच्या वर्चस्वाची त्यांच्यावर दाट छाप पडलेली आहे, असे आढळून येईल. चित्रपट हा आरशासारखा आहे. तो समाजाचे प्रतिबिंब दाखवतो. पण या आरशाची काच नितळ नाही. ती हे प्रतिबिंब जसेच्या तसे दाखवीत नाही. ती सुखसंचारक कंपनीच्या विचित्र शेरविनीसारखी विकृतिदर्शक आहे. चित्रपटरूपी आरशाच्या काचेवर पडणारे समाजाचे प्रतिबिंब विनोदासाठी विकृत झालेले किंवा परिणामकारकतेसाठी अतिशयोक्त बनलेले असते. या काचेवरील प्रकाश पुन्हा परावर्तन पावून जेव्हा समाजावर पडतो, तेव्हा त्याचे मूळचे स्वरूप पालटून गेलेले असल्यामुळे समाजावर होणाऱ्या त्याच्या परिणामात आपणाला एका नव्याच सृष्टीचे दर्शन घडून येते. ज्यांच्या मन:प्रवृत्ती स्थिती झालेल्या नाहीत, अशा अर्धशिक्षित व अर्धविकसित मनाच्या व्यक्तींवर हा विकृत किंवा अतिरिक्त परिणाम विशेष प्रमाणात घडून आलेला दिसून येतो. चित्रपटाची ही उलटी मायावी दुनिया खरीखुरी सत्यसृष्टी आहे, असे त्यांना वाटत असते. गुन्हेगारीला उदात्त व आकर्षक स्वरूप देणारे आणि कामवृत्तींना चालना देऊन त्याबद्दल विकृत कुतूहल निर्माण करणारे चित्रपट विद्यार्थ्यांच्या मनोवृत्तींवर अनिष्ट परिणाम घडवून आणतात, ही गोष्ट आधुनिक शिक्षणशास्त्रज्ञांनाही आता पटू लागली असून ते तिची दखलगिरी घेऊ लागले आहेत.



अनुक्रमणिका

या संबंधात योग्य ते उपाय योजवयाला सरकारी 'बोर्ड ऑफ सेन्सॉर' व पुरेसे आहे, ही कल्पनाही भ्रामक आहे. सरकारी कायदेशीर नियंत्रणापेक्षा स्वयंस्फूर्त लोकमताचे ऐच्छिक दिग्दर्शन हे केव्हाही अधिक जिवंत, अधिक प्रभावी व अधिक उपयुक्त असते. सरकारी नियंत्रण संस्था नियम आणि पद्धती यांच्या चाकोरीत इतक्या जखडलेल्या असतात की, त्यात समाजाच्या वाढत्या, बदलत्या गरजाबरोबर आपली गती टिकविता येत नाही; यामुळे त्या अनेक वेळा प्रगतीचा मार्ग खुंटविण्याला मात्र कारणीभूत होतात. वारंवार चालना देऊन लोकमताला त्यांना आपल्याबरोबर आणावे लागत असते. यामुळे तात्त्विक दृष्ट्याही त्याचे नियंत्रण लोकमताइतके प्रगतीला पोषक ठरू शकत नाही. सरकारी नियंत्रणसंस्था प्रतिबंध निर्माण करू शकतील. पण जनतेच्या अभिरुचीला वळण देऊन ती सुसंस्कृत करण्याचे विधायक कार्य त्यांना करता येणार नाही. ते सामाजिक स्वयंनियंत्रणालाच शक्य आहे. लोकमताच्या आदराने चित्रपटनिर्मात्यांनी स्वत:च्या धोरणात फरक करण्यात जे सौकर्य व सौजन्य आहे, ते कायद्याच्या बडग्याच्या धाकाने त्यांच्याकडून तो करवून घेण्यात नाही. चित्रपटनिर्माते हेही जनतेचेच घटक आहेत. ते जनतेच्या अभिरुचीची, मतांची कदर बाळगणार नाहीत; असे मानण्यास फारसे कारण नाही. ते व जनता यांचे संबंध परस्परपोषक व पूरक असेच आहेत. तत्कालिन फायद्याच्या मोहाने त्यापैकी काहींची, जनतेच्या सदभिरुचीची जाणीव कधी कधी बोथट होत असल्याचे आढळून आले, तर ती जाणीव त्यांना योग्य मार्गाने करून देणे हे जनतेचे कर्तव्य आहे. कायद्याचा बडगा वेळी-अवेळी त्यांच्या पाठीवर लगावल्याने किंवा सारखा त्याचा धाक त्यांना दाखवत राहिल्याने, एकाच समाजातल्या चित्रपटनिर्माते व चित्रपटसुधारक या दोन घटकातील वितुष्ट मात्र वाढत राहील; व त्यामुळे करमणुकीसाठी चित्रपट पाहणाऱ्या प्रेक्षकांचे नुकसान होऊन चित्रपटकलेच्या स्वाभाविक प्रगतीला पायबंद बसेल. चित्रपटकला समाजातील अनेक घटकांच्या सहकार्याने व सहविचाराने विकसित होणारी सामाजिक कला आहे. परस्परविरोधाची वृत्ती तिला विघातक असून राष्ट्रीय हितालाही तीमुळे धोका पोहोचल्यावाचून राहणार नाही. यासाठी चित्रपटनिर्माते व समाजसुधारक यांमधले स्नेहसंबंध कसे वाढतील व त्या दोघांच्याही सहकार्यातून निरोगी सामाजिक कमरणूक व प्रगतिपर सामाजिक कला यांची अभिवृद्धी कशी होईल, याचा विचार झाला पाहिजे; त्यासाठी काहीतरी योजना झाली पाहिजे.

अशा प्रकारची योजना परिणामकारक होणार नाही, चित्रपटनिर्माते ती मान्य करणार नाहीत, अशी ज्यांना भीती वाटते त्यांना उदाहरणादाखल एवढेच विचारता येईल की, चित्रपटनिर्मात्याकडून चित्रपटांच्या ज्या जाहिराती दिल्या जातात; त्यात लोकप्रिय पुढारी, कुटुंबवत्सल विदुषी व शिक्षणतज्ज्ञ याच्याकडून आपल्या त्या चित्रपटाची भलागण झाली असल्याची ग्वाही अनेक वेळा कंठरवाने दिलेली आढळते. ती का? पैसे खर्चून दिलेल्या जाहिरातीत धंद्याच्या दृष्टीने निरुपयोगी असलेली प्रमाणपत्रे छापून घेण्याइतके चित्रपटाचे प्रसिद्धितज्ज्ञ मूर्ख असतात काय? अर्थातच, या प्रसिद्ध स्त्री-पुरुषाचे अनुकूल अभिप्राय जर त्यांना आपल्याला फायदेशीर होतातसे वाटते, तर उलटपक्षी त्याचेच प्रतिकूल अभिप्राय आपणाला हानिकारक होणार नाहीत; असे त्यांना वाटणे कसे शक्य आहे? आणि चित्रपटनिर्माते झाले, तरी फायदा मिळवणे यापलीकडे दुसरी काही सामाजिक, राष्ट्रीय, कौटुंबिक कर्तव्ये व मूल्ये ते ओळखीतच नसतील, असे तरी का गृहीत धरून चालावयाचे? त्यांनाही समाजातील इतर घटकांप्रमाणेच बायकामुले, आप्त-स्वकीय नसतील काय? आपण काढलेल्या बऱ्यावाईट चित्रपटांचा आपल्या बायकामुलांवर व आप्तस्वकीयांवर काहीतरी बरावाईट परिणाम होत असला पाहिजे, हे आपण त्यांच्या ध्यानात आणून दिले, तरी ते तिकडे लक्ष देणार नाहीत असे समजण्याइतके आपण त्यांना आपल्याबाहेरचे का मानावे? 'फिल्म इंडिया' या इंग्रजी मासिकात, गुन्हेगारीला गोंडस स्वरूप देण्याच्या चित्रपटव्यवसायातील प्रवृत्तीबद्दल,

बालमानसशास्त्रज्ञ व शिक्षणतज्ज्ञ यांच्याकडून अलीकडे जे जोरदार विरुद्ध मतप्रदर्शन होत आहे, विशेषत: चित्रपटनिर्मितीशी प्रत्यक्ष संबंध असलेल्या व्यक्तींकडून त्यांच्या बरोबरीने त्यात जो भाग घेतला जात आहे, त्यावरून काय अनुमान निघते? शिक्षणतज्ज्ञ व समाजशास्त्रज्ञ यांना ज्या गोष्टी अनिष्ट वाटतात, त्यांची जाणीव चित्रपटनिर्मिती करणाऱ्यांनाही हळूहळू होऊ लागली आहे, याचाच हा पुरावा नव्हे काय?

आज या बाबतीत जशी आपल्याकडे परिस्थिती आहे, अगदी बरोबर तशीच परिस्थिती काही वर्षांपूर्वी अमेरिकन चित्रपटव्यवसायात उत्पन्न झालेली होती. गुन्हेगारीला आणि स्त्री-पुरुषांतील स्वैर संबंधांना गोजिरवाणे गोंडस स्वरूप देऊन त्यांच्याबद्दल सामान्य प्रेक्षकांच्या मनावर एक प्रकारची विकृत मोहिनी घालणाऱ्या चित्रपटांचा त्या वेळी तेथे अतिशय सुळसुळाट झाला होता. या परिस्थितीला आळा घालण्याचे कार्य, तेव्हा तेथील चित्रपटव्यवसायात प्रामुख्याने वावरणाऱ्या एका समाजसुधारकाने आपल्या शिरावर घेतले. या गृहस्थाचे नाव, बुईल, एच.हेस. शिक्षक-पालक संघ, धार्मिक संस्था, स्त्रियांच्या संस्था, धर्मोपदेशक, शिक्षणशास्त्रज्ञ, समाजशास्त्रज्ञ इत्यादींच्या साहाय्याने त्याने आपले उद्दिष्ट साध्य केले. चित्रपटव्यवसायाला जनतेच्या सदभिरुचीची कदर करण्याला, तिचा मान राखण्याला, भाग पाडले. अर्थात हे करताना हेसची दृष्टी अनुभवी व व्यापक असल्यामुळे, जनतेलाही तो चित्रपटव्यवसायाकडे राष्ट्रीय हिताच्या दृष्टीने पाहण्याचा आदेश देत असे. परस्परसहकार्याने, आदराने व विचारविनिमयाने, चित्रपटव्यवसाय व कला यांची राष्ट्रीय हिताच्या अभिवृद्धी कशी होईल हे धोरण डोळ्यांपुढे ठेवून, त्याने चित्रपटनिर्मात्यांना स्वखुषीने लोकमताला जबाबदार राहण्याची तडजोड करण्यास भाग पाडले; चित्रपटव्यवसाय व सामाजिक सदभिरुची यांचा समन्वय केला; त्या भरभक्कम पायावर त्याने आपल्या 'स्वयंनियंत्रणाच्या योजने'ची उभारणी केली. तो म्हणतो,–

"इतर बहुतेक कलांप्रमाणे (चित्रपट) ही कला दरबारी वातावरणात वाढलेली नाही. तिला स्वत:चे खास मिरास हक्क नाहीत. जनतेच्या गरजा, जनतेची अभिरुची, करमणुकीतील सभ्यपणा आणि चांगुलपणा यांबद्दलच्या जनतेच्या कल्पना, यांच्याशी तिचे स्वरूप सुसंगत असले पाहिजे. ती लोकशाहीचे औरस संतान आहे. आजच्या तिच्या प्रभावी अवस्थेत तिला आपल्या अधिकारांची आणि कार्यक्षमतेची जाणीव असून त्याबरोबरच स्वत:वरील जबावदारी पार पाडण्याची तिची तयारी आहे. प्रत्यक्ष जीवनाने पुरविलेला किंवा साहित्याने घडवलेल्या नानाविध विषयांतून स्वत:ला पाहिजे असेल त्या प्रकारची करमणूक स्वत:ला अनिर्बंधपणे निवडता यावी, या जनतेच्या स्वातंत्र्याचा जास्तीत जास्त विकास करणे; ही चित्रपटव्यवसायातील स्वयंनिर्णयाच्या कल्पनेची तात्त्विक भूमिका नेहमी होती व आहे. 'चित्रपटाचे स्वातंत्र्य' याचा अर्थ, एखाद्या चित्रपटगृहात गेले असता तेथे जो काही करमणुकीचा कार्यक्रम चाललेला असले, तो शालेय, धार्मिक अगर कौटुंबिक परिणामांशी सपशेल विरोधी असणार नाही, अशी प्रेक्षकाला खात्री बाळगता येण्यासारखी परिस्थिती अस्तित्वात असावी. स्वयंनियंत्रणयोजनेचा शिक्का असलेल्या चित्रपटातून सार्वजनिक सभ्यता व शिष्टाचार यांच्या सामान्य नियमांचा अतिक्रम झालेला नसणारच अशी निरपवाद निश्चिती असावी, आणि कला किंवा करमणूक या नावाच्या बुरख्याखाली 'टिंगलबाजी'ला मिरवायला मुभा नसणे; हा आहे... हे स्वातंत्र्य स्वयंनियंत्रणाच्या योजनेने चित्रपटाला मिळवून दिले आहे; आणि या हक्कांचे संरक्षण आम्ही करण्याचे ठरविले आहे."[२]

हेसच्या या दृष्टिकोनातील निश्चितपणा, व्यापकपणा व विधायकता ही श्री. मराठे यांच्या व्यापारात येत नसतील हे संभवनीय आहे; पण त्यांना या गोष्टी अभिप्रेत नसतीलच असे मात्र वाटत नाही. जनता आणि चित्रपटनिर्माते यांच्या परस्परसहकार्याने विल.एच. हेसच्या योजनेसारखी स्वयंनियंत्रणाची योजना तयार होऊ शकली, तर पदोपदी सेन्सॉरच्या फर्मानांना



अनुक्रमणिका

पाचारण करण्यात ते मोठे भूषण मानतील; असे नाही. जनतेतील जबाबदार, पुढारी, शिक्षक, पालक, समाजशास्त्रज्ञ यांची ही सामुदायिक जबाबदारी आहे; व त्यांच्या प्रातिनिधिक व अधिकारयुक्त मतप्रदर्शनाला मान देणे हे चित्रपटनिर्मात्याचे कर्तव्य आहे. कायद्याने लादलेल्या बोर्ड ऑफ सेन्सॉर्सच्या हुकूमशाही कारभाराऐवजी जनतेच्या स्वयंप्रेरणेने विकसित झालेली स्वयंनियंत्रणाची ऐच्छिक योजना चित्रपटव्यवसायात आपणाला परिणामकारक करता आली, तर कला व सार्वजनिक सदभिरुचि या दोहोंच्याही प्रगतीच्या दृष्टीने ते हितावहच ठरेल. वैयक्तिक प्रयत्न हे बहुश: एकांगी व मर्यादित असल्यामुळे एका बाजूने ते अयशस्वी व हास्यास्पद ठरतात, तर दुसऱ्या बाजूने विधिनिष्ठ नियंत्रणाला वारंवार हस्तक्षेप करण्याची संधी मिळून, एकजिनसी कला आणि आर्थिक व्यवहार या दोन्ही दृष्टींनी राष्ट्रीय हिताला अपायकारक व नुकसानीचे होतात. या अनवस्थेच्या निरासाचा एकमेव अनुभवाचा उपाय म्हणजे स्वयंनियंत्रणाचा, तडजोडीचा व सहकार्याचा मार्ग हा होय. आमचे चित्रपटनिर्माते, चित्रपटसुधारक एकदिलाने या मार्गाचा विचार करतील तो सुदिन.

*(म. सा. पत्रिका, जुलै १९४३)*

---

१. म. सा. परिषदेच्या 'स्वाध्यायमंडळा'तर्फे ता. ३ जुलै १९४३ रोजी 'कला व समाजजीवन' या विषयावर झालेल्या व्याख्यानातील काही भाग – आवश्यक ते फेरफार करून.

२. "Unlike most of the arts it was not reared in patrician surroundings. It has no vested rights. It must conform to public demands, public taste and the public's sense of decency and goodness in enterainment. It is a true child or democracy. Today in full vigour it recognizes its privileges and opportunities, and realizes and acknowledges its responsibilities."

"The underlying philosophy of self-regulation in the motion picture industry always has been and it based on the developing of the greatest measure of liberty for the public to choose its entertainment from the variety of themes posed by life or created by literature. Freedom of the screen means opporunity to attend a theatre with the knowledge that the entertainment will nor negative the influence of the school, the church and the home; the certainty that pictures bearing the seal of self-regulation will not violate the cannons of common decency, that banality shall not masquarade as art or entertainment... This is the liberty which self regulation has brought to the screen and this is the right we propose to protect." (Italics ours.) -Motion Picture Herald, Vol. 136, No. 3, pp. 25-26.

*


रेग्युलेशन ऑफ न्यूजपेपर्स (सेन्ट्रल रूल्स १९५६, नियम क्र.८ अन्वये) 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका'ची मालकी व इतर तपशिलासंबंधी

**निवेदन**

नियतकालिकाचे नाव : 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका'

प्रसिद्धीचा काळ/भाषा : त्रैमासिक/मराठी

संपादक : डॉ. सुधाकर प्रल्हाद कुलकर्णी

रा. पत्ता : 'सूर' ७, गायकवाड कॉलनी, सावेडी मार्ग, अहमदनगर ४१४००३ (राष्ट्रीयत्व भारतीय)

प्रकाशक : श्री. प्रकाश बाळकृष्ण पायगुडे, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक मार्ग, पुणे ३०

राष्ट्रीयत्व : भारतीय

मुद्रक : स्मितां प्रिंटर्स, १०१९ सदाशिव पेठ, पुणे ३०

प्रकाशक स्थळ : महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक मार्ग, पुणे ४११०३० (महाराष्ट्र राज्य - भारत) (दूरभाष : ०२०/२४४७५९६३)

मी, श्री. प्रकाश बाळकृष्ण पायगुडे, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक मार्ग, पुणे ४११०३०; असे जाहीर करतो की, वर दिलेला तपशील माझ्या माहितीप्रमाणे खरा व बरोबर आहे.

– प्रकाश बाळकृष्ण पायगुडे (प्रकाशक)





अनुक्रमणिका

दि।वा।ळी।अं।क।२०१३

प्रेरणा आर्ट फाउंडेशन व्दारा प्रकाशित

# अयान

मानद संपादक: लक्ष्मीकांत देशमुख
कार्यकारी संपादक: कवी अनिल कांबळे




कुशल प्रशासक व सुप्रसिध्द साहित्यिक लक्ष्मीकांत देशमुख, हे दीपावली २०१३ पासून 'अयान' हा वार्षिक दीपावली अंक प्रेरणा आर्ट फाउंडेशनच्या सहकार्याने प्रकाशित करीत आहेत. जो दरवर्षी नियमित प्रकाशित केला जाणार आहे.दिवाळी अंकांची एवढी गर्दी असताना नवा अंक कशाला? असा प्रश्न काहींना पडेल, पण 'अयान' हा निखळ साहित्य व्यवहाराला व साहित्य ज्या कलेचा गाभा आहे त्या सिनेमा, नाटक, गीत व संगीत या विषयांना वाहिलेला निखळ वाचनानंद देणारा अंक असे स्वरूप आम्ही निश्चित केले आहे.शुभारंभाच्या या दिवाळी अंकात कथा, कविता, समीक्षे सोबत व्यक्तिचित्रे, मुलाखती, एकांकिका, स्मरण, नाटक, सिनेमा, आस्वादक लेख व साहित्य व्यवहार आदी विषयांना स्थान देण्यात आले आहे.

या अंकात रंगनाथ पठारे, रवींद्र शोभणे, लक्ष्मीकांत देशमुख, आसाराम लोमटे, विद्यासागर अध्यापक, हृषिकेश जोशी, गौतमीपुत्र कांबळे, डॉ.जब्बार पटेल, डॉ. माधवी वैद्य, प्रा.दत्ता भगत, महावीर जोंधळे, प्रदीप निफाडकर, डॉ.सुनीलकुमार लवटे, गणेश मतकरी, दिलीप ठाकूर, रणधीर शिंदे, डॉ.प्रकाश अत्रे, श्रीकांत उमरीकर, संदीप खरे, सौमित्र, वैभव जोशी, दासू वैद्य, अंजली कुलकर्णी, गणेश विसपुते, विश्वास वसेकर, कविता महाजन, ज्योत्स्ना चांदगुडे यासारखे अनेक मान्यवर साहित्यिक, कवी 'अयान'च्या शुभारंभाचे मानकरी झाले आहेत.

चाररंगी मुखपृष्ठ, देखणी सजावट व संपूर्ण अंक आर्ट पेपरवर छपाई असलेला साहित्यमूल्य जपणारा हा दिवाळी अंक ऐन दिवाळीत रसिक वाचकांच्या भेटीस येत आहे. ऐन दिवाळीत तो सर्वत्र उपलब्ध राहील. आजच आपल्या पुस्तक विक्रेत्यास हा अंक राखून ठेवण्यास सांगा. अधिक माहितीसाठी संपर्क :

कवी अनिल कांबळे, अध्यक्ष, प्रेरणा आर्ट फाउंडेशन
बी/१३ लिजन्ड क्लासिक, सुतार दवाखान्याजवळ, कोथरूड, पुणे : ४११ ०३८
मोबाईल : ९४२२५२०१७७/८६०५०१२२८५/९४२२३०४०५६/दूरध्वनी : ०२०२५३९७०४२
kavianilkamble@yahoo.co.in / gazalkaranilkamble@gmail.com / laxmikant05@yahoo.co.in

अनुक्रमणिका

# सिंधी व मराठी ह्या भाषांची तुलना

**वि. वि. दीक्षित**

*[मुसलमानी रियासतीत सिंधी भाषा ही खेडवळ लोकांची – भाषा म्हणून मानीत. शहरातील सुशिक्षित सिंधी, उर्दू–फारसीचा संस्काराने, मिश्र झालेली भाषा बोलत. हा राजकीय सत्तेचाच दुःष्परिणाम मानला जातो. भाषा अभ्यासकांच्या मते राजकीय भाषा शहरातच प्रभाव करते. पत्रव्यवहार करणारे 'आमील' ह्या सरकारी नोकरांनी फारसी भाषाच वापरली. खेड्यातील जनता शुद्ध स्वरूपातील सिंधी बोलते. मुसलमान राजवटीत सिंधी अरेबिक लिपीत लिहिली जाई. त्यामुळेही ही भाषा समाजप्रवाहातून बाजूला पडली. असे असले तरी, सिंध आणि कोकणपट्टी यांच्यात दळणवळण होते व संपर्कामुळे अनेक सिंधी वळणाचे शब्द मराठीत आले. मध्यंतरी सिंधी भाषेचे लिखाण देवनागरी लिपीत व्हावे, ह्या विचाराने सिंधीचे आणि मराठीचे संपर्क क्षेत्र विकसित झाले. त्यासंबंधी, संस्कृती व भाषाभ्यासक वि. वि. दीक्षित ह्यांनी, हा लोकबंध स्पष्ट केला आहे. –संपादक]*

सिंध प्रांत अनेक दृष्टींनी हल्ली महत्त्वास चढत आहे. मुंबई इलाख्यात जरी मागासलेला म्हणून त्याची गणना असली तरी सक्करचे धरण, मोहंजोदरो येथे सापडलेले प्राचीन अवशेष व राजकीय वातावरण इत्यादी गोष्टींमुळे सर्व हिंदुस्थानाचे लक्ष त्याच्याकडे वेधले आहे. ऐतिहासिक दृष्ट्यासुद्धा ह्या प्रांताचे महत्त्व कमी नाही. ऋग्वेद, महाभारत, इत्यादी प्राचीन ग्रंथांत त्याचा उल्लेख आढळतो. अलेक्झांडरने हिंदुस्थानच्या स्वारीत त्यातील पुष्कळसा भाग पाहिला होता. सातव्या शतकांत महंमद बिन कासिमने तो ब्राम्हण (शुद्र?) राजापासून हस्तगत केला व इस्लामचे निशाण ह्या देशात प्रथम त्याच वेळी रोवण्यात आले. पुढील ७००, ८०० वर्षांचा इतिहास जवळजवळ लुप्तप्राय झाला आहे. १५०० ते, सर चा. नेपियरने १९ व्या शतकात तो जिंकीपर्यंत, राजघराण्याची सुसंगत माहिती सापडते. जेत्या आरब लोकांनी मुसलमानी पेहराव व चालीरिती जित लोकांमध्ये प्रसृत केल्या; पण आरबी अगर फारसी भाषा ते जनसमूहावर लादू शकले नाहीत. इतकेच नव्हे, तर इंग्रजी अमलापूर्वी आरबी लिपी सुद्धा लोकात चालू नव्हती. देवनागरीपासूनच निघालेल्या अशा आठ लिप्या सर्व सिंधभर निरनिराळ्या भागात चालू होत्या. १८४० साली छापलेला सिंधी शब्दकोश देवनागरी लिपीतच आहे. इंग्रजी अमलात, सर्व प्रांतांस कारभाराच्या सोयीसाठी एकच लिखाण अमलात आणण्याचे ठरून, आरबी लिपीत थोडाबहुत फेरफार करून, ती सर्व लोकांवर कायद्याने लादण्यांत आली. तेव्हापासून बाकीचा सर्व हिंदुस्थान व सिंध ह्यांमध्ये एक अभेद्य तटच निर्माण झाला असून उभयतांचा परस्परसंबंध– सांस्कृतिक संबंध– जवळजवळ खुंटल्यासारखाच आहे. सिंधी व मराठी ह्या सख्या बहिणीसारख्या असून एकीला दुसरीची स्मृती सुद्धा राहिली नाही. काही गोष्टींत, गुजराथीपेक्षाही सिंधी आपणास जवळ आहे. ह्यावरून अनुमान काढण्यास हरकत नाही; की सिंध व कोकणपट्टी ह्यांमध्ये

समुद्रमार्गाने प्राचीनकाळी (७००-८०० वर्षांपूर्वी) बरेच दळणवळण असावे. पुढे बरेच दिवस हा मार्ग बंद पडला असला पाहिजे. जरी सिंधमध्ये शेंकडा ७५ मुसलमान वस्ती आहे, तरी हिंदू व मुसलमान एकच भाषा (सिंधी) बोलतात. हल्ली उभय समाजात तेढ उत्पन्न झाल्यामुळे निष्कारण भाषेचे हाल होत आहेत. प्राथमिक शाळांतील क्रमिक पुस्तकांतून संस्कृतजन्य शब्दांची हकालपट्टी करून आरबी अगर फारसी शब्द घालण्याचा यत्न चालू आहे. 'कटोरो' हा संस्कृतजन्य शब्द वाटून त्याऐवजी वाटो (वाटी) हा शुद्ध सिंधी शब्द घालण्यात येतो. पण दुर्दैवाने तोही संस्कृतजन्यच आहे; ही गोष्ट लक्षात येत नाही.

भरतभेटीच्या धड्यात चाकरिआ (पादुका) हा शब्द काढून जुती हा उर्दू शब्द घातला आहे. पण फायदा काय? उलट पादुका शब्दाऐवजी जोडा अगर वहाणा असा उपयोग करून पावित्र्याचा नाश मात्र होणार. हरिश्चंद्र राजाच्या कथेत 'धन्य' ऐवजी 'शाबास' घालून इस्लामी वातावरण मात्र उत्पन्न झाले. उलटपक्षी हिंदूही हिंदी भाषेतील नवेनवे शब्द उचलून संस्कृतजन्य शब्दांची विदग्ध वाङ्मयात रेलचेल उडवून देत आहेत.

चमत्कार असा की, खेड्यात प्रचलित जी सिंधी भाषा ती शुद्ध सिंधी व शहरांतील सुशिक्षित हिंदू जी सिंधी बोलतात ती फारसीच्या संस्काराने भ्रष्ट म्हणून अशुद्ध सिंधी असे सांगण्यात येते. शाळा व कॉलेजे ह्यात शेकडा ऐशी विद्यार्थी हिंदू आहेत, व ते सर्व दुय्यम भाषा म्हणून फारशी शिकतात. अर्थात् नित्य व्यवहारात पुष्कळसे फारशी शब्द वापरण्याची सवय त्यास लागावी, यात नवल नाही. अभिजात सिंधी म्हणजे जिच्यात उर्दू, फारसी व आरबी शब्द व अवतरणे ह्यांचे प्राचुर्य सर्वत्र आहे ती! असा समज आहे. आपल्याकडेही विद्वान लोक संस्कृताचा सर्रास उपयोग करून मराठीस नटविण्याचा यत्न करतात. परंतु हल्ली शुद्ध सिंधीकडे काही लेखकांचा कल जात आहे.

महाराष्ट्रात एक काळ असा होता की, मराठीत ग्रंथरचना करणे कमीपणाचे मानीत. सिंधीतही भर मुसलमानी रियासतीत सिंधी भाषा फक्त खेडवळ लोकांनी बोलण्यास योग्य असे समजत. सुशिक्षित लोक फारशी बोलत व लिहीत. त्या काली हिंदू लोकांनी फारशी भाषेत कवनेही केली आहेत.

शुद्ध सिंधीत शेकडा ८० शब्द संस्कृतजन्य व देशी व बाकीचे २० फारसी व आरबी भाषेतून उचललेले. शुद्ध सिंधी बोलणारे सर्व खेडवळ. म्हणजे मुसलमान व भ्रष्ट भाषा बोलणारे नागरिक म्हणजे बहुतेक हिंदू. असा विपरीत प्रकार आहे. सिंधमधील मुसलमानी बहुमत हे राजकीय पारतंत्र्यामुळे, आरब अमलानंतर उत्पन्न झाले असावे, असे निर्विवाद ठरते. एरवी इतके प्राकृत व देशी शब्द खेड्यातून आढळेना.

महाराष्ट्रात लिपीची सुधारणा करण्याची वावटळ उठली आहे. त्याचप्रमाणे हिंदुमहासभेच्या चळवळीमुळे देवनागरी लिपीत सिंधी लिखाण निदान हिंदूंपुरते तरी प्रचलित व्हावे, अशी खटपट चालू आहे. हल्लीची लिपी कृत्रिम असून शास्त्रीयदृष्ट्या दोषपूर्ण ठरते. शिवाय आरबीचा व सिंधीचा काही एक संबंध नसता ती विनाकारण लोकांवर लादली गेली आहे. ट्रंप हा व्याकरणकाराच्या मते सिंधी ही प्राकृतजन्य भाषा असल्यामुळे देवनागरी हीच तिची नैसर्गिक लिपी ठरते, परंतु मुसलमानांचे बहुमत लक्षात घेऊन देवनागरी प्रसृत करणे कठीण दिसते, तथापि उर्दू लिपी थोड्या फरकाने सुरू केल्यास, हल्लीचे पुष्कळ दोष कमी होतील. ज्या वेळी इंग्रजी अधिकाऱ्यांनी ही लिपी प्रचारात आणली; तेव्हा सर्व सरकारी नोकरवर्ग हिंदू होता. मुसलमान जरी राज्यकर्ते होते तरी लढणे व ऐषआराम भोगणे ह्या पलीकडे त्यांनी काहीच केले नाही. मुख्य दिवाण पुष्कळ वेळा हिंदूच असे. दप्तर तर हिंदूंनीच संभाळले होते. आमिल नावाने प्रसिद्ध असलेली हिंदूतील एक जाती. त्यातील लोक सरकारी नोकरी करणारे असे दर्शविते (आमिल = सरकारी नोकर). ह्या आमिल लोकांना कित्येक शतके देवनागरी लिपी पारखी झाली व फारशी भाषेत सर्व राजकीय

व्यवहार होत असल्यामुळे, तिच्यात त्यांनी प्रावीण्य मिळविले. ह्याच आमिल नोकरवर्गाने अव्वल इंग्रजीत आरबी लिपीस विरोध केला नाही; इतकेच नव्हे तर स्वत: ह्यांना देवनागरीचा गंध नसल्यामुळे आरबीचा पुरस्कार केला असावा, असे दिसते.

हल्लीसुद्धा देवनागरीच्या प्रचारास सुशिक्षित आमिल वर्गाकडूनच विरोध होत आहे. कारणे काय तर १ आरबी मोडीप्रमाणे झरझर लिहिण्यास येते आणि २ मुसलमान व हिंदू ह्यांमध्ये निष्कारण तेढ उत्पन्न होईल. हिंदू माणसास मुसलमान मित्रांशी लेखन-व्यवहार भाषा एक असूनही करता येणार नाही. खरे कारण एकच; अंगवळणी पडलेली लिपी टाकून देणे आर्यसंस्कृतीविषयी पर्वा वाटत नसल्यामुळे नकोसे वाटते. दोनही लिप्या शिका. एक मुसलमानांच्या मोहबतीखातर व दुसरी हिंदू संस्कृती टिकविण्यासाठी व अखिल हिंदूसमाजाशी दळणवळण (सांस्कृतिक) रहावे म्हणून असे सांगितले, तरी दुहेरी श्रम करण्याची तयारी नाही. मानववंशशास्त्रदृष्ट्या फारसी रक्त आमिल लोकांच्या अंगात खेळत आहे असे काहींचे मत. ते खरे असल्यास हिंदू संस्कृतीविषयी त्यांस विशेष प्रेम का वाटावे? एक सिंधी गृहस्थ तर लिपीत फेरफार करण्याविषयी बोलणे निघाले असता म्हणाले 'आरबी सदोष आहे, गोष्ट कबूल; पण देवनागरी तरी पूर्ण निर्दोष आहे कुठे? फरकच करायचा तर पिटमनच्या लघुलेखनपद्धतीनुसार पुष्कळ श्रम वाचविणारी लिपी का स्वीकारू नये?' ह्यावर देवनागरी लिपी आर्यसंस्कृतीच्या भावनेने स्वीकारणे इष्ट आहे हेच उत्तर. तार्किक वादविवादात कदाचित रोमन लिपी सुद्धा सरस ठरेल, किंबहुना सर्व हिंदवासीयांनी स्वभाषा अजिबात सोडून फ्रेंच अगर इंग्रजी भाषा तान्ह्या मुलांस शिकविण्यास प्रारंभ करणे आर्थिकदृष्ट्या व राजकीयदृष्ट्या लाभदायक ठरेल पण– पण मनुष्य हा निर्जीव यंत्र नाही, त्याला भावना आहे, हीच अडचण. **आता आपण उभय भाषांतील साम्याचा विचार करू.**

प्रथम सिंधी भाषेतील काही कवितांचे नमुने देऊन नंतर काही लोकांस रुक्ष वाटणारा पण अत्यंत चित्ताकर्षक व्याकरणविषयक भाग देऊ.

*बुड़ंदे बूड़निखे के हातिक हथ विझंनि*
*एड़ो लज लतीफु चवे पसो साणु कखनि*
*हेकर कंधिअ कनि: नत साणुनि वञनि सीरमें*

(नदीत) बुडणारे (लोक) बुडखे हातात धरतात व लतीफ म्हणतो पहा (पसो) गवताजवळ एवढी लाज (अब्रू) आहे. बुडणाऱ्यांना एकतर (हेकर) काठावर आणतील नाहीतर (नत) त्यांसह पाण्यात वाहवत जातील.

*[कखनि = कक्षा = रज्जु (गवताचे दोर करीत);]*
*चवे (सं. वच्, मराठी वचवच);*
*सिंधीत आद्यन्त विपर्यय झाला आहे..*

*पँहँजी पोख संभारि प्राणी पेहे ते चड़ही*
*खिमा रवांभाणिअसां कढें कल्पत झारी*
*ड़ेई वाडि वेसाहजी सामी भर्मु निवारि*
*त खणें बेहदि बारि अनभइ अखुट अन्नाजजी*

प्राण्या, ¹पीठावर चढून आपले पीक संभाळ. (क्षमारूपी) गोफणीने कल्पनेचे पक्षी काढून टाक (हाक). विश्वासाची (वेसाहजी) वडी देऊन (करून) सामी (म्हणतो) भ्रम निवारण कर तर (म्हणजे) आत्मानुभवरूपी अकुंठित (अखुट) अन्नाची बेहद्द रास घेशील.

[वाडी = वल्ली = वई (म.); भर्मु = भ्रम: – भम्मो – भम्मु (अपभ्रंश)]

**अकारान्त पुल्लिंगी शब्दाचे शेवटी 'उ' अवशेष विसर्गाचा राहिला आहे. ज्ञानेश्वरीसारख्या जुन्या मराठीतही हा आढळतो.** ही 'उ' लकब कानडीतीलच हे मत लंगडे पडते. अखुट हल्लीच्या मराठीत आढळत नाही, पण खेडवळ भाषेत दिसतो 'माझे काय त्यावाचून खुटले आहे'. खुंटा वगैरे सर्व कुंठ पासूनच निघाले आहेत.

*दिलि करि दरख्त जे दस्तूर*
*(आपले मन झाडाप्रमाणे कर)*
*छाडप लबे छुगा छणनि मेवा ऐं ब्यो बूर*
*कुहाडो लगे कूक न करे दर्दु न रखे सूर*
*वढीं-दरसां वरु न रखे तोडे भञी करे चूर*
*पाणु जलाए छांव करे नितु इन्हींअ ते नूर*

(जर) झोडपले (हालविले) तर झुबके (छुगा) खाली पडतात. शिवाय फळे व फुले (मिळतात). [छुगा = गुच्छ = गुत्स]

**कुऱ्हाड (कुहाडो)** लागली तरी कूं कूं करीत नाही (व) वेदना आठवत नाही.

लाकूडफोड्याशी वैर राखीत नाही; (तो) तोडो फोडो वा चूर करो. स्वत: जळून (तापून) (इतरांस) सावली करतो. नित्य अशा प्रकारचे त्याचे तेज (नूर = ईश्वरी प्रकाश = प्रसादिक वागणूक) आहे.

[ब्यो = दोन = वेकंबे (मराठी पाढा).

कूक (कण्हण्याच्या आवाजावरून निघालेला शब्द) कूं कूं अगर कांकू.

वढींदरसां विध् (विद्ध) - विड्ड-वीढ-वढीं+दर (करणारा) + सां वैदिक

सा अथवा सह; म. सीं (शीं); मूळ मराठी प्रत्यय सीं जुन्या मराठींत रूढ आहे.

पाणु = स्वत:, आपला, अंतरंग = आपण. मीपणा (मराठी) = अहंपणा

'मुलगी पणात आली' येथे वयात आली; स्वत:सिद्ध जाहली.

पाणमें वेटो आहे = अंतर्गृहात (अगर गूढ विचारात) बसला आहे.

पाणी (सिंधी) ओळखणे म्हणजे अंतरंग समजणे. आपण (स्वत:) ची षष्ठी आपला अशी होते, पण सिंधीत नेहमीचाच प्रत्यय जो जी लागतो उ. पाणजो पुटु.

पाणजो माण्हूं आहे = आपला (च) मनुष्य आहे. छांव = छाया = सावली. सिंधी शब्द संस्कृतला अधिक जवळ आहे.]

*जेड्हो तुंहिजो नांउं बाझ बि ओडियाई मङा*
*रे थंभे रे थूणिअ तूं छपरु तूं छांइ*
*कुजारो कहांइ तोखे मैलूम सभका (शहा लतीफ).*

(ईश्वरा) जेवढे तुझे (तुंहिजो) नाव मोठे तेवढी कृपा सुद्धा (मी) मागतो.

खांबाशिवाय व खोडाशिवाय तू छप्पर व छाया आहेस. (फार) काय सांगू, तुला सर्वाविषयी ज्ञान आहे.

[जेडो नांउं ओडियाई बाझ = जेवढे नाव तेवढी कृपा.

रे = ऋते. (म॰) रें रें करीत परत आला. रें रें करू नको.

थूणिअ = स्थूणा. थंभु = स्तंभ = खांब (अधिक परिणत)]

अल्लाह इएं म होइ जिअं आउं मरां बन्दमें
जुसो जंजीरुनिमें रातो डींहां रोइ
पहरी वञां लोइ पोइ मरू पुजनभि डींहड़ां.

देवा असे न होवो की (ज्यामुळे) मी बन्धनांत मरेन;
(माझा) देह जंजाळात (साखळदोऱ्यांत) रात्रंदिवस रडतो (शोक करतो);
प्रथम (मला) (स्व) लोकास जाऊ दे मग भले दिवस जावोत.

[आऊं = आं = मां = अहम् = मी : सिंधीत तीन शब्द आहेत.

पहिरीं प्रहर. म. पहिली वइली राम पहारा. अथवा प्रथम = पहभर = पहिमर = पहिरी.

मरु = मृ = मरोत, मरूं दे, जाऊ देत, अशा लाक्षणिक अर्थाने.]

*मरणा अगे जे मुआ से मरी थिअनि न माति*
*हून्दा से हयाति जिअणा अगे जे जिया*

मरणापूर्वी जे मेले ते (पुन्हा) मरत नाहीत व कोणी त्यांना मारीत नाही.

ते जिवंत (सदा) राहतील, जे जीवनाच्या (ह्या जन्माच्या) पूर्वी जिवंत होते.

तुकारामाच्या 'आपुले म्या मरण पाहिले मी डोळा' ह्या वचनानुरूप वरील उद्गार आहेत.(?)



अनुक्रमणिका

[हयाती = हयात - गांवढळ - हैति (आहेत ऐवजी) जे, से = जे, ते.]

*सभेई सुहागिण्यूं सभिनी मुंहं जडाउ*
*सभकंहि भांयों पाणखे ईंदो मूं धरि राउ*
*पेठो तिनि दरांउ जे पसीं पाण लजा इयूं*

सर्व सुवासिनी आपापली मुखें (अलंकारांनी) जडवून (बसल्या). सर्वांना मनात वाटले, आपल्या घरात राजा (प्रियकर) येईल. घरात प्रतीक्षा करीत बसल्या. जेव्हा त्याला (आलेला) पाहिले (तेव्हा) त्या मनात लज्जित झाल्या.

[सुहागिण्यूं = सुभागिनी = सुहागिणी - ण्यूं (अनेकवचन).

दराँउ = दुर् = घर. म. दार.

मुंहं = मुख. जडाउ = जडवून, जडावाचे दागिने जइ = घट (सं.)]

वरील उताऱ्यांवरून मराठी व सिंधीचा सापेक्ष संबंध काय आहे ह्याची बरीच कल्पना येईल. आता क्रियापदे, नामे विशेषणे इत्यादिकांत जेथे विशेष साम्य आहे ती उदाहरणे पाहू.

**क्रियापदे**

उघु (पुसणे) उगा, उगा (सं. वह्) - ओघळ डोळे पुसण्याच्या क्रियेवरून सान्त्वनपर अर्थ पडला आहे.
चंबुडु = जवळ चिकटणे; चुंबळ, चंवड-चंबू (गवाळे).
चुघु = भोक पाडणे; चघळ (छिद्रान्वेषी) चूक (खिळा).
चुणु = चूण पाडणे
चुमु = मुका घेणे-चिमा ९ाव) सं. चुम्ब
बकु = बडबडणे- बकबक फार करू नये.
(कारक) बुझु (बुध्) = समजणे. बुझावूं शकेना विधाता तयाला
भञु भुञु (भञ्ज) भडर्भुजा (फोडणे, भाजणे).
मुँजु = धाडणे, मुंज (उपनयन) गुरुगृही धाडणे. सं. मुंजा = गवत.
बिहणु, (उभे रहाणे) कारक (बिहारणु) उभारणे. मूळ क्रिया॰ उभणें असावें.
लुणु (लु) शेत कांपणे- लोण (आठ्या-पाट्यातील). लवण ह्या शब्दाशी संबन्ध नाही.
सुण्कु सिण्कु = शिंकरणें, बाळ सूंकर इं. 'स्नीझ' नाकातील आवाजावरून शब्द बनला असावा.
बचुडु गुंतविणें, गुंफणें; बुचडा.
कशणु (कृष्) ओढणे, कसणे (जमीन नांगरणे). सिंधीत मूलार्थ कायम आहे. मराठीतही कसून मेहनत करणे, ह्यांत मूलार्थ सापडतो. त्याने खसकन दोरी ओढली, ह्यांत कृष् व बह दोन्ही क्रियापदें विशेष जोर दाखविण्यासाठी योजिलीं आहेत.
खांइणु = जळणें जाळणें; खाईत टाकलें
लिको (भूतभूतकाळ) लपलेला. कोकणांतील लिकणें
चखणु = चाखणें, रुचकर लागणें

| | |
|---|---|
| छाडपनुं (छिद् का.) | झडपणें |
| छाड़प | झडप |
| झलणुं | झेलणें |
| मुर्किणो | मुर्का मारणें |
| छुहु (स्पृश्) - | शिवणे (स्पर्श करणे) |
| मोट्णुं | मोटी-मोडणें, मागें वळणें नागमोडी |

**संयुक्त क्रियापदें**

| | |
|---|---|
| खाई वटु | = जलदी खा, खा-ऊठ |
| करे सघणु | = करूं शकणें |
| पड़हंदो रहणु पढत | = (शिकत) रहाणें |
| करण लगणु | = करूं लागणें |

**नकारवाचकशब्द**

अण (ड़िठो) = अ+दृष्ट (दैव)
ना (चङो) =न चांगलें (वाईट) नाचक्की
अ (धर्मी) =अधर्मी
नि (भागो) = अभागी
बे (गुणो) =विगुणी, बे (अक्कल)
ला (चारु) = लाचार (चारो=उपाय)
रे (कमो) = रि + (कामा)

## नामांपासून विशेषणें

को प्रत्यय (सं. इक) हाणे – हाणे+को (हल्लीचा) म. (दिड+का) दीड + का म. दीड पायाचा)
कारा-कारा + इतो कराईत (उपयुक्त)
डंदि + (रु) दंता + डा सं. शरा +रु
पुजा + रो पुजा +री
पिंजा +रो पिंजा +री

## भाववाचक नामें

चङो= चङाई, चांगुलपणा, महागाई, शिलाई, स्वस्ताई

घटि (कमी) ताई कम+(ताई) घटत साधुपणु, पणो साधूपण, साधूपणा

माण्हूं– (मनुष्य) माणुसपण, पणा माण्हि + पी, + पो, + पाई + पणो पणु

तांद्धत शब्द कर्तृवाचक

मेहि (म्हैस) मेंह्युनिवारो म्हैसवाला, गोवारी

लोहु (लोह) लुहरु लोहार

धणु (धन् = धांवडविणें) =धन (गो) धन + रु अक्षरांच्या उलटापालटीने धन (गो) रु = धनगर

धनारु = गुराखी

## क्रियाविशेषणें

मस कष्टानें म. मस = पुष्कळ
मसें श्रमाने
मसां
ओचितो अवचित

भेरे भेरे (भेरो = काळ) नेहमी, सतत भैरव व काल = म. (काल) भैरव ह्यांचे तादात्म्य झालें आहे = भिरीथिरी हिंडतो

मुखामुखी तोंडातोंडीं

## अव्ययें वगैरे

एबजि ऐवजी
साम्हुणे सामने
माझ्या सामने येऊं दे
बोलायाला
बदरि बदली
लगि लगे लागीं
भर = वर भरीला आणखी पाहुणा घेऊन आला आहे गिळायला
कोन (कोऽन्य:) कोण-कौन (हिंदी)
–गांवढळ कोन
जेकर जर करून
पिणि पुणि बि, पि मी पण (पुन्) बि जाईन
नत नातरि (नाहींतर)
सूषां (पर्यंत; आजसुद्धा पूर्व-वैभवाची साक्ष तेथें पटते.)

## उद्गारबोधक

छि छा हुं (नापसंती दर्शक) छे छे! हेड
थू थू
मरु वा मारु काम केलेंत
भली भले
वाहु वाहवा

अपशब्दांतही वैदिककालचा कृदन्त शब्द सा कायम आहे.

भेण (बहिण) सां. वै. गोऽसा, अश्वऽसां (धियम्) मराठीतील भानचोदाचा भेणसां हा भाऊ आहे.

फक्त सन् ऐवजी चुद् वापरला आहे. पण लवंडिसां ह्यांत सन् (जिंकणे, मिळविणें) कायम आहे.

## नात्याचे शब्द

ससु (श्वश्रू) सासू
नुंहु (स्नुषा) सून

आईआजी, आई तरुण असल्यामुळे उत्तर सिंधांत आजीला उद्देशून हा शब्द वापरतात. मराठींतही पुष्कळ ठिकाणीं तसा उपयोग करितात.

भाणेजो (भागिनेय) = भाचा
पुटु (पुत्र) = पूत (मायेचा)
जाट्रो (जामातृ) = जांवई
बापु = बाप









अनुक्रमणिका

हा शब्द कानडींतूनच आला हें म्हणणें टिकणार नाही.

| | |
|---|---|
| भाभी | भावजय |
| भाव | भाऊ |
| संडु | साडू |

**जुना वर्तमानकाळ**

असणुं (अस्)

| १ एकवचन | बहुवचन |
|---|---|
| प्र. पु. आह्यां (अह्मि प्रा.) | आंह्यूं |
| द्वि. पु. आहीं | आह्यो |
| तृ. पु. आहे | आहिनि |

मरीठीशीं ह्याचें विलक्षण साम्य आहे.

सिंधींत सामान्य वर्तमानकाळ थो थी (पु. व स्त्री. १ वचन) व था, थ्यूं (अनेकवचन) लागून होतो. मराठींत तो ते, तें, व तों, तां, तात असे भिन्न प्रत्यय लागतात. सिंधींत नपुंसक लिंग नाहीं.

गांवढळ मराठीत स्त्रीलिंगी प्रत्यय ईकारान्तच (सिन्धी थी प्रमाणें) असतो हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

उ. ती जाती (जाते ऐवजीं). मी बसतीं (बसतें). भूतकाळ व भविष्यकाळ यांचे प्रत्यय भिन्न आहेत. उ.

सुभाणे मिहु वसे जान वसे परिहँ त वसंदो

(उद्या मेघ वर्षेल वा न वर्षेल, परवा तर वर्षेलच.)

जे मार्यां थो सपखे त पापुथो थिएमि अँउँ जे न मार्यां त डंगेमि थो.

(जर सापाला मारावे तंर पाप लागते आणि जर न मारावे तर डसतो.)

वर्तमानकालीन थो थी वगैरे क्रियापदाच्या पुढे अगर मागे येऊ शकतात, व क्रियापदापासून ते पृथक् लिहिण्याची वहिवाट आहे.

| | |
|---|---|
| लुंडु | लवंडा (महिना) |
| लुण्ड् | लुण्डा (कान) |
| लंगडे असणे | रिकामे असणे चोरणे |
| चपुटि | चिमुट (चञ्चूपुट) |
| अछुत | अस्पृष्ट=स्वच्छ |
| बभूत | विभूति (देवाचा अंगारा) |
| वड्वर | वरव्रत; वडवते (वटसावित्री पूजेसंबंधी.) |

| | |
|---|---|
| वींढो | नथ (वेढणे) |

मोठ्या नथीला नथच शब्द आहे.

| | |
|---|---|
| हंघ | हंत (रूण) |
| जणीस्त्री, | सातजणी (जनी) |
| आर (आरि) | आरी पराणी |

वैदिक आरा = दाभण, चाबकाचे लोखंडी टोक

लुब्धो (✓ लभ् + रो) लुब्रा (मनुष्य)

झमठमल्ल कमठमल्ल (कूर्मावतार) एक नाव

| | |
|---|---|
| पखाल (पयस्खल.) | पखाल |
| निलो (नील=आकाश) | निवळ |
| गचु | पूर्ण, गच्च |
| बिन्द्रो (विद्रूप) | बुद्रुक, ठेंगू |
| ढोल्यो (स्थूल) | ठोल्या (जार) (प्रियकर ह्या अर्थीही उपयोग.) |
| तिखी काती (कर्तु) | तिखट (तीक्ष्ण) चाकू |
| फोटो (स्फोट) | बुडबुडा, फुटणे ह्या क्रियापदाशी साम्य |
| सवा (१।) | सवा |
| सिरापु (शाप) | श्राप (शराप) |
| जाचे | परीक्षा करून चाचणी |
| बैरागी (बेरग्ग प्रा.) | बैरागी |
| जत्ता (यात्रा) | जत्रा |
| पथरु (प्रस्तर) दगड, | पाथरवट, पत्थर |
| संइसारु | सवसार |
| अंगारु | अग्नी-इंगळासारखे डोळे |
| जिति तिति | जेथे तेथे |
| जिअ तिअ | यदा तदा |
| पुरुसु | पुरुष |
| गरो (गुरु) | जड, गार झालो भाषण ऐकून |
| सेणु शेणा | शहाणा (स्नेही, सणेह) (मूळ अर्थ स्नेही) |
| रिणु (इरिण) | रान (ओसाड प्रदेश) |
| पीजु (पेय) | पेज |
| पुठि (पुष्टि) (अगर पृष्ठ) | सत्ता |

त्याच्या पुठ्यांतील आहे तो. ह्यांत हातांतील, ताब्यांतील असाही अर्थ संभवतो.

डबलु (दुर्बळ) दुबळा
ढ़ापणु (पृप्त होणें) ढइणु (तृप्त करणें)
(म. ढइ+कर=ढेंकर)

प्राकृतप्रमाणेच सिंधीमध्ये पुष्कळ स्वर एकत्र आले तरी संधि होत नाहीं. एकत्र आलेल्या स्वरांत वेगळेपणा राहावा म्हणून सिंधी लोक अनुस्वारांचा भरपूर उपयोग करतात. एकंदरींत नाकांतून बोलण्याची लकब आढळते. रत्नागिरींतील मराठीपेक्षाही अनुस्वार सिंधी शब्दांत अधिक सांपडतील.

सुखा-सुखाउं (अनेकवचन आउं)-व्रतें निश्चय
गंउं (गउ) गाय (गौ)

शब्दाच्या शेवटीं दीर्घ स्वर आल्यास जोर देण्यासाठी.

प्रीं (प्रिय) मित्र
भूं (भू) भूमि

सिंधी ही प्राकृताला मराठी पेक्षां बरीच जवळ आहे. सामान्यपणें ज्ञानेश्वरींतील मराठी व आजची शुद्ध सिंधी ह्यां उभयतां एकाच पायरीच्या भाषेच्या उत्क्रान्तीच्या दृष्टीने उतरतील असें वाटतें.

हल्लीच्या मराठींत पुष्कळ तत्सम संस्कृत शब्द घेतल्यामुळे जुने तद्भव व देशी शब्द मागे पडले. परन्तु सिन्धी बोलणाऱ्या लोकांचा संस्कृताचा व्यासंग जवळ जवळ १००० वर्षे कायमचा तुटल्यामुळे तद्भव शब्द कायम राहिले आहेत.

देवनागरीत सिन्धी लिखाण सुरू झाल्यास कित्येक शतकें परस्परापासून विभक्त होऊन भेटलेल्या भगिनीप्रमाणे ती मराठीस दिसेल ह्यांत नवल नाहीं.

देवनागरींत लिहिलेलीं क्रमिक पुस्तकें हल्ली कांही संस्कृत पाठशाळांतून व मुलींच्या शाळांतून सुरू आहेत. शिक्षणखात्याने मुलींच्या प्राथमिक शिक्षणांत देवनागरीचा उपयोग करण्याची संमति दिली आहे. परन्तु जोंपर्यंत हायस्कूलच्या अखेरच्या परीक्षेंत आरबी लिपीच सिन्धी भाषा लिहितांना वापरावी असा निर्बन्ध आहे; तोंपर्यंत देवनागरीस उत्तेजन मिळणें कठीण दिसतें. सिन्धमधील ब्राह्मणवर्ग तर तिला म्लेच्छ भाषा समजतात. कांही लोकांच्या मतें हिन्दी हीच मातृभाषा म्हणून शिकवण्यांत यावी. कारण सिन्धी शिकून मनुष्य पिंजऱ्यांत पडल्याप्रमाणे होतो. एकन्दर सिन्धी बोलणाऱ्यांची संख्या अवघी ३० लक्ष आहे व तिच्यांत नांव घेण्यासारखें वाङ्मय जवळ जवळ नाहींच म्हटलें तरी चालेल. विश्वविद्यालयांत मराठी व इतर मातृभाषांबरोबर तिला स्थान मिळाल्यामुळे मॅट्रिकपासून एम्. ए. च्या परीक्षेपर्यंत पुस्तके नेमणें कठीण झालें आहे. जें पुस्तक बी.ए.ला नेमतात तें विशेष अडचणीशिवाय इंग्रजी पांचवींतील मुलगा वाचूं शकतो. तथापि आजचा काळ मातृभाषांच्या उदयाचा असल्यामुळें अभिमानाखाली असले प्रकार झाकले जातात. भाषेची प्रगती होण्यास प्राकृत व संस्कृतचें ज्ञान अवश्य पाहिजे. त्याचा सबंद परीक्षांच्या उद्देशपत्रिकेंत कोठेच निर्देश केला नाहीं. सिन्धी भाषा घेऊन विद्यार्थी थोड्या श्रमाने परीक्षांच्या चरकांतून बाहेर पडतात हाच एक फायदा दिसतो.

मराठीप्रमाणे हिचा गुजराथीशींही निकट संबन्ध आहे. दोन्ही शौरसेनी प्राकृतपासून निघाल्या आहेत असा तर्क आहे.

मराठी भाषेचा सांगोपांग अभ्यास करणाऱ्यास सिन्धी भाषेच्या व्याकरणाचें व वाङ्मयाचें सामान्य ज्ञान उपयोगी पडेल असें वाटतें. कांहीं मराठी शब्दांची व्युत्पत्ति सिन्धीच्या मदतीने होते हें दर्शविलें आहे. विशेष अभ्यास केल्यास असे कित्येक शब्द सहज उलगडतील.

*(म.सा.पत्रिका, ऑक्टोबर १९३०)*

---

१. पेहु = पीठ (-म. पिढें जात्याखालील) = पक्षी हाकलण्याची उंच जागा.
२. मराठीतही षष्ठीचा जो प्रत्यय आहे. उ. श्री रायाजा प्रधानू (नागांव शिलालेख - म. सा. प. व. १ अं. १ पाहा.)

*



अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे आणि विविध शाखांचे कार्यवृत्त

**(दि. १६ फेब्रुवारी २०१२ ते १५ मार्च २०१३)**

## – पुणे शहर –

**१) दि. १९ फेब्रुवारी २०१२ : नवं कोरं :-** मनोहर सोनवणे यांच्या 'सदरा बदललेली माणसं' या पुस्तकावर चर्चा झाली. श्री. वसंत आबाजी डहाके हे या चर्चेच्या अध्यक्षस्थानी होते. अवधूत परळकर यांनी या चर्चेत भाग घेतला. लेखक सोनवणे यांनी आपली भूमिका विशद केली.

**२) दि. २१ फ्रेब्रुवारी २०१२ :- कॉंटिनेण्टल पुरस्कृत कै. चिं. वि. जोशी पारितोषिक वितरण समारंभ -** अपर्णा पाटकर यांच्या 'स्माईल प्लीज' या पुस्तकास व शिवांजली प्रकाशनास सौ. मंगला गोडबोले यांच्या हस्ते हे पुरस्कार प्रदान करण्यात आले. परिक्षकांपैकी बंडा जोशी यांनी मनोगत व्यक्त केले. दुसरे परीक्षक श्याम भुर्के उपस्थित होते. अपर्णा पाटकर व प्रकाशक लोणकर यांनी मनोगत व्यक्त केले. तसेच देवयानी अभ्यंकर यांनीही मनोगत व्यक्त केले.

**३) दि. २६ फेब्रुवारी २०१२ - पहिले पर्यावरणप्रेमी साहित्य संमेलन -** किर्लोस्कर वसुंधरा आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवाच्या वतीने म. सा. परिषद आयोजित पहिले पर्यावरणप्रेमी साहित्य संमेलन पुण्यातील बालगंधर्व रंगमंदिराच्या कलादालनात दिवसभरासाठी झाले. श्री. ना. धो. महानोर अध्यक्ष होते. सकाळी 'वृक्षदिंडी' आयोजित केली होती. रेणूका स्वरूप, हुजुरपागा इत्यादी शाळांच्या मुलींनी दिंडीत सहभाग दिला. पर्यावरण, संस्कृती, समाज, शासन आणि साहित्य या विषयावर महानोरांचे बीजभाषण झाले. डॉ. सरोजा भाटे, डॉ. रामचंद्र देखणे, अभिजीत घोरपडे, आरती कुलकर्णी, डॉ. अनिल अवचट, डॉ. श्री. द. महाजन व अतुल देऊळगांवकर यांची वेगवेगळ्या पर्यावरणविषयक विषयांवर भाषणे झाली. या संमेलनास पर्यावरणप्रेमी व विद्यार्थी यांची उल्लेखनीय उपस्थिती लाभली होती.

**४) दि. २६ फेब्रुवारी २०१२ -** कुसुमाग्रज जन्मशताब्दिनिमित्त 'एक किरण सूर्याचा' हा कुसुमाग्रजांच्या साहित्याचा मूल्यवेध घेणारा विविधरंगी कार्यक्रम मसाप, विवेक व्यासपीठ, गरवारे महाविद्यालय, संस्कार भारती यांनी संयुक्तपणे आयोजित केला होता. संहिता, संयोजन व सूत्रसंचालन डॉ. अरुणा ढेरे यांचे होते. कवी ग्रेस यांची विशेष उपस्थिती होती.

**५) दि. २८ फेब्रुवारी २०१२ - विज्ञानदिन -** मराठी विज्ञानपरिषदेच्या संयुक्तविद्यमाने विज्ञानदिनानिमित्त डॉ. मंगला नारळीकर यांचे 'गणिताची गरज व जरब' या विषयावर व्याख्यान झाले. उपस्थितांच्या प्रश्नांना डॉ. नारळीकर यांनी उत्तरे दिली. प्रा. ह. ग. भोसले व डॉ. माधवी वैद्य उपस्थित होते. विज्ञानपरिषदेचे कोषाध्यक्ष भालचंद्र अत्रे यांनी सूत्रसंचालन व आभार मानले. संजय भामरे यांनी प्रास्ताविक केले.

**६) दि. २९ फेब्रुवारी २०१२ - स्वा. वि. दा. सावरकर पुण्यतिथी -** विधिज्ञ नितिन आपटे यांचे 'सावरकर आज असते तर' या विषयावर व्याख्यान झाले. याचवेळी तात्यासाहेब तथा प्रतापराव गोडसे यांना श्रद्धांजली वाहण्यात आली.

**७) दि. ७ मार्च २०१२ - दिवाळी अंक स्पर्धा पारितोषिक वितरण समारंभ व ई-निरागस (ई-बुक)चे प्रकाशन -** मोनिका गजेंद्रगडकर यांच्या हस्ते दिवाळी अंक स्पर्धांचे पारितोषिक वितरण झाले. व ई निरागस चे प्रकाशन काही शाळांचे विद्यार्थी व मान्यवरांचे

हस्ते झाले. धनंजय दातार, संजयं जोशी, व वंदना बोकील कुलकर्णी आणि चंद्रकांत शेवाळे, मीनाक्षी केळकर यांचा सत्कार करण्यात आला. संतोष शिंत्रे यांनी विजेत्यांचा प्रतिनिधी म्हणून मनोगत व्यक्त केले.

**८) दि. १२ मार्च २०१२ - स्व. यशवंतराव चव्हाण जन्मशताब्दी निमित्त -** संवाद पुणे व मसाप यांच्या संयुक्त विद्यमाने स्व. चव्हाण यांच्या जीवनावरील दीड तासांची चित्रफीत दाखविण्यात आली. व रत्नागिरी येथील कार्यकर्ते संतोष शिर्के यांना घरपोच ग्रंथालय चळवळीसाठी अनिल कुलकर्णी व कार्यवाह सुनिताराजे पवार यांनी उपलब्ध करुन दिलेले ग्रंथ भेट देण्यात आले.

**९) दि. १५ मार्च २०१२ - परिवर्तन कवि संमेलन -** लोकशाहीर आण्णाभाऊ साठे अध्यासन, पुणे विद्यापीठ व मसाप यांच्या संयुक्त विद्यमाने रमण रणदिवे, प्रदीप निफाडकर, इलाही जमादार, अनिल कांबळे, धर्मराज निमसकर, परा. संतोष काळे, कल्पना दुधाळ, अंजली कुलकर्णी, लता ऐवाळे, अस्मिता जोगदंड, चंद्रकांत वानखेडे, डॉ. बाबासाहेब सोनवणे, राजन लाखे, उद्धव कानडे या कवींचा सहभाग असलेले कविसंमेलन झाले. विद्यापीठाचे उपकुलसचिव बाळासाहेब नाईक, प्रकाश घोडके, प्रा. रामनाथ चव्हाण, डॉ् माधवी वैद्य व प्रा. मिलिंद जोशी उपस्थित होते.

**१०) दि. १० मार्च २०१२ - बा. सी. मर्ढेकर स्मृतिदिन व रा. श्री. जोग समीक्षा पुरस्कार वितरण समारंभ -** डॉ. न. म. जोशी अध्यक्षस्थानी होते. 'मर्ढेकरांची काव्यशैली' या ग्रंथाचे लेखक डॉ. प्रा. सुरेश भृगुवार यांना रा. श्री. जोग पुरस्कार देण्यात आला. 'मर्ढेकरांची कविता' या विषयावर मर्ढेकर स्मृतिदिनाचे निमित्त साधून त्यांचे व्याख्यान झाले. ग्रंथाच्या प्रकाशनाचा पुरस्कार अमृता ऋतुपर्ण कुलकर्णी यांना देण्यात आला. डॉ. चंद्रशेखर बर्वे यांनी कै. जोग यांच्या आठवणी सांगितल्या. डॉ. कल्याणी दिवेकर व डॉ. मनोहर जाधव यांनी परिक्षक म्हणून काम केले. डॉ. जोशींनी अध्यक्षीय समारोप केला.

**११) दि. २४ मार्च २०१२ - सौ. पुष्पा पुसाळकर स्मरणार्थ पुरस्कार -** उत्कृष्ट ग्रंथनिर्मितीबद्दल राजहंस प्रकाशनाला हा पुरस्कार देण्यात आला. श्री् दिलीप माजगांवकर यांनी तो स्विकारला. 'वेणूविज्ञान' या ग्रंथास हा पुरस्कार राजेंद्र बनहट्टी यांच्या हस्ते देण्यात आला.

**१२) दि. १७ एप्रिल २०१२ - कवी ग्रेस यांना श्रद्धांजली सभा -** नंदा पैठणकर, श्रीनिवास वारुंजीकर, डॉ. निलिमा गुंडी, प्रा. मिलिंद जोशी, रविमुकुल, संजय भास्कर जोशी, डॉ. माधवी वैद्य, डॉ. अनिल अवचट यांनी श्रद्धांजली पर भाषणे केली.

**१३) दि. १० एप्रिल २०१२ - ज्ञानकोशकार श्री. व्यं. केतकर स्मृतिदिन -** पुण्यातील कमला नेहरु उद्यानातील कै. केतकर यांच्या समाधीला हार व फुले वाहून श्रद्धांजली वाहण्यात आली. डॉ. माधवी वैद्य, सुनील महाजन, दीपक करंदीकर, डॉ. कल्याणी दिवेकर, नगरसेविका अनुराधा सहस्रबुद्धे व इतर नागरिक उपस्थित होते. तसेच परिषदेच्या सेवकवर्गापैकी डहाळे व केळकर उपस्थित होते.

**१४) दि. १७ एप्रिल २०१२ - कै. शं. ना. जोशी ग्रंथपुरस्कार प्रदान सोहळा -** अनंत दीक्षित यांच्या हस्ते डॉ. येळगावकर यांना पुरस्कार प्रदान करण्यात आला. त्यांनी मनोगत व्यक्त केले. अध्यक्षीय समारोप दीक्षित यांनी केला. श्री. मो. शं जोशी यांनी कै. जोशींच्या आठवणींना उजाळा दिला. परिक्षकांपैकी पांडुरंग बलकवडे यांनी मनोगत व्यक्त केले.

**१५) दि. १८ एप्रिल २०१२ - विरासतसप्ताह -** म.सा.प. व जनवाणी संस्था व अनन्वय फाऊंडेशन या संस्थांच्या वतीने 'विरासत सप्ताहा' अंतर्गत 'जागतिक वारसा दिन' परिषदेतील वा. गो. आपटे ग्रंथालयातील दुर्मिळ ग्रंथांचे दिवसभर प्रदसर्शन आयोजित करून साजरा करण्यात आला. तसेव परिषदेच्या वास्तूचे दर्शन जिज्ञासूंना घडविण्यात आले. सायंकाळी 'अनन्वय'ने तयार केलेली शांताबाई शेळके व विंदा करंदीकर यांची चित्रफीत दाखविण्यात आली. तसेच 'साहित्यिकांची स्वाक्षरी' या मोहिमेचा प्रारंभ म.श्री. दीक्षित यांची स्वाक्षरी घेऊन करण्यात आला. जनवाणीच्या प्राजक्ता पणशीकर उपस्थित होत्या.

**१६) दि. १९ एप्रिल २०१२ - कै. कमांडर म.के.. लेले स्मृतिदिन -** 'अर्थक्रांती' चळवळीचे अर्थतज्ज्ञ श्री अनिल बोकील यांचे 'भारताची आर्थिक गोंधळाची स्थिती आणि वर्तमान' या विषयावर व्याख्यान झाले. डॉ. व्ही.व्ही. घाणेकर यांनी कै. कमांडर लेले यांच्याविषयी माहिती सांगितली. वक्त्यांनी श्रोत्यांच्या प्रश्नांना उत्तरे दिली.

**१७) दि. २३ एप्रिल २०१२ - जागतिक ग्रंथ दिन -** पुस्तकांनी आम्हाला काय दिले? या विषयावर रविमुकुल, ह.मो. मराठे, भानू काळे, श्याम जोशी, सुनीताराजे पवार या वक्त्यांनी चर्चेत भाग घेतला. प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांना या वक्त्यांना प्रश्न विचारुन चर्चेत संवाद साधला.

**१८) दि. २७ एप्रिल २०१२- कवी यशवंत पुरस्कार प्रदान समारंभ -** वलय मुळगुंद यांच्या 'एक झाड शब्दांचे' या कवितासंग्रहासाठी अध्यक्ष डॉ. अरूणा ढेरे यांच्या हस्ते 'कवी यशवंत' पुरस्कार देण्यात आला. परिक्षक मीरा शिंदे यांनी मनोगत व्यक्त केले. किशोर पेंढारकर यांनी कवी यशवंत यांची 'आई' कवीता सादर केली. व मनोगत व्यक्त केले.

**१९) दि. २१ मे २०१२ - नाट्य विभाग - नाट्य वाचनाचा कार्यक्रम -** मसाप व स्वयम् औरंगाबाद आयोजित 'वेलांटी आणि मात्रेचे सूत्र' या अजित दळवी यांच्या नाटकाचे वाचन अनूया दळवी, लक्ष्मीकांत धोंड, वसंत दातार, पद्मनाभ पाठक, ॲड. सुजाता पाठक, डॉ. सर्वेषा महाजन यांनी प्रभावी केले.

**२०) दि. २६ मे २०१२ - वर्धापन दिनाच्या पूर्वसंध्येचे कार्यक्रम -** वार्षिक ग्रंथ आणि ग्रंथकार पारितोषिक वितरण समारंभ - मा.डॉ. नागनाथ कोतापल्ले यांच्या प्रमुख उपस्थितीत व त्यांच्या शुभहस्ते यंदाचे विविध पुरस्कार देण्यात आले. समारंभाचे अध्यक्ष डॉ. प्र. चिं शेजवलकर पारितोषिक विजेत्यांपैकी प्रा. फ. मु. शिंदे व डॉ. जया जगताप यांनी मनोगत व्यक्त केले. डॉ. द. ता. भोसले, डॉ. रावसाहेब कसबे, चंद्रकांत शेवाळे हे मान्यवर उपस्थित होते. प्रारंभी मृणाल धोंगडे यांनी शारदास्तवन म्हटले.

**२१) दि. २७ मे २०१२ - मसापचा १०६वा वर्धापन दिनसमारंभ -** माननीय उषा तांबे ता प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होत्या. पूर्वार्धात स्त्रीसखी मंच, तळेगाव या संस्थेने विंदानुभूती हा विंदा करंदीकर यांच्या कवितांवरील कार्यक्रम सादर केला. परिषदेचा भीमराव कुलकर्णी कायेकर्ता पुरस्कार 'ग्रंथाली'चे दिनकर गांगल यांना व 'जीवनगौरव' पुरस्कार श्रीनिवास कुलकर्णी यांच्या हस्ते देण्यात आला. सन्मानप्राप्तांनी मनोगते व्यक्त केली. साहिल पुंडलिक यांनी शारदास्तवन सादर केले. परिषदेतफे पेढे वाटप करण्यात आले.

**२२) दि. २९ मे २०१२ - 'कृष्णमुकुंद' पारितोषिक वितरण समारंभ -** अभिजीत घोरपडे यांच्या 'संथ वाहते....' या ग्रंथाला प्रमुख पाहुणे डॉ. विद्यासागर पंडीत यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. अध्यक्षस्थानी डॉ. प्र. चिं शेजवलकर होते. डॉ. नलिनी गुजराथी व डॉ. मोहन गुजराथी यांची विशेष उपस्थिती होती.

**२३) दि. २६ जून २०१२ - नवं कोरं -**डॉ. राजेंद्र माने यांच्या 'न लिहिलेली आत्मकथा' या कथासंग्रहावर चर्चा झाली. ह. मो. मराठे प्रमुख पाहुणे तर प्रा. मिलिंद जोशी प्रमुख वक्ते होते.

**२४) दि. २९ जून २०१२ - कॉफी क्लब -** प्रतिभाताई शाहू मोडक यांच्याशी गप्पांचा कार्यक्रम झाला.

**२५) दि. ४ जुलै २०१२ - श्रद्धांजली सभा -** भा. द. खेर, मु. श्री. कानडे, दत्ता हलसगीकर या दिवंगत साहित्यकांना श्रद्धांजली वाहण्यासाठी सभा झाली. अध्यक्ष डॉ. प्र. चिं शेजवलकर होते. जयराम देसाई, न.म. जोशी, अनिल कुलकर्णी, डॉ. अरविंद कुलकर्णी, डॉ. चंद्रशेखर बर्वे प्रा. मिलिंद जोशी, डॉ. अशोक रामचंद्र कानडे, विवेक वाडेकर, राजेंद्र खेर, डॉ. वि. दा. कराड यांची भाषणे झाली. याच वेळी प्रा. डॉ. राम बापट व ज्येष्ठ पत्रकार रामभाऊ जोशी यांच्या पत्नी या सर्व दिवंगतांना श्रद्धांजली वाहण्यात आली.

**२६) दि. २० जुलै २०१२ - जी. ए. कुलकर्णी जयंती -** नंदाताई पैठणकर यांनी कार्यक्रमाची भूमिका विषद केली. डॉ. माधवी वैद्य यांच्या हस्ते अनुराधा कुबेर, किरण मोघे, महेश आफळे, विनोद पावशे, नारायण गणाचारी, वामन राघोकर या कलाकारांचा सत्कार करण्यात आला. कुबेर व मोघे यांनी जी.एं ना आवडणारी गाणी सादर केली. 'एक अधिक शून्य' ही जी.एंच्या कथेवर आधारित एकांकिका ध्वनिचित्रफितीद्वारे दाखवण्यात आली. महेश व कस्तुरी आफळे यांचा सत्कार करण्यात आला.

**२७) दि. २५ जलै २०१२ - संत सावतामाळी स्मृतिदिन -** या निमित्ताने आजीआजोबांच्या गोष्टी उपक्रमाचा प्रारंभ रेणू गावस्कर यांच्या कथाकथनाने झाला. काही मुलामुलींनी गेल्या वर्षीच्या शिबिरात शिकलेली काही गंमतगाणी सादर केली. उपस्थित मुलामुलींना खाऊवाटप करण्यात आले.

**२८) दि. २६ जुलै २०१२ - नवं कोरं -** प्रा.



अनुक्रमणिका

मिलिंद जोशी यांच्या 'पानगळ' या पुस्तकातील कथांचे वाचन व चर्चा झाली. गजानन परांजपे व नंदा सुर्वे यांनी कथावाचन केले. सुनीताराजे पवार यांनी प्रकाशकाची भूमिका सांगितली. भानू काळे यांनी पुस्तकासंबंधी विचार प्रकट केले. गोविंदराव जोशी व रविमुकुल यांचा सत्कार करण्यात आला.

**२९) दि. ३० जुलै २०१२ - न. र. फाटक स्मृतिसन्मान पुरस्कार सोहळा -** प्रमुख पाहुणे मा. वसंत आबाजी डहाके यांच्या हस्ते डॉ. शेषराव मोरे यांना न. र. फाटक स्मृरिपुरस्कार प्रदान करण्यात आला. डहाके व डॉ. मोरे यांनी विचार प्रकट केले.

**३०) दि. ३१ जुलै २०१२ - कै. मामासाहेब तथा सोनोपंत दांडेकर पुरस्कार -** लेखक अच्युत गोडबोले यांच्या 'मनात' या पुस्तकाला अध्यक्ष डॉ. प्र. चि. शेजवलकर यांच्या हस्ते पुरस्कार देण्यात आला. त्यांनी मनोगत व्यक्त केले व डॉ. शेजवलकर यांनी अध्यक्षीय समारोप केला.

**३१) दि. १३ ऑगस्ट २०१२ -** चिपळूण येथे संपन्न होणाऱ्या ८६व्या साहित्य संमेलनाच्या बोधचिन्हाचे प्रकाशन प्रा. डॉ. शिवाजीराव कदम यांच्या हस्ते व महामंडळाच्या प्रतिनिधी उज्ज्वला मेहेंदळे यांच्या उपस्थितीत झाले. डॉ. यतिन जाधव उपस्थित होते. बोधचिन्हाबद्दलचे मनोगत अच्युत पालव यांनी केले. चिपळूणचे प्रकाश देशपांडे व नगराध्यक्ष सावित्री होमकळस हे सुद्धा उपस्थित होते.

**३२) दि. १४ ऑगस्ट २०१२ - कै. डॉ. गं. ना जोगळेकर स्मृतिदिन -** डॉ. वसुंधरा पेंडसे-नाईक यांना प्रा. डॉ. प्र. चि. शेजवलकर यांच्या हस्ते जोगळेकर स्मृतिपुरस्कार प्रदान करण्यात आला. या निमित्ताने 'उपयोजित मराठी' या पुस्तकाचे प्रकाशन करण्यात आले. प्रा. सुजाता शेणई, संतोष शेणई, डॉ. केतकी मोडक यांनी हे पुरस्कार संपादित केले.

**३३) दि. २३ ऑगस्ट २०१२ - नवं कोरं -** डॉ. मधुरा कोरान्ने लिखित 'मराठी नाटक आणि डॉक्टर प्रतिमा' या पुस्तकावर चर्चा व नाट्यवाचन आयोजित करण्यात आले होते. चर्चेत डॉ. मोहन आगाशे, प्रा. मिलिंद जोशी, डॉ. स्नेहल तावरे, डॉ. कोरान्ने, डॉ. गौरी दामले यांनी चर्चेत भाग घेतला. 'सुंदर मी होणार' व 'डॉक्टर तुम्ही सुद्धा!'या दोन नाटकांतील निवडक भागांचे नाट्यवाचन श्रीधर कुलकर्णी, प्रा. वंदना जोशी, बिपिन पाळंदे, सुनीता कुलकर्णी यांनी केले.

**३४) दि. १२ सप्टेंबर २०१२ - नवं कोरं -** नीलिमा बोरवणकर लिखित 'निजखूण' या कादंबरीवर चर्चा झाली. प्रमुख पाहुण्या विद्या बाळ होत्या. चर्चेत वक्ते प्रा. मिलिंद जोशी होते. नंदा सुर्वे यांनी निजखूण मधील उताऱ्याचे वाचन केले.

**३५) दि. १८ सप्टेंबर २०१२ - नवं कोरं -** लेफ्टनंद कर्नल (निवृत्त) प्रफुल्ल जोशी लिखित 'कर्नल नावाचा माणूस' या पुस्तकावर चर्चा झाली. लेखक जोशी यांनी भूमिका मांडली. संजय आखीकर व प्रकाश पायगुडे यांनी चर्चेत भाग घेतला. डॉ. मेधा खासगीवाले यांनी उताऱ्यांचे वाचन केले. अरुण जाखडे यांनी प्रकाशकाचे मनोगत व्यक्त केले. डॉ. नागनाथ कोतापल्ले व विक्रम गोखले यांनी आपले विचार प्रकट केले.

**३६) दि. ४ ऑक्टोबर २०१२ - परिक्षा विभाग - पारितोषिक वितरण समारंभ -** परिषदेच्या फेब्रुवारी २०१२ मध्ये घेण्यात आलेल्या प्रथमां, प्रवेश, साहित्य-प्राज्ञ व साहित्य विषारद या परिक्षेत प्रथम, द्वितीय, व तृतीय क्रमांकाने उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांचे सत्कार अध्यक्ष डॉ. प्र. चि. शेजवलकर यांच्या हस्ते झाले. कार्यवाह सुनीताराजे पवार यांनी परिक्षेसंबंधी माहिती दिली.

**३७) दि. ११ ऑक्टोबर २०१२ - नवं कोरं -** कवी फ. मुं. शिंदे यांच्या 'मी सामील समूहात' या कवितासंग्रहावर चर्चा झाली. रामदास फुटाणे व अरुण खोरे यांनी चर्चेत भाग घेतला. सुरेश एजन्सीचे बाळासाहेब कारले प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होते.

**३८) दि. १७ ऑक्टोबर २०१२ - कै. गंगाधर पुंडलिक स्मृतिसाहित्य पुरस्कार -** यशवंतराव गडाख लिखित 'अंतर्वेध' पुस्तकाला भानू काळे यांच्या हस्ते पुरस्कार देण्यात आला. अध्यक्ष अॅड. भास्करराव आव्हाड होते. व्यासपीठावर डॉ. रावसाहेब कसबे होते. साहिल पुंडलिक याने शारदास्तवन व पसायदान सादर केले. प्रा. मिलिंद जोशी 'अंतर्वेध' विषयी मनोगत व्यक्त केले. उल्हासदादा पवार, यशवंतराव गडाख, भानू काळे, डॉ. कसबे, निर्मला सोदी यांनी पुस्तकाविषयी विचार प्रकट केले. अॅड आव्हाड यांनी अध्यक्षीय समारोप केला.

**३९) दि. १९ ऑक्टोबर २०१२ -** परिषदेने गेल्या १०६ वर्षात यंदा प्रथमच 'मज्जाच मज्जा' हा



अनुक्रमणिका

दिवाळी अंक खास बालकुमारांसाठी काढला. या अंकाचे प्रकाशन केंद्रीय कृषीमंत्री नामदार शरद पवार व विधानसभेचे अध्यक्ष मा. दिलीप वळसे पाटील यांच्या हस्ते बालगंधर्व रंगमंदिरात झाला. ना. धो. महानोर, मोहन धारिया, सा. रे. तथा आप्पासाहेब पाटील, महापौर वैशाली बनकर, अंकुश काकडे, बाबा कल्याणी हे मान्यवर उपस्थित होते.

**४०) दि. २२ ऑक्टोबर २०१२ -** ग्रंथालय विभाग - सरस्वतीपूजन - पदाधिकारी व ग्रंथालयातील सेवक वर्ग यांच्या उपस्थितीत सकाळी १० वाजता सरस्वतीपूजन करण्यात आले.

**४१) दि. २५ ऑक्टोबर २०१२ - कै. द. वा. पोतदार पुरस्कार वितरण समारंभ -** 'फ्रेंच-मराठा संबंध १६६८-१९१९' या ग्रंथाचे लेखक डॉ. उमेश अशोकराव कदम यांना म. प. डॉ. ब्रह्मानंद देशपांडे यांच्या हस्ते पुरस्कार प्रदान करण्यात आला. डॉ. सदाशिव शिवदे व पांडुरंग बलकवडे हे परिक्षक होते.

**४२) दि. १ नोव्हेंबर २०१२ - कै. योगिनी जोगळेकर स्मृतिदिन -** पहिले पाऊल - ज्या कवींचा पहिला कवितासंग्रह २०११-१२ या वर्षात प्रसिद्ध झाला आहे अशा कवींचे कविसंमेलन झाले. सागर काकडे, श्यामला जोशी, जयश्री घुले, नलिनी दर्शने, किशोर टिळेकर, अभिजीत कर्वे, अरुणा गोखले, चंद्रशेखर धर्माधिकारी. मंगला म्हैसकर, अंजली महागांवकर, रेवा लिमये, रवींद्र कुलकर्णी, मनीषा आवेकर, जयवंत हापन या कवींनी सहभाग घेतला. विजय सातपुते यांनी सूत्रसंचालन केले. व्यासपीठावर सुधन्वा जोगळेकर होते.

**४३) दि. २ नोव्हेंबर २०१२ -** नवनिर्वाचित साहित्य संमेलनाध्यक्ष डॉ. नागनाथ कोतापल्ले यांचा पहिला जाहीर सत्कार परंपरेनुसार अध्यक्ष डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांच्या हस्ते करण्यात आला. डॉ. रावसाहेब कसबे, अरुण जाखडे, अनिल कुलकर्णी, यांनी विचार प्रकट केले. अनेक सामाजिक सांस्कृतिक, साहित्यिक क्षेत्रातील संस्थांतर्फे यावेळी डॉ. कोतापल्ले यांचा सत्कार करण्यात आला. त्यांनी सत्काराला उत्तर दिले. डॉ. शेजवलकर यांनी अध्यक्षीय समारोप केला.

**४४) दि. ७,८ व ९ नोव्हेंबर २०१२ -** पुणे बुक फेअर व परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने पुस्तक प्रदर्शनानिमित्त तीन दिवस साहित्यिक कार्यक्रम आयोजित करण्यात आले होते. पैकी दि. ७ नोव्हेंबर रोजी केशवसुत स्मृतिदिनानिमित्त डॉ. निलिमा गुंडी यांचे 'केशवसुतांची कविता:एक समृद्ध वारसा' या विषयावर व्याख्यान झाले. दि. ८ नोव्हेंबर रोजी श्याम भुर्के व गीता भुर्के यांचा 'आनंदयात्री पु. ल.' हा कार्यक्रम झाला व दि. ९ नोव्हेंबर रोजी 'संवेदना २०१२' हा परिषदेचा दुसऱ्या वर्षीचा दिवाळी अंक डॉ. न. म. जोशी यांच्या हस्ते प्रकाशित करण्यात आला व यशवंतराव चव्हाण जन्मशताब्दी निमित्त डॉ. जोशी यांचे 'आठवणीतले यशवंतराव चव्हाण' या विषयावर भाषण झाले. दि. ७ नोव्हेंबर रोजी पुणे बुकफेअर चे उद्घाटन डॉ. नागनाथ कोतापल्ले यांच्या हस्ते झाले. पैकी ९ नोव्हेंबरच्या कार्यक्रमात लेखिका डॉ. ललिता कुंभोजकर व साहित्य सेवक श्रीधर सहस्रबुद्धे यांना श्रद्धांजली वाहण्यात आली.

**४५) दि. १० नोव्हेंबर २०१२ - आजीआजोबांच्या गोष्टी -** डीएसके विश्व धायरी येथे डॉ.माधवी वैद्य व साहिल शेणई यांनी कथाकथन केले. डॉ. द. भि. कुलकर्णी व डी. एस. कुलकर्णी यांची विशेष उपस्थिती होती. याचवेळी 'ग्रंथविश्व' या मोफत वाचनालयाचे उद्घाटन झाले.

**४६) दि. १७ नोव्हेंबर २०१२ -** आजीआजोबांच्या गोष्टी - ज्येष्ठ नागरीक संघ वारजे येथे डॉ. माधवी वैद्य व डॉ. न. म. जोशी यांनी बालकुमारांसाठी गोष्टी सांगितल्या.

**४७) दि. २९ व ३० नोव्हेंबर -** दोन दिवसांचे पहिले समीक्षक संमेलन परिषदेतर्फे आयोजित करण्यात आले. प्रा. के. रं. शिरवाडकर यांच्या उपस्थितीत संमेलनाचे उद्घाटन झाले. व्यासपीठावर डॉ. द. भि. कुलकर्णी, परा. डहाके, डॉ. नागनाथ कोतापल्ले हे उपस्थित होते. प्रा. शिरवाडकर यांचे 'साहित्य, समाज व संस्कृती' या विषयावर बीजभाषण झाले. व परा. डहाके यांचे 'रूपवादी व सौंदर्यवादी समीक्षा - सामाजिक व सांस्कृतिक रुपात' या विषयावर व्याख्यान झाले. दुसऱ्या दिवशी पहिल्या सत्रात प्रा. सुजाता शेणई यांनी 'नियतकालिकातील कविता' डॉ. रेखा-साने-इनामदार यांनी 'लोकप्रिय कादंबरी', डॉ. निलिमा गुंडी यांनी 'मराठी आधुनिक काव्यातील सांस्कृतिक परिवर्तने' या विषयांवरचे निबंध वाचन केले. त्यावर खुली चर्चा

झाली. दुसऱ्या सत्रात डॉ. मनोहर जाधव यांनी गेल्या अर्धशतकातील दलीत साहित्यातील स्थित्यंतरे, डॉ. मंगला आठल्येकर यांनी 'स्त्रीवादी साहित्य परंपरा आणि स्वातंत्र' या विषयांवरील निबंधवाचन केले. विद्यार्थ्यांच्या प्रत्यक्ष चर्चेत सहभाग होता. समारोप प्रा. के. रं. शिरवाडकर यांनी केला. हे पहिले समीक्षक संमेलन माधवजूलिअन यांच्या स्मृतिस अर्पण करण्यात आले.

**४८) दि. १ डिसेंबर २०१२ -** माधवजूलिअन स्मृतिनिमित्त द्वैभाषिक मुशायरा - या मुशायऱ्याचे अध्यक्षपद सय्यद असिफ यांचेकडे देण्यात आले. सुरेशचंद्र सुरतवाला यांनी सूत्रसंचालन केले. काझी, हिसामुद्दिन शोला, सय्यद असिफ, रमण रणदिवे, इलाही जमादार, दीपक करंदीकर, संगीता जोशी, प्रदीप निफाडकर यांनी मुशायऱ्यात सहभाग घेतला.

**४९) दि. १० डिसेंबर २०१२ - प. पू. परमहंस स्वामी स्वरुपानंद स्मृतिव्याख्यान -** राजाभाऊ दिवाण यांचे 'स्वामी स्वरुपानंदांच्या विचारांची सहजता, सुलभता' या विषयावर व्याख्यान झाले. स्वामी स्वरुपानंद सेवा मंडळाचे विश्वस्त श्री. मामा घळसासी यांचे हस्ते श्री. दिवाण यांचा यथोचित सत्कार करण्यात आला. व्यासपीठावर वसंतराव देसाई, मधू पटवर्धन व डॉ. माधवी वैद्य उपस्थित होते.

**५०) दि. २१ जानेवारी २०१२ - माता पितामह स्मृति कार्यक्रम -** डॉ. माधवी सिधये आयोजित कै. प. चि. नेने व कै. कृ. ना. दातार यांच्या स्मृतिनिमित्त डॉ. शं. ना. नवलगुंदकर यांचे 'समाज परिवर्तन दशा आणि दिशा' या विषयावर व्याख्यान झाले. डॉ. मेधा सिधये यांनी मनोगत व्यक्त केले. व श्री. वासुदेव सिधये याचे स्वागत करण्यात आले.

**५१) दि. २५ जानेवारी २०१२ - श्रद्धांजली सभा -** ज्योत्स्ना देवधर, डॉ. वि. मा. बाचल, डॉ. शरच्चंद्र गोखले यांना श्रद्धांजली देण्यासाठी डॉ. माधवी वैद्य व अध्यक्ष मंदा खांडगे यांच्या उपस्थितीत सभा आयोजित करण्यात आली होती. सु. वा. जोशी, डॉ. प्र. ल. गावडे श्री आपटे, डॉ. कल्याणी दिवेकर, स्वप्निल पोरे, शंकरराव पाटणकर, रत्नाकर कुलकर्णी, शरद गोगटे, प्रा. मिलिंद जोशी, चं. रा. नाईक स. अ. जोशी, डॉ. वैद्य व मंदा खांडगे यांनी श्रद्धांजली वाहिली.

**५२) दि. ३० जानेवारी २०१२ - अहिताग्नी शं. रा. राजवाडे स्मृतिव्याख्यान -** प्रा. राजा दीक्षित यांचे 'केशवसुतांची स्वर्ग समक्षता आणि महाराष्ट्रातील प्रबोधन' या विषयावर व्याख्यान झाले. प्रारंभी नुकतेच दिवंगत झालेले अकलूज येथील कवी सतीश इनामदार यांना श्रद्धांजली देण्यासाठी प्रा. राजा दीक्षित व कार्यवाह दीपक करंदीकर यांची भाषणे झाली.

**५३) दि. ३१ जानेवारी २०१२ -** किर्लोस्कर वसुंधरा आंतरराष्ट्रीय चित्रपटमहोत्सवांतर्गत दुसरे पर्यावरणप्रेमी साहित्यसंमेलन 'जलसंवेदना' या विषयावर डॉ. माधवराव चितळे यांच्या अध्यक्षतेखाली संपूर्ण दिवसभर घेण्यात आले. 'वसुंधरा' व धरणीमातेच्या आरत्या प्रारंभी रेणुकास्वरूप शाळेतील मुलींनी सादर केल्या. डॉ. नागनाथ कोतापल्ले उद्घाटक होते. श्री. द. महाजन यांचा सत्कार करण्यात आला. 'जलसंवेदना' या विषयावर डॉ. अरुणा ढेरे यांचे व्याख्यान झाले. त्याआगोदर डॉ. चितळे यांचे बीजभाषण झाले. सुरेखा शहा व रेखा बैजल यांची मुलाखत डॉ. माधवी वैद्य यांनी घेतली. 'जलसाक्षरता' या विषयावर डॉ. माधव गाडगीळ यांचे व्याख्यान झाले. 'जलबिंब' हा डॉ. संगिता बर्वे व चंद्रकांत काळे यांनी कविता व वेचे यांवर आधारित कार्यक्रम सादर केला. सुप्रिया मराठे यांचा सत्कार झाला. अनुपम मिश्र व डॉ. माधवराव चितळे यांनी समारोपाची भाषणे केली.

**५४) दि. ४,५,६ व ७ फेब्रुवारी २०१२ - का. र. मित्र व्याख्यानमाला -** पहिले पुष्प - दि. ४ फेब्रुवारी इंदिरा संत, वा. रा. कांत, बी रघुनाथ यांच्या जन्मशताब्दी निमित्त इंदिरा संत यांच्या कवितांवर आधारित 'स्मृतिमग्ना' हा संगीतमय कार्यक्रम 'अनन्वय फाऊंडेशन'च्या डॉ. माधवी वैद्य, नरेंद्र डोळे, अमृता कोल्हटकर, राहुल घोरपडे, व निवेदिता मेहेंदळे यांनी सादर केला. दुसरे पुष्प - दि. ५ फेब्रुवारी - कै. माधवराव मदाने स्मृति व्याख्यान - अर्थतज्ज्ञ अरविंद परांजपे यांचे 'भारत आर्थिक महासत्ता होऊ शकतो का?' या विषयावर व्याख्यान झाले. वक्त्यांनी उपस्थित श्रोत्यांशी व्याख्यानाच्या शेवटी संवाद साधला. तिसरे पुष्प - दि. ६ फेब्रुवारी - श्री. ना. पेंडसे जन्म शताब्दीच्या सांगते निमित्त लालन सारंग यांचे 'रथचक्र आणि मी' या विषयावर व्याख्यान झाले. चौथे पुष्प - दि. ७ फेब्रुवारी - महाराजा सयाजीराव गायकवाड

यांच्या १५० व्या जन्मवर्षानिमित्त साहित्यिक बाबा भांड यांचे 'काळापुढे दृष्टी असलेले सयाजीराव गायकवाड' या विषयावर व्याख्यान झाले.

**५५) दि. १४ व १५ फेब्रुवारी २०१३ - राजेंद्र बनहट्टी गौरव व्याख्यानमाला** - मंगला आठल्येकर यांचे 'महिला आरक्षण कि संरक्षण' या विषयावर व मुक्ता मनोहर यांचे 'स्त्रियांची सद्यःस्थिती' या विषयावर अशी दोन व्याख्याने दोन दिवस आयोजित करण्यात आली.

**५६) दि. १६ फेब्रुवारी २०१३** - नियतकालिकांच्या संपादकांशी संवाद साधणारी सभा म.सा.प. व 'अंतर्नाद' व मासिक 'आपले जग' तर्फे आयोजित करण्यात आली. सत्र पहिले - प्रास्ताविक भानू काळे, कार्यक्रमाची रूपरेषा वसंत आपटे, सूत्रसंचालन सागर देशपांडे यांनी केले. व उपस्थितांचा परस्पर परिचय करुन घेण्यात आला. सत्र दुसरे - 'नियतकालिकांपुढील आव्हाने व संधी' या विषयावर सर्व उपस्थितांनी आपली मते मांडली. आनंद आगाशे यांनी सूत्रसंचालन केले. सत्र तिसरे - 'पुढे काय?' संवादसभेची भावी दिशा' या विषयावर विचारविनिमय झाला. सूत्रसंचालन विनोद शिरसाट यांनी केले. सत्र चौथे - डॉ. नागनाथ कोतापल्ले यांनी 'नियतकालिकांकडून आमच्या अपेक्षा' या विषयावर व्याख्यान दिले. विनिता तेलंग यांनी सूत्रसंचालन केले.

**५७) दि. १८ फेब्रुवारी २०१३** - श्री. म. माटे स्मृतिव्याख्यान विवेक सावंत यांचे 'मराठी भाषा आणि आधुनिक माहिती तंत्रज्ञान' या विषयावर व्याख्यान झाले. डॉ. शेजवलकर यांनी अध्यक्षीय समारोप केला.

**५८) दि. २१ फेब्रुवारी २०१३ - रा. श्री. जोग पुरस्कार प्रदान सोहळा** - जोग समीक्षा पुरस्कार यंदा परा. डॉ. विनायक तुमराम यांच्या 'आदिवासी साहित्य : दिशा आणि दर्शन' या स्वरूप प्रकाशन, नागपूर यांच्या ग्रंथास देण्यात आला. परीक्षक डॉ. कल्याणी दिवेकर व डॉ. मनोहर जाधव होते. अध्यक्ष डॉ. न. म. जोशी होते.

**५९) दि. २५ फेब्रुवारी २०१३ - स्वा. वि. दा. सावरकर पुण्यतिथी व्याख्यान** - 'सावरकरांची काव्य प्रतिभा' या विषयावर चारुदत्त आफळे यांचे व्याख्यान झाले.

**६०) दि. २७ फेब्रुवारी २०१३** - कॉन्टिनेंटल प्रकाशन पुरस्कार वितरण समारंभ - अझीम राहीनवाझ यांच्या 'कल्लोळातील एकांत' व अजय कांडर यांच्या 'हत्ती इलो' या दोन कवितासंग्रहांना व अक्षरमानव प्रकाशन पुणे व शब्द पब्लिकेशन मुंबई या दोन प्रकाशन संस्थांना यंदाचा कवी कुसुमाग्रज पुरस्कार कवी रमण रणदिवे यांच्या हस्ते विभागून देण्यात आला. यावेळी देवयानी अभ्यंकर, परीक्षक आसावरी काकडे यांचा सत्कार करण्यात आला. अझीम राही नवाझ व आसावरी काकडे यांनी मनोगत व्यक्त केले.

**६१) दि. २८ फेब्रुवारी २०१३** - राष्ट्रीय विज्ञान दिन - 'मला गवसलेले दुर्मिळ जीवाश्म' या विषयावर डॉ. विद्यादर बोरकर यांचे 'सचित्रदीप' असे व्याख्यान झाले. अध्यक्ष म. ना. गोगटे होते. मराठी विज्ञान पिरषदेचे विनय यांनी सूत्रसंचालन केले. डॉ.बोरकरांनी श्रोत्यांशी प्रश्नोत्तर रुपात संवाद साधला.

**६२) 'नवे कोरे' अंतर्गत, श्री. ह. ल. निपुणगे ह्यांचे 'हलचल'** हे आत्मचरित्र चर्चेसाठी घेतले. अध्यक्षस्थानी श्री. शंकर सारडा होते. श्री. विश्वास वसेकर, डॉ. सु. प्र. कुलकर्णी आणि प्रभा सोनवणे ह्यांनी ह्या आत्मचरित्राविषयी आपले विचार मांडले. म. सा. प. चे माजी संपादक, माजी कोषाध्यक्ष, ज्येष्ठ संपादक आणि प्रकाशक अशा विविध भूमिकांमधील श्री. निपुणगे ह्यांची 'हलचल' लक्षवेधक ठरली. शंकर सारडा ह्यांनी लेखकाच्या आंतरिक सुसंगतीचा वेध घेतला. एका प्रामाणिक आणि प्रभावी व्यक्तिमत्त्वाचा परिचय झाला म्हणून उपस्थितांपैकी काहींनी श्री. निपुणगेंचा सत्कार केला. श्री. निपुणगे ह्यांनी 'हलचल' शीर्षकामागील विचार सविस्तर विशद केला.

**टीप** - महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे मुख्य केंद्राच्या वर्षभरातील वरील सर्व कार्यक्रमांचे संयोजन प्रास्ताविक व स्वागत करणे, वक्त्यांचे परिचय करुन देणे, सत्कार करणे, सूत्रसंचालन व आभार मानणे ही कामे कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी, कोषाध्यक्ष सुनील महाजन व स्थानिक कार्यवाह - दीपक करंदीकर प्रकाश पायगुडे, नंदा सुर्वे, महेंद्र मुंजाळ, डॉ. दिवेकर व श्री. कानडे यांनी केली आहेत.

**वार्षिक कार्यवृत्तनोंद - दीपक करंदीकर**

स्थानिक कार्यवाह, मसाप पुणे.



अनुक्रमणिका

## — म.सा.प. शाखा : जुळे सोलापूर —

**१) दि. २४ फेब्रुवारी २०१२ :** आंतरशालेय हस्तलिखित स्पर्धा २०१२ : १४ शाळांचा सहभाग मा. आमदार प्रणिती शिंदे यांच्या हस्ते व आयुक्त हिंमतराव देशभ्रतार यांच्या अध्यक्षतेखाली पारितोषिक वितरण झाले. प्रमुख उपस्थित प्रशांत दिवेकर होते. सूत्रसंचालन पद्माकर कुलकर्णी व आभार गिरीश दुनाखे यांनी मानले.

**२) दि. ८ मार्च २०१२ : जागतिक महिला दिन :** सावित्रीबाई फुले या विषयावर सुधाकर जोशी यांचे व्याख्यान झाले.

**३) दि. २७ मार्च २०१२ :** कवी ग्रेस यांना वृक्षारोपण करून श्रद्धांजली वाहण्यात आली. डॉ. वासुदेव रायते, मनोज कुलकर्णी, दत्ता हलसगीकर यांनी श्रद्धांजलीपर मनोगत व्यक्त केले.

**४) दि. ५ जून २०१२ :** 'स्मृतिवनात' काव्यशलाकाचे उद्घाटन हिंमतराव देशभ्रतार यांच्या हस्ते वृक्षारोपण करून झाले. 'निसर्ग कविता' मैफलीत डॉ. लक्ष्मीनारायण बोल्ली, नारायण कुलकर्णी, हेमकिरण पत्की, डॉ. माधवी रायते यांनी सहभाग घेतला. अध्यक्ष डॉ. वासुदेव रायते उपस्थित होते.

**५) दि. ९ जून २०१२ :** दत्ता हलसगीकर यांना श्रद्धांजली सभा : डॉ. रायते, नारायण कुलकर्णी, गिरीश दुनाखे, शांताबाई क्षीरसागर यांनी विचार प्रकट केले.

**६) दि. ८ जुलै २०१२ :** कार्याध्यक्ष सुधाकर जोशी यांच्या 'तरंगातून उमटलेले' या लेखसंग्रहाचे प्रकाशन ह. मो. मराठे यांच्या हस्ते झाले. दै. संचारचे धर्मराज काडदी अध्यक्ष होते.

**७) दि. ७ ऑगस्ट २०१२ :** कै. दत्ता हलसगीकर जयंती : स्मृतीवनात वृक्षरोपणाने हलसगीकर परिवाराच्या सहयोगाने साजरी करण्यात आली. विविध वक्त्यांनी त्यांच्या आठवणींना उजाळा दिला व कविता वाचन झाले.

**८) दि. १२ ऑगस्ट २०१२ :** 'शुभंकराचा सांगाती' हा दत्ता हलसगीकरांच्या कवितांवर आधारीत कार्यक्रम 'समाधारन' संस्थेच्या रजनीश जोशी, सुनील गुरव, अमोल धाबळे, पूनम चव्हाण यांनी सादर केला.

**९) दि. ८ सप्टेंबर २०१२ :** कथा व काव्यस्पर्धा पुरस्कार : दीपध्वज कासोदे यांच्या 'पंचनामा' व स्नेहसुधा कुलकर्णी यांच्या 'सावलीच्या शोधात' या पुस्तकांना डॉ. वासुदेव रायते व डॉ. माधवी रायते यांच्या हस्ते पुरस्कार देण्यात आले. याचवेळी लेखक














गंगाधर वाघमोडे यांच्या 'खिचडी' या विनोदी कथासंग्रहाचे प्रकाशन झाले.

**१०) दि. १६ सप्टेंबर २०१२ : प्रथम वर्धापदिन :** श्रीधर माडगूळकर यांच्या 'मंतरलेल्या आठवणी' या कार्यक्रमाने जुळे सोलापूर शाखेचा प्रथम वर्धापनदिन साजरा करण्यात आला. डॉ. श्रीकांत येळेगांवकर यांचा सत्कार करण्यात आला.

## – म.सा.प. शाखा : सोलापूर –

**१) दि. २९ फेब्रुवारी २०१२ :** जागतिक मराठी दिन : 'मला भेटलेले कुसुमाग्रज' या विषयावर फैय्याजशेख यांचे व्याख्यान झाले. प्रास्ताविक डॉ. श्रीकांत येळगांवकर, डॉ. बोल्ली, सूत्रसंचालन पद्माकर कुलकर्णी व आभार जे. जे. कुलकर्णी यांनी मानले. कुसुमाग्रजांच्या काही कविता व नाटकातील अंशांचे वाचन करण्यात आले.

**२) दि. ३० मार्च २०१२ :** कवी ग्रेस श्रद्धांजली सभा : सूत्रसंचालन प्रा. डॉ. व्यंकटेश मुळे व समारोप डॉ. बोल्ली यांनी केला अनेक वक्त्यांनी श्रद्धांजलीपर विचार प्रकट केले.

## – म.सा.प. शाखा : चाळीसगाव –

**१) दि. ३१ जानेवारी २०१२ :** 'अहिराणी काव्यातील स्त्रीजीवन' या विषयावर प्रा. डॉ. सौ. उषा सावंत यांचे व्याख्यान झाले. सूत्रसंचालन व आभार प्रदर्शन डॉ. मालपुरे व श्री. निकम यांनी केले.

**२) दि. २७ फेब्रुवारी २०१२ :** 'कुसुमाग्रजांचे साहित्य' या विषयावर प्रा. डॉ. एकनाथ पगार यांचे व्याख्यान झाले.

प्रास्ताविक : डॉ. मालपुरे, सूत्रसंचालन : कविता साळुंखे, आभार : श्री. धुमाव.

## – म.सा.प. शाखा : शिराळा –

**१) दि. २७ मार्च २०११ :** प्रदीप पाटील व प्रा. भीमराव गायकवाड यांच्या उपस्थितीत कवी संमेलन झाले. सूत्रसंचालन प्रा. डॉ. डुकळे यांनी केले.

**२) दि. ८ मे २०११ :** कै. जगदीश खेबूडकर श्रद्धांजली सभा : प्रा. शिवाजी कुंभार व बाबा परिट यांची श्रद्धांजलीपर भाषणे झाली. तसेच वि. आ. बुवा व चारुता सागर यांनाही श्रद्धांजली वाहण्यात आली.

**३) दि. २ सप्टेंबर २०११ :** स्व. द. का. हसबनीस यांच्या साहित्यावर प्रा. डॉ. मधुकर हसबनीस यांचे व्याख्यान झाले. आ. मानसिंगराव नाईक अध्यक्षस्थानी होते. प्रा. डॉ. डुकळे व पाटील यांनी सूत्रसंचालन व नाथा हसबनीस यांनी आभार मानले.

**४) दि. २४ जानेवारी २०१२ :** 'संत साहित्य व आधुनिकता' या विषयावर प्रा. मिलिंद जोशी यांचे व्याख्यान झाले. अध्यक्ष बाबासाहेब पवार होते. परिचय, आभार व सूत्रसंचालन प्रा. डुकळे, नीता जोखे, प्रा. हिरेमल यांनी केले.

**५) दि. ११ मार्च २०१२ :** पांडुरंग टिळे यांच्या 'संस्कार दीप लावू घरा' या पुस्तकाचे प्रकाशन डॉ. मोकाशी व शेटफळे यांच्या हस्ते झाले. स्वागत, प्रास्ताविक आभार व सूत्रसंचालन व ओळख ही कामे श्री. पाटील, शैला मिरजकर, ज्योती जोशी व प्रा. मिरजकर यांनी केली.

## – म.सा.प शाखा : बार्शी –

**१) शा. अमरशेख पुरस्कार :** पद्मिनीदेवी शिंदे, डॉ. संजीवकुमार सोनावणे, श. मा. पाटील, ज्योतिराम फडतरे यांना डॉ. गो. मा. पवार यांच्याहस्ते गौरविण्यात आले. प्रास्ताविक परिचय, सूत्रसंचालन व आभार ही कामे निपाणीकर, डॉ. दीपा सावळे, कुलकर्णी व मुलाणी यांनी केली. मुकुंदराज कुलकर्णी यांनी परीक्षकांचे

मनोगत व्यक्त केले. अध्यक्ष विनय संघवी होते.
**२) दि. ११ मार्च २०१२ :** होळीनिमित्त हास्यरंग : सुरेश पाठक, दत्ता गोसावी, अनुराधा देशमुख, शांता टाकळीकर यांनी भाग घेतला प्रा. कोर – सूत्रसंचालन व श्री. कुलकर्णी – आभार प्रदर्शन.

## – म.सा.प. शाखा : श्रीरामपूर –

**१) दि. १ एप्रिल २०१२ :** कवी ग्रेस व बाळासाहेब खटोड यांना श्रद्धांजली अर्पण करण्यात आली. सूत्रसंचालन प्रमुख कार्यवाह प्रा. डॉ. उपाध्ये यांनी केले. प्रा. सौभाग्यश्री बढे यांनी कविता वाचन केले.
**२) दि. २४ नोव्हेंबर २०१२ :** सत्कार सोहळा : दै. सार्वमतचे संपादक श्री. नंदकुमार सोनार यांना महाराष्ट्र राज्य संपादक परिषदेचा आचार्य अत्रे पुरस्कार मिळाल्यानिमित्त सत्कार करण्यात आला. अध्यक्ष डॉ. रावसाहेब शिंदे होते. स्वागत, प्रास्ताविक सूत्रसंचालन, परिचय अविनाश आहे, प्रा. डॉ. बाबूराव उपाध्ये, प्रकाश कुलथे यांनी ही कामे केली. अध्यक्षस्थानी सौ. मीनाताई जगधने होत्या. नामदेवराव देसाई यांनी आपले विचार प्रकट केले.

## – म.सा.प शाखा : वारजे-कोथरूड –

**१) दि. ११ जानेवारी २०१२ :** शाखेचा पहिला वर्धापनदिन भारत सासणे यांच्या उपस्थितीत साजरा झाला.
**२) दि. ३१ मार्च २०१२ :** डॉ. अश्विनी घोंगडे यांनी डॉ. अनिल अवचट यांची मुलाखत घेतली.
**३) दि. २४ मे २०१२ :** सभासदांचा साहित्यिक मनोरंजनपर कार्यक्रम झाला.
**४) दि. २४ ऑगस्ट २०१२ :** 'आजचे प्रश्न आणि संत साहित्य' या विषयावर डॉ. अविनाश आवलगांवकर यांचे व्याख्यान झाले. डॉ. धोंगडे व कर्दळे उपस्थित होत्या.
**५) दि. ६ ऑक्टोबर २०१२ :** अनघा ठोंबरे यांचे 'बहिणाबाईच्या लेकी' या विषयावर व्याख्यान झाले.
**६) दि. २५ नोव्हेंबर २०१२** डॉ. न. म. जोशी यांचे '२१ व्या शतकातील आव्हाने' या विषयावर व्याख्यान झाले. आभार गोपाळ कुलकर्णी यांनी मानले.
**७) दि. २० जानेवारी २०१३ : दुसरा वर्धापन दिन :** प्रा. मिलिंद जोशी हे प्रमुख वक्ते व डॉ. माधवी वैद्य प्रमुख पाहुण्या होत्या. शाखा कार्यवाह गोपाळ कुलकर्णी यांनी अहवाल वाचन केले. मधुकर नवले व धर्माधिकारी यांनी आभार मानले.

## – म.सा.प. शाखा : जळगाव-पाचोरा –

**१) दि. १ मे २०१२ :** महाराष्ट्र दिन : कवी संमेलन डॉ. ए. पी. चौधरी, प्रा. किसन पाटील, अजीज नवाझ राही हे उपस्थित होते. अनेक कवींनी सहभाग घेतला. सूत्रसंचालन, आभार अशोक कौतुक कोळी व प्रा. डॉ. वासुदेव वले यांनी मानले. जयवंत बोरडे यांच्या 'पोर्ट्रेट' व 'टिच्चू आणि विल्लास' या पुस्तकांचे प्रकाशन झाले.

## – म.सा.प. शाखा : पिंपरी-चिंचवड –

**१) दि. २० मे २०१२ :** विनीता ऐनापुरे व प्रा. तुकाराम पाटील यांचे कथाकथन झाले. प्रमुख पाहुणे डॉ. इंगोले होते. राजन लाखे व माधुरी ओक उपस्थित होते.
**२) दि. २१ ऑक्टोबर २०१२ :** खुली राज्य स्तरीय काव्यस्पर्धा घेण्यात आली. ५२ कवी सहभागी झाले. डॉ. पानवलकर हस्ते पारितोषिक देण्यात आली.
**३) दि. १२ नोव्हेंबर २०१२ :** दिवाळी काव्य पहाट आ. लक्ष्मण जगताप यांच्या व डॉ. नागनाथ कोतापल्ले यांच्या अध्यक्ष ते खाली पार पडले.

## — म.सा.प. शाखा : ठाणे —

**१) दि. ३१ मार्च २०१२ :** प्रा. डॉ. अनंत देशमुख यांचे 'प्रो. र. धों. कर्वे : व्यक्ती आणि वाङ्मय' या विषयावर व्याख्यान झाले. श्री. उमाकांत वर्मा यांच्या 'छलांग' या कथासंग्रहाचे प्रकाशन झाले. 'हितवर्धिनी' संस्थेचे सहकार्य लाभले.

**२) दि. ६ ऑक्टोबर २०१२ :** ठाणे नगर वाचन मंदिर व मसाप ठाणे शाखा आयोजित प्रा. म. वि. फाटक स्मृतिव्याख्यान प्रा. मिलिंद जोशी यांनी दिले. 'आचार्य अत्रे व पु. ल. देशपांडे : विनोदाची दोन शिखरे' हा त्यांचा विषय होता. अध्यक्ष य. रा. साने होते. श्री. पां. के. दातार उपस्थित होते. पद्मांकर शिरवाडकर यांनी प्रास्ताविक केले.

**३) दि. १५ डिसेंबर २०१२ :** गझलकार दीपक करंदीकर यांचा 'अक्षरधुनी अक्षयधुनी' हा गझलांचा कार्यक्रम झाला. प्रसिद्ध निवेदक बंडा जोशी यांनी निवेदन केले.

---

## — म.सा.प शाखा : धुळे व नंदुरबार जिल्हा —

**१) दि. २० ऑक्टोबर २०११ :** शाखेची पंचवार्षिक सभा : अध्यक्षस्थानी सुलभाताई मानगांवकर होत्या. नवीन कार्यकारिणीची निवड झाली.

---

## — म.सा.प. शाखा : अहमदनगर जिल्हा —

**१) दि. ४ जानेवारी २०१२ :** कै. वंदना विटणकर यांना श्रद्धांजली. अहमदनगर येथील चित्रकार विटणकर यांच्या निवासस्थानी.

**२) दि. २ मे २०१२ :** कवि दत्ता हलसगींकर यांचे व्याख्यान आणि काव्यविषयक चर्चा सहभाग – डॉ. सुधाकर कुऱ्हाडे, प्रा. मेधा काळे, डॉ. क्रान्ती अनभुले, अरविंद ब्राह्मने, श्री. ल. धों. खराडे, जवाहरमुथा.

**३) २६ मार्च २०१२ :** कवि 'ग्रेस' यांना श्रद्धांजली – (डॉ. चं. वि. जोशी निवासस्थानी) डॉ. सहस्रबुद्धे, टी. एन्. परदेशी, डॉ. चं. वि. जोशी, अरविंद ब्राह्मणे, डॉ. चव्हाण, डॉ. सु. प्र. कुलकर्णी, चंद्रकांत पालवे, डॉ. चं. वि. जोशी भाषणे.

**४) ११ मार्च २०१२ :** कै. वंदना विटणकर यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ भावगीत लेखन व गायन स्पर्धा डॉ. बोपर्डीकर, श्री. महादेव कुलकर्णी यांच्या सहकार्याने संपन्न. डॉ. बोपर्डीकर यांच्या हस्ते पारितोषिक वितरण.

**५) १० नोव्हेंबर २०१२ :** मान. यशवंतरावजी गडाख साहेब यांच्या हस्ते प्रकाशन सोहळा व भाषण. 'महाराष्ट्र काव्यविश्वात अहमदनगरचे योगदान' ह्या डॉ. सहस्रबुद्धे संपादित ग्रंथाचे प्रकाशन व चंद्रकांत पालवे यांचे अध्यक्षीय भाषण. यानंतर कविसंमेलन झाले.

**६) २६ मार्च २०१३ :** 'चांदणे तुझ्या स्मरणाचे' 'ग्रेस' स्मृतिदिन. डी. एम्. कांबळे गीतकार बाबासाहेब सौदागर, श्री चित्रकार श्रीधर अंभोरे इ. ग्रेस यांच्या कवितांचे वाचन.

**७) ९, १०, ११ मार्च २०१३ :** शासनातर्फे ग्रंथोत्सव आयोजनात म.सा.प. नगर शाखेचा सहभाग (माहिती उपसंचालक नरेंद्र भुजबळ, माहिती अधिकारी श्री. गवळी, मान. जिल्हाधिकारी यांच्यासह)

**चंद्रकांत पालवे, कार्याध्यक्ष अहमदनगर शाखा**

---

## — म.सा.प. शाखा : नांदगाव —

**१) दि. १९ जानेवारी २०१३ :** कवी विजयकुमार मिढे यांचा 'गावगप्पा' हा कार्यक्रम झाला. दै. सकाळचे पत्रकार संजीव निकम यांना 'जिल्हापत्रकारिता पुरस्कार' मिळाल्यानिमित्त सुदाम महाजन यांच्या अध्यक्षतेखाली सत्कार करण्यात आला. शाखा-कोषाध्यक्ष सुरेश नारायणे-पाहुण्यांचा परिचय, काशीनाथ गवळी–सूत्रसंचालन, रमेश घोडके–आभार मानणे ही कामे यांनी केली. विठ्ठल संधाने, डॉ. मधुकर कवडे, सुरेश शेळके, संदीप जेजूरकर, मसाप अध्यक्ष (शाखा) दयाराम मिलागकर हे उपस्थित होते.

**वार्षिक शाखा कार्यवृत्त नोंद : दीपक करंदीकर**
स्थानिक कार्यवाह, म.सा.प. पुणे.



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

